महिमभट्टकृत

# व्यक्तिविवेक

लेखक

प्रा. मा. वा. पटवर्धन



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# महिमभट्टकृत

# व्यक्तिविवेक

# परिचयग्रंथ

लेखक : कै. मा. वा. पटवर्धन




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

प्रथम आवृत्ति :
१९९८

•

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.

•



•

मुद्रक :
व्यवस्थापक,
शासकीय मुद्रणालय, वाई (जि. सातारा)

•

किंमत :
रुपये ९०/-

# विषयानुक्रमणिका

# निवेदन

राजानक महिमभट्टकृत "व्यक्तिविवेक" ह्या अलंकार शास्त्रावरील संस्कृत ग्रंथाचा परिचय करून देणारा एक सर्वांग संपूर्ण प्रबंध कै. मा. वा. पटवर्धन यांनी अत्यंत मेहनतीने तयार केला. तो प्रकाशित करताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला अतिशय समाधान वाटत आहे. संस्कृत काव्यशास्त्र हे साहित्यशास्त्र किंवा अलंकारशास्त्र म्हणून ओळखले जाते. काव्यातील मौलिक सौंदर्यतत्त्व शोधणे व त्या सौंदर्यतत्त्वाची शोभा खुलविणारी अलंकारादी इतर साधने सविस्तर वर्णन करणे हे ह्या साहित्यशास्त्राने भरपूर प्रमाणात केलेले आहे.

काव्याचा आत्मा रस होय. हे बहुधा सर्वांनी मान्य केलेले आहे. पण तो रस कसा पुष्ट होतो ? रसिक-चर्वणोपयोगिता कशी सिद्ध होते ? हे अनेक संस्कृत साहित्यशास्त्र-कोविदांनी आपापले वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ लिहून प्रतिपादिलेले आहे.

शब्द आणि अर्थ हेच काव्याचे वाहन. शब्द आणि अर्थ एकमेकात शंकर आणि पार्वतीप्रमाणे मिसळलेले असतात असे कालिदास सांगतो आणि ते ह्या सर्व काव्यशास्त्र-कोविदांना मान्य आहे. शब्द आणि अर्थ यांच्या ठिकाणी शक्ती कल्पिली जाते व ती शक्तीच शब्दार्थबंधाला काव्यरूप देते. ह्या शक्तीचे प्रकार एक की अनेक ह्या विषयी काही वाद मात्र आहेत. पण संस्कृत साहित्यशास्त्राच्या इतिहासात आनंदवर्धनाने ध्वनितत्त्वाबद्दल सांगोपांग विवेचन केले आणि व्यंजनानामक शक्तीची समृद्धपणे प्रस्थापना केली. शब्दार्थांच्या ठायी अभिधा, लक्षणा व व्यंजना अशा तीन शक्ती असतात हे त्याचे प्रतिपादन साहित्यशास्त्रात सर्वमान्य झाले. काही पंडितांनी मात्र ह्या आनंदवर्धनाच्या व्यंजना शक्तीच्या प्रतिपादनाला विरोध केला व व्यंजना नामक शक्तीच नाही, नव्हे लक्षणा नावाचीही शक्ती मानण्याची गरज नाही असे आपल्या ग्रंथातून प्रतिपादन केले.

ह्या पंडितापैकी एक राजानक महिमभट्ट व त्याचा प्रस्तुतचा व्यक्तिविवेक हा ग्रंथ होय. परंतु ह्या लेखकाला व त्याच्या ग्रंथाला आनंदवर्धन व त्याची व्यंजना शक्ती ह्यांना विरोध करणारा, असे म्हणणे फारसे टिकाऊ ठरत नाही. त्यामुळेच ह्या ग्रंथाची घ्यावी तशी दखल पुढे कोणत्याही साहित्य शास्त्रज्ञाने घेतली नाही. ह्याचे दुसरे कारण, ह्या लेखकाची वृत्ती व ग्रंथातील प्रतिपादन शैली होय. महिमभट्ट आनंदवर्धनाच्या प्रती प्रचंड आदर व्यक्त करतो. त्याची अनेक तत्त्वे मला मान्य आहेत असे म्हणतो. आनंदवर्धनाने प्रस्थापित केलेल्या ध्वनिच्या काही मुद्यांना तो खोडूनही काढीत नाही आणि ज्या एकमेव मुद्यावरून तो आनंदवर्धनाचा विरोध करतो तो, ध्वनिच्या संकल्पनेला नाही तर ध्वनि ह्या संज्ञेला आहे, असे भासवितो. त्याला ध्वनिसंकल्पना मान्य आहे पण ध्वनि ही संज्ञा मात्र मान्य नाही. त्याऐवजी अनुमान, अनुमिती म्हणावे असा त्याचा आग्रह आहे. नावात काय आहे ? "संज्ञा इच्छातो विधीयते" असे भामहाने म्हटलेले आहे. नावाला महत्त्व नसल्यामुळेच व्यंजना म्हणणे काय ? किंवा अनुमिती म्हणणे काय ? यात फारसा विवाद निर्माण होऊ शकत नाही असेच त्या काळी महिमभट्टानंतरच्या साहित्यशास्त्रज्ञांना वाटले असल्यास नवल नाही. भामहाला स्वतःला ध्वनि ही संज्ञा मान्य नव्हती कारण ती स्फोटवाद्यांची आहे आणि स्फोटनामक तत्त्वाला भामहाचा कडाडून विरोध आहे. त्यामुळे ध्वनिसंज्ञेने जे सौंदर्यतत्त्व सांगितले ते भामहाने नाकारले नाही. वक्रता, अग्राम्यता ह्यासारख्या संज्ञा वापरून ती ध्वनिचीच संकल्पना काव्यासाठी उपयुक्त म्हणून सांगितली. त्यानेही अनुमिती व अनुमान यावर भर दिला. (ह्यासाठी "ध्वनिसिद्धांत" हा मी लिहिलेल्या ग्रंथातील पहिली १८ पाने पहावीत त्यात वरील विधानाचे विस्तृत स्पष्टीकरण आलेले आहे).

काव्यागत अनुमान किंवा अनुमिती ही सौंदर्याधायक असते हे ध्वनिवाद्यांनाही मान्य आहे. पण तेवढ्यानेच भागत नाही म्हणून व्यंजना मानावी लागते हे आनंदवर्धनाने व मम्मटाने आपापल्या ग्रंथातून विस्तृतपणे दाखवून दिलेले आहे. मिमांसक व नैय्यायिक ह्यांची अनुक्रमे तात्पर्यवृत्ती व अनुमिती त्यांनी खोडून काढलेली आहे हे मी नव्याने सांगायला नको. अनुमानाचा उपयोग सौंदर्य निर्मितीसाठी होऊ शकतो म्हणूनच ध्वनि-वाद्यांनी अनुमान हा अलंकार मानलेला आहे. अलंकार रसाची शोभा वाढवितात पण ते रसाचे अंगभूत धर्म नव्हेत हे महिमभट्टासहित सर्वांना मान्य आहे. तरी पण महिमभट्टाच्या व्यक्तिविवेक ह्या ग्रंथाची उपयुक्तता, काव्यामध्ये अनुमितीवाद कसा विहरतो व संस्कृत साहित्यशास्त्रातील इतर वादाप्रमाणेच, अनुमितीवादाला हे बहुरंगी व बहुढंगी स्वरूप कसे प्राप्त झाले आहे ह्याचे पांडित्यपूर्ण विवेचन वाचण्यासाठी, रसिकांना निश्चितच जाणवते आणि म्हणूनच महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने अनुमितीवादाचा रसिकांना परिचय करून देण्यासाठी हा उपक्रम केला. कै. मा. वा. पटवर्धन यांनी खूप मेहनत घेऊन

व निष्पक्ष राहून महिमभट्टाची बाजू मांडली आहे. पण त्याचबरोबर त्याच्या काही मतांचा प्रतिवाद देखील कसा होऊ शकतो, यासंबंधीही गर्भित सूचना दिलेल्या आहेत.

ह्या ग्रंथाला संस्कृतचे विद्वान पंडित डॉ. वा. म. कुलकर्णी यांनी विस्तृत व विवेचक प्रस्तावना जोडलेली आहे. महिमभट्टाच्या नाविन्यपूर्ण प्रतिपादनाचे जोरदार समर्थन त्यांनी सादर केलेले आहे. महिमभट्टाकडे कशा उद्देशाने पाहिले गेले व जाते आहे ही खंतही त्यांनी व्यक्त केलेली आहे. त्यांनी ही प्रस्तावना लिहून मंडळाला उपकृत केलेले आहे.

संस्कृत सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासकांना ह्या परिचय प्रबंधाचा पुरेपूर उपयोग होईल यात संशय नाही.

**डॉ. मधुकर आष्टीकर**

अध्यक्ष,

दिनांक : १४ मे १९९७ — महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# प्राक्कथन

महिमभट्टाच्या व्यक्तिविवेक या ग्रंथावर एक परिचयग्रंथ (*Monograph*) लिहून देण्याचे काम महाराष्ट्र शासनाच्या साहित्य संस्कृती मंडळाने माझ्यावर सोपविले त्याला जवळजवळ साडेतीन वर्षे झाली. व्यक्तिविवेकासारख्या कठीण शास्त्रीय ग्रंथाचे साक्षेपाने पक्के अध्ययन करून त्यामध्ये प्रतिपादिलेल्या अनेक विषयांवर टिपणे तयार करण्यास मला दोन वर्षांहून अधिक काळ लागला व त्यानंतर परिचयग्रंथ लिहिण्याचे काम पूर्ण करण्यास आणखी दीड वर्ष लागले. कारण साहित्य संस्कृती मंडळाच्या आदेशानुसार लोचनटीकेसह ध्वन्यालोकाचे मराठी भाषान्तर व विवरण करण्याची जी कामगिरी मी प्रा. पु. ना. वीरकर यांच्या सहकार्याने स्वीकारली होती, ती पार पडेपर्यंत परिचयग्रंथ लिहिण्याच्या कामास प्रारंभ करणे मला शक्य झाले नाही. ध्वन्यालोकाची कामगिरी पूर्ण झाल्यानंतर मात्र मी व्यक्तिविवेकावरील परिचयग्रंथ लिहिण्याच्या कार्यास प्रारंभ करू शकलो.

हा परिचयग्रंथ लिहिण्याचे काम माझ्यावर सोपविल्याबद्दल मी साहित्य संस्कृती मंडळाचा अत्यंत ऋणी आहे. परिचयग्रंथ लिहून पूर्ण करण्यासाठी जो कालावधी साहित्य संस्कृती मंडळाने प्रारंभी निश्चित केला होता, त्यामध्ये माझ्या विनंतीनुसार वेळोवेळी मुदतवाढ मंजूर करण्याचे जे सौजन्य मंडळाच्या अधिकाऱ्यांनी दाखविले त्याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनी मानावेत हे मला समजत नाही. हा परिचयग्रंथ लिहिण्याची कामगिरी मंडळाने माझ्याकडे सोपविल्यानंतर माझे मित्र प्रा. डॉ. वा. म. कुलकर्णी, मुंबई यानी मोठ्या सहृदयतेने मला वेळोवेळी जे प्रोत्साहन दिले त्याबद्दल त्यांच्याविषयी हार्दिक कृतज्ञता व्यक्त केल्यावाचून हे प्राक्कथन पूर्ण होणे शक्य नाही.

पुणे
११ डिसेंबर १९७९

मा. वा. पटवर्धन

# प्रस्तावना

## काव्यशास्त्रातील शब्दार्थविचार

शब्द व अर्थ हे दोन्ही मिळून काव्याचे शरीर होय याविषयी सर्व आलंकारिकांचे (= साहित्यशास्त्रकारांचे) एकमत आहे.[१] तथापि या काव्य-शरीराचे तात्त्विक व मूलभूत असे विवेचन आनंदवर्धनापूर्वी होऊन गेलेल्या कोणाही आलंकारिकाने केल्याचे दिसून येत नाही. याचे कारण अगदी उघड आहे. हे प्राचीन आलंकारिक व्याकरण, मीमांसा, न्याय इत्यादी शास्त्रातील सिद्धान्त गृहीत धरून चालत आणि या शास्त्रातून आवश्यकतेनुसार हव्या त्या गोष्टी उचलत. त्यातल्या त्यात अलंकारशास्त्राचा व्याकरणशास्त्राशी घनिष्ठ संबंध होता–हे 'अलंकारशास्त्र म्हणजे व्याकरणाचे शेपूट (व्याकरणस्य पुच्छम् ।) होय' या वर्णनावरून लक्षात येईल.

---

१) शब्दार्थौ सहितौ काव्यम् । — भामह : काव्यालंकार १·१६ (अ)
शब्दार्थशरीरं तावत् काव्यम् । — ध्वन्यालोक (१·१) वृत्ति,
बालप्रिया टीकेसह आवृत्ति, पृ. १६
तावद् ग्रहणेन कस्याप्यत्र न विप्रतिपत्तिरिति दर्शयति ।
— ध्वन्यालोक-लोचन (वरील आवृत्ति), पृ. १६

शब्दाची अभिधा वृत्ति (= शक्ति, व्यापार) ही सर्वच शास्त्रांना मान्य आहे. लक्षणा वृत्ति ही न्याय व मीमांसा शास्त्र संमत आहे.[२] परंतु व्यंजना-वृत्ति ही व्याकरण, मीमांसा अथवा न्याय यापैकी कोणत्याही शास्त्राला मान्य नाही. व्यंजनावृत्ति ही स्फोट कल्पनेत गर्भित असली आणि नागेशाने आपल्या परमलघुमंजुषेत अप्रसिद्धा शक्ति म्हणून ती स्वीकारली असली तरी एक स्वतंत्र शब्दवृत्ति म्हणून कोणत्याही प्रमाणभूत व्याकरण ग्रंथात तिचा उघड स्वीकार केल्याचे आढळून येत नाही.[३] आनंदवर्धनाने तर "प्रथमे हि विद्वांसो वैयाकरणाः, व्याकरणमूलत्वात् सर्वविद्यानाम्।" अशा अतिशय गौरव-पर शब्दात वैयाकरणाविषयीचा आपला भाव प्रकट केला आहे (ध्वन्यालोक १.१३ वृत्ति). तेव्हा पाणिनि, कात्यायन, पतंजलि व भर्तृहरिसारख्या महान

---

२) "अभिधा व लक्षणा या दोन शब्दवृत्तींपैकी नैयायिक शब्दाची फक्त अभिधावृत्तीच मानतात. लक्षणेचा अंतर्भाव ते अनुमानात करतात. मीमांसक मात्र अभिधा व लक्षणा अशा दोन शब्दवृत्ति मानतात."– असे ग. त्र्यं. देशपांडे यांनी म्हटले आहे (पहा : भारतीय साहित्यशास्त्र, दुसरी आवृत्ति, पृ. १७७). हे त्यांचे म्हणणे सर्वथैव बरोबर नाही. कारण '*लक्षणापि शब्दवृत्तिः। शक्यसंबन्धो लक्षणा।*' असे तर्कदीपिका म्हणते.

— तर्कसंग्रह : 'शब्द' प्रकरणावरील तर्कदीपिका
(बॉम्बे संस्कृत सीरिज, १९३० आवृत्ति, पृ. ५१)

३) 'सति तात्पर्ये सर्वे सर्वार्थवाचकाः' इति भाष्यमेव गृहाण। तथाहि–शक्तिर्द्विविधा, प्रसिद्धा, अप्रसिद्धा च। आमन्दबुद्धिवेद्यात्वं प्रसिद्धात्वम्, सहृदयहृदयमात्रवेद्यात्वम-प्रसिद्धात्वम्। तत्र गङ्गादिपदानां प्रवाहादौ प्रसिद्धा शक्तिः, तीरादौ च अप्रसिद्धा इति किमनुपपन्नम्। — नागेश : परमलघुमञ्जूषा, पृ. १९
प्रस्तुत संदर्भात काही शंका व प्रश्नांचे समाधानासाठी मी प्रा. गो. वि. देवस्थळी यांना पत्र लिहिले. तत्परतेने त्यांनी मला १६ जुलै १९८० रोजी सविस्तर शंकासमाधानपर पत्र पाठवले. त्या पत्राचा सारांश येथे देणे अस्थानी होणार नाही. "शब्दशक्तींचा स्पष्ट (किंवा अस्पष्टही) उल्लेख पाणिनि व कात्यायन या दोन (व्याकरण-) मुनींच्या कृतीत आढळत नाही. पतंजलीच्या मते 'सर्वच शब्द सर्वच अर्थांचे वाचक असतात' (सति तात्पर्ये सर्वे सर्वार्थवाचकाः।) मात्र त्यानेही प्रत्यक्षतया शब्दशक्तिबाबत काही विवेचन केलेले नाही. पण स्फोट हा व्यंग्य असून ध्वनि हा त्याचा व्यंजक होय असे त्याने म्हटले आहे.

वैयाकरणांच्या कृतीत एखाद्या ठिकाणी जरी त्याला व्यंजनावृत्तीचा स्वीकार करणारे स्पष्ट वचन आढळले असते तर ते उद्धृत करून त्याने व्यंजनावृत्तीचा पक्ष सुदृढ आणि सुस्थिर केला असता यात शंका नाही.

आनंदवर्धनाने आपल्या ध्वन्यालोक नावाच्या युगप्रवर्तक ग्रंथात सर्व-प्रथम, सोपपत्तिक विवेचन करून ध्वनिसिद्धान्ताची आणि व्यंजना नावाच्या (अभिधा व लक्षणा या दोन वृत्तींहून भिन्न व स्वतंत्र अशा) तिसऱ्या शब्द-वृत्तीची स्थापना केली. आनंदवर्धनाला त्याच्या सुदैवाने अभिनवगुप्तासारखा उत्तुंग प्रतिभाशाली, सहृदयशिरोमणि व प्रकांडपंडित समर्थ भाष्यकार लाभला. ध्वन्यालोकावर लोचन नावाची टीका लिहून त्याने मूळ ग्रंथातील प्रतिपाद्य विषय सुस्पष्ट केले. ध्वनि, अभिधा, लक्षणा, व्यंजना या शब्दवृत्ति, रसस्वरूपा-विषयीची विविध मत-मतांतरे, काव्यार्थ, प्रतिभा, व्युत्पत्ति, शब्दार्थहरण इत्यादी विषयावरील त्याच्या लेखनाचा नंतरच्या आलंकारिकांवर जबरदस्त प्रभाव पडला आहे. अभिनवगुप्तासारख्या भाष्यकाराप्रमाणेच मम्मटासारखा महान आलंकारिक– 'व्युत्पन्नशिरोमणि', 'वाग्देवतावतार' यासारखी बिरुदे मिरवणारा–त्याला अनुयायी म्हणून लाभला. या मम्मटाने आपल्या काव्यप्रकाश नावाच्या अलौकिक अलंकारग्रंथात आणि शब्दव्यापार नावाच्या छोट्या निबंध-वजा ग्रंथात अभिधा, लक्षणा आणि व्यंजना या तीन शब्दवृत्तींचे ; वाचक, लाक्ष-णिक व व्यंजक अशा त्रिविध शब्दाचे आणि वाच्यार्थ (= मुख्यार्थ, संकेतितार्थ), लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ अशा तीन अर्थांचे सविस्तर व शास्त्रशुद्ध निरूपण केले

---

या स्फोट-कल्पनेत व्यंग्य-व्यंजक-भावाची कल्पना असून तीमुळे व्यंजनेच्या कल्पनेचे अस्तित्व स्पष्ट दिसते. त्याचप्रमाणे पतंजलीने द्योत्य, द्योतित, द्योत्यते हे शब्द वापरलेले आढळतात. यावरून व्यंजना, द्योत्य-द्योतकभाव ही कल्पना त्याला मान्य आहे असे दिसते. भर्तृहरीने आपल्या *वाक्यपदीयात* काही निपात द्योतक असतात असे सांगितले आहे; आणि अर्थाचे विवेचन करताना त्याने मुख्य, गौण व नान्तरीयक अशा तीन प्रकारच्या अर्थांचा उल्लेख केला आहे. नान्तरीयक या नावाने त्याला लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ अभिप्रेत असावेत. वैयाकरणांनी सूचित केलेला त्रिविध शब्दार्थविभाग ध्वनिकाराने मान्य करून त्याला अधिक सुंदर असे स्वरूप आणून दिले असे म्हणणे वस्तुस्थितीला धरून होईल."

आहे. मम्मटानंतर झालेल्या हेमचंद्र, विद्याधर, विश्वनाथ वगैरे बहुतेक आलंकारिकांनी अभिनवगुप्त व मम्मटाला अनुसरूनच शब्दार्थ विवेचन केले आहे.

## ध्वनीचे विरोधक

'लोचन'कार अभिनवगुप्ताने आणि 'काव्यप्रकाश'कार मम्मटाने आनंदवर्धनाच्या अभिनव आणि अपूर्व अशा ध्वनिसिद्धान्ताला व व्यंजनावृत्तीला खंबीर पाठिंबा देऊन काव्यशास्त्राच्या क्षेत्रात त्याना सुस्थिर केले यात शंका नाही. तथापि या नवीन ध्वनिसिद्धान्ताला आणि व्यंजनावृत्तीला काही साहित्यशास्त्रकारांनी आणि नैयायिकांनी कडाडून विरोध केला असून त्यांच्या युक्तिवादात बरेच तथ्य असल्याचे निःपक्षपाती अभ्यासकास आढळून येईल. ध्वनिसिद्धान्ताला विरोध करणाऱ्या (१२) बारा मतांचा एकत्र निर्देश करणाऱ्या दोन कारिका जयरथाने अलंकारसर्वस्व ग्रंथावरील आपल्या विमर्शिनी नावाच्या टीकेत उद्धृत केल्या आहेत.४ उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रह या ग्रंथावरील लघुवृत्ति नावाच्या आपल्या टीकेत इंदुराजाने ध्वनि हा, उद्भटाने निरूपण केलेल्या पर्यायोक्त, अप्रस्तुतप्रशंसा सारख्या अलंकारातच अंतर्भूत होतो असे सोदाहरण दाखवले आहे.५ ध्वनिसिद्धान्त

---

४) तात्पर्यशक्तिरभिधा लक्षणानुमिती द्विधा।
अर्थापत्तिः क्वचित्तन्त्रं समासोक्त्याद्यलंकृतिः॥
रसस्य कार्यता भोगो व्यापारान्तरबाधनम्।
द्वादशेत्थं ध्वनेरस्य स्थिता विप्रतिपत्तयः॥
— अलंकारसर्वस्व-विमर्शिनी,
[निर्णयसागर आवृत्ति-१९३९, काव्यमाला (३५) पृ. ११]

५) ननु यत्र काव्ये ... कैश्चित् सहृदयैर्ध्वनिर्नाम व्यञ्जकत्वभेदात्मा काव्यधर्मोऽभिहितः स कस्मादिह नोपदिष्टः। उच्यते। एष्वेवालंकारेष्वन्तर्भावात्।
— लघुवृत्तिसमेतः काव्यालंकारसारसंग्रहः,
(एन. डी. बनहट्टी संपादित आवृत्ति, पृ. ८५)
अतश्च पर्यायोक्ताप्रस्तुतप्रशंसयोरेव यथाक्रमं विवक्षिताविवक्षितवाच्ययोः सर्वध्वनिभेदसामान्यभूतयोर्ध्वनिभेदयोरन्तर्गतिर्बोध्या।
— वरील आवृत्ति, पृ. ९१

समूळ उखडून टाकण्यासाठी भट्टनायकाने हृदयदर्पण (सहृदयदर्पण) नावाचा स्वतंत्र ग्रंथ लिहिला होता. दुर्दैवाने तो ग्रंथ नष्ट / लुप्त झाला असल्याने ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनासाठी त्याने कोणता युक्तिवाद केला होता आणि तो कितपत सयुक्तिक होता हे कळावयास मार्ग नाही. त्या ग्रंथातील काही उतारे अभिनवगुप्ताने उद्धृत केलेले सुरक्षित आहेत पण याबाबतीत ते उपयोगी नाहीत. 'व्यक्तिविवेक' नावाच्या ग्रंथावर टीका लिहिणाऱ्या रुय्यकाने 'हृदयदर्पणाख्यो ध्वनिध्वंसग्रन्थः' (पृ. ५) असा या ग्रंथाचा निर्देश केला आहे. 'वक्रोक्तिजीवित'कार कुंतक ध्वनीचा वक्रोक्तीत अथवा भक्तीत (म्हणजे लक्षणेत) अंतर्भाव करतो.६ जयंतभट्ट या अग्रगण्य नैयायिकाने आपल्या न्यायमञ्जरी या नावाच्या ग्रंथात आनंदवर्धनाचा निर्देश 'पण्डितंमन्यः' असा केला असून त्याच्यासारख्या कवीशी शास्त्रार्थ करणे शोभत नाही असे त्याच्याबद्दल कमालीचे तुच्छतेचे उद्गार काढले आहेत.७ त्याच्या मते ध्वनि हा अनुमानातच अंतर्भूत होतो. धनंजयाच्या दशरूपक नावाच्या ग्रंथावरील अवलोक नावाच्या आपल्या टीकेत धनिकाने आनंदवर्धनाच्या व्यंग्यव्यंजकभावाऐवजी भट्ट नायकाचा भाव्यभावकभाव स्वीकारला आहे आणि हे आपले मत स्थापन करण्यापूर्वी व्यंजनावृत्ति कशी अनावश्यक

---

६) कुन्तकेन भक्तावन्तर्भावितो ध्वनिः ।

— विद्याधरः एकावली (त्रिवेदी संपादित, पृ. ११)

इदानीं यद्यप्यन्यैरस्य भक्त्यन्तर्भूतत्वमुक्तं तदपि दर्शयितुमाह ।

— विमर्शिनी (पृ. ९)

उपचारवक्रतादिभिः समस्तो ध्वनिप्रपञ्चः स्वीकृतः । केवलमुक्तिवैचित्र्यजीवितं काव्यं, न व्यङ्ग्यार्थजीवितमिति तदीयं दर्शनं व्यवस्थितम् ।

— अलङ्कारसर्वस्वम् (पृ. १०)

७) एतेन शब्दसामर्थ्यमहिम्ना सोऽपि वारितः ।
यमन्यः पण्डितंमन्यः प्रपेदे कश्चन ध्वनिम् ॥

— न्यायमञ्जरी (काशी संस्कृत सीरिज, पृ. ४५)

अथवा नेदृशी चर्चा कविभिः सह शोभते ।

— वरील आवृत्ति, पृ. ४५

आहे हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.८ या सर्वाहून ध्वनिविरोधी असा जबरदस्त ग्रंथकार म्हणजे महिमभट्ट होय. त्याचा व्यक्तिविवेक [ व्यक्ति = व्यंजना, तिचा विवेक करणे म्हणजे ध्वन्यालोककाराने व्यंजना नावाची नवीनच स्थापन केलेली वृत्ति (शब्दव्यापार) ही मानणे अपरिहार्य आहे का ? – का अगोदरच सर्वमान्य असलेल्या अनुमानाने तिचे काम भागते? याचे युक्तिवादपूर्वक परीक्षण करणे ] हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आणि मोठ्या योग्यतेचा असूनही केवळ तो ध्वनिविरोधी नैयायिकांच्या अनुमानाचे काव्यशास्त्रात प्रस्थ माजवणारा असल्याने नंतरच्या साहित्यशास्त्रकारांकडून व पंडितांकडून एकंदरीत उपेक्षितच राहिला.

हा ग्रंथ लिहिण्यापूर्वी आपण 'हृदयदर्पण' व ('ध्वन्यालोका'वरील टीका) 'चंद्रिका' पाहिलेली नाही असे महिमभट्ट ग्रंथातील प्रारंभीच्या श्लोकात सांगतो. शंकुकाचा अनुमितिवाद अथवा भामहाच्या काव्यालंकारातील न्यायनिर्णय हा पाचवा परिच्छेद त्याने अवलोकिला होता असे दर्शवणाऱ्या खुणा पण त्याच्या ग्रंथात आढळत नाहीत हे मोठे आश्चर्य आहे. तसेच ध्वन्यालोकात आनंदवर्धनाने अनुमानाचा पूर्वपक्ष मांडून त्याचे खंडन करून९ व्यंजनेची स्थापना केली आहे. या खंडनाचा प्रतिवाद महिमभट्टाने केला नाही हे पाहूनही आश्चर्य वाटते.

---

८) ईदृशि च वाक्यार्थनिरूपणे परिकल्पिताभिधादिशक्तिवशेनैव समस्तवाक्यार्थावगतेः शक्त्यन्तरपरिकल्पनं प्रयासः । यथावोचाम काव्यनिर्णये —
तात्पर्यानतिरेकाच्च व्यञ्जनीयस्य न ध्वनिः ।
किमुक्तं स्यादश्रुतार्थतात्पर्येऽन्योक्तिरूपिणि ॥
एतावत्येव विश्रान्तिस्तात्पर्यस्येति किंकृतम् ।
यावत्कार्यप्रसारित्वात्तात्पर्यं न तुलाधृतम् ॥
अतो न रसादीनां काव्येन सह व्यङ्ग्यव्यञ्जकभावः । किं तर्हि ? भाव्यभावकसंबन्धः । काव्यं हि भावकं भाव्या रसादयः । ते हि स्वतो भवन्त एव भावकेषु विशिष्टविभावादिमता काव्येन भाव्यन्ते ।

— दशरूपकावलोक (४·३७)

९) वरील आवृत्ति, तिसरा उद्योत, कारिका ३३ वरील वृत्ति, पृ. ४४८–४५५.

## शंकुकाचा अनुमितिवाद

या ठिकाणी श्रीशंकुकाच्या अनुमितिवादाचा आणि भामहाच्या अनुमानाचा (अर्थात् काव्यानुमानाचा) महिमभट्टाच्या अनुमान अथवा अनुमिति-पक्षाशी कितपत संबंध आहे हे पाहण्याच्या दृष्टीने त्यांचा विस्ताराने विचार करणे अस्थानी होणार नाही. भरताच्या प्रसिद्ध रससूत्राचे विवरण करताना अभिनवगुप्ताने आपल्या अभिनवभारतीत[१०] आणि त्याला अनुसरून मम्मटाने आपल्या काव्यप्रकाशात[११] श्रीशंकुकाने लावलेला रससूत्राचा अर्थ थोडयाफार संक्षेपविस्ताराने दिला आहे. तो असा : घोडयाचे चित्र पाहून जसे 'हा घोडा आहे' असे ज्ञान होते,[१२] तसे रामाची भूमिका करणाऱ्या नटाला पाहून 'हा राम आहे' असे ज्ञान सामाजिकाला (=प्रेक्षकाला) होते. हे ज्ञान सम्यग्-ज्ञान, मिथ्याज्ञान, संशयज्ञान आणि सादृश्यज्ञान या चार प्रकारच्या ज्ञानाहून

---

१०) नाट्यशास्त्र ऑफ भरतमुनि विथ द कॉमेंटरी अभिनवभारती बाय अभिनवगुप्ताचार्य, खंड पहिला, १९५६, पृ. २७२–२७३

११) मम्मटाचार्यविरचितः काव्यप्रकाशः (बालबोधिन्याख्यटीकया समन्वितः), भाण्डारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, १९५०, पृ. ८८–९०

१२) 'चित्रतुरगादिन्याय' ही शब्दसंहिता मम्मटानेच प्रथम श्रीशंकुकाच्या रससूत्राच्या विवरणाच्या संदर्भात योजिली आहे. अभिनवगुप्ताने मात्र ध्वन्यालोकावरील लोचन टीकेत 'दुसरे कोणी असे म्हणतात' असे म्हणून "भित्ताविव हरितालादिना अश्वावभासः" असे शब्द योजिले आहेत (वरील आवृत्ति, पृ. १८६). अभिनवभारतीत श्रीशंकुकाच्या 'रससूत्रविवरणा'वर आक्षेप घेऊन 'तस्माद् भावानुकरणं रसा इत्यसत्।' हा निर्णय करण्यापूर्वी भट्ट तोताने "यच्चोच्यते वर्णकैर्हरितालादिभिः संयुज्यमान एव गौरित्यादि। ..... न हि सिन्दूरादिभिः पारमार्थिको गौरभिव्यज्यते ...... गोसदृगिति प्रतिभासस्य विषयः। ......" (पृ. २७६) असे म्हटले आहे. प्रस्तुत दोन परिच्छेद लक्षात घेऊनच मम्मटाने "चित्रतुरगादिन्यायेन" हे शब्द श्रीशंकुकाच्या रससूत्रव्याख्यानात योजिले असावेत. मम्मटासारखा साक्षेपी ग्रंथकार आधाराशिवाय हा न्याय श्रीशंकुकाचा असे म्हणणे शक्य नाही.

वेगळे असते. रामाची भूमिका करणाऱ्या नटाला पाहून 'हा रामच आहे, हाच राम आहे' असे निश्चयात्मक ज्ञान होत असते तर त्याला सम्यग्-ज्ञान म्हणता आले असते. 'हा राम आहे' असे नाटकात प्रेक्षकाला जे ज्ञान होते त्याचा नाटक संपेपर्यंत बाध झालेला नसतो म्हणून ह्या ज्ञानाला मिथ्या असेही म्हणता येत नाही. रामाची भूमिका करणाऱ्या नटाकडे नाटकाच्या वेळी पाहत असतांना 'हा राम होय का नव्हे,' असे वाटत राहिले असते तर ते संशयज्ञान म्हणता आले असते; आणि 'हा रामासारखा आहे' असे वाटत राहिले असते, तर ते सादृश्यज्ञान म्हणता आले असते. या चारही प्रकारांपैकी काही न होता चित्रतुरगादिन्यायाने नटाचे 'हा राम आहे' असे ज्ञान होते. नाटक पाहताना वस्तुतः नटाच्या ठिकाणी नसलेले रति वगैरे स्थायिभाव त्याच्या ठिकाणी असल्याचे ज्ञान प्रेक्षकांना होते, ते अनुमानाने होते. विभावादि हे या अनुमानातील हेतु (=लिंग, साधन, गमक, ज्ञापक) होय. नटाच्या ठिकाणचा स्थायिभाव हे साध्य (गम्य, ज्ञाप्य) होय. प्रस्तुत साध्याचा विभवादिंशी गम्य-गमक (=ज्ञाप्य--ज्ञापक) या नात्याने संबंध म्हणजेच भरताच्या रससूत्रातील संयोग. हे विभावादि खरोखर कृत्रिम (नकली, असत्य) असतात. [खऱ्या रामाच्या जीवनामध्ये रत्यादी भावांची जी कारणे, कार्ये, आणि सहकारी कारणे घडून आली असतील ती अस्सल (अकृत्रिम, सत्य) होत.] हा फरक दाखवण्यासाठीच कारण, कार्य, सहकारिकारण या लौकिक व्यवहारातील संज्ञांनी त्यांचा नामनिर्देश न करता, विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव अशा 'अलौकिक' (लौकिक व्यवहाराहून भिन्न) संज्ञांनी नामनिर्देश केला जातो. विभाव वगैरे कृत्रिम (खोटे, नकली, असत्य) असूनही नट हा काव्याचे अनुसंधान, अभिनयाचे शिक्षण आणि अभ्यास (सततची मेहनत) यांच्या बळावर ते तसे (कृत्रिम, खोटे) असल्याची जाणीव प्रेक्षकांना होऊ देत नाही. या विभाव वगैरेवरून प्रेक्षक नटाच्या ठिकाणी रति वगैरे स्थायिभाव असल्याचे अनुमान करतात. हे रति वगैरे स्थायिभाव अनुमानाने नटाच्या ठिकाणी प्रतीत होत असले तरी (न्याय-) शास्त्रीय अनुमानाने प्रतीत होणाऱ्या इतर–उदाहरणार्थ, धूमावरून ज्ञात होणाऱ्या अग्नीसारख्या–पदार्थाहून ते

अगदी वेगळे असतात. कारण ते वस्तुसौंदर्यामुळे[१३] रसनीय (आस्वाद्य, चर्वणापात्र, आस्वाद घ्यावयास योग्य) असतात (याउलट धूमावरून ज्ञात होणारे अग्नीसारखे पदार्थ हे रूक्ष व नीरस असल्याने रसनीय अथवा आस्वाद्य नसतात.) आणि हे रति वगैरे स्थायिभाव नटाच्या ठिकाणी विद्यमान (=उपस्थित) नसताही प्रेक्षकाकडून रसिकतेने[१४] आस्वादिले जातात. आस्वादाचा अथवा चर्वणेचा विषय झाल्याने हे रति वगैरे भाव शृंगार वगैरे रस ठरतात. कृत्रिम अनुमितीच्या विभाव वगैरेंनी ज्ञात झालेल्या रति वगैरे स्थायिभावाची प्रेक्षकाला चर्वणा कशी करता येईल?" असे जर कुणी म्हणेल तर त्यावर श्रीशंकुक, "कृत्रिम विभाव वगैरेवरून होणारे रति वगैरे स्थायिभावाचे ज्ञान मिथ्याज्ञान आहे" ही गोष्ट वादाकरता क्षणभर मान्य

---

१३) 'वस्तुसौन्दर्यबलात्' असे मुळात आहे (वरील आवृत्ति, काव्यप्रकाश, पृ. ९०). झळकीकर वस्तुसौंदर्य या शब्दसंहितेचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करतात: "वस्तुनोऽनुमीयमानायाः रतेः सौन्दर्यं चमत्कारिता।" म्हणजे अनुमित केल्या जाणाऱ्या रति वगैरे भावांचे सौंदर्य. दुसऱ्या शब्दात रति वगैरे स्थायिभाव स्वभावतःच सुंदर असतात. वस्तूचे स्वाभाविक सौंदर्य असा अर्थ घ्यावला ध्वन्यालोकलोचनातील (वरील आवृत्ति, पृ. ४९६) पुढील दाखला अनुकूल आहे: "......नैव तत्र रसप्रतीतिरस्ति यथा पाकानाभिज्ञसूदविरचिते मांसपाकविशेषे। *ननु वस्तुसौन्दर्यादेवरस्यं भवति कदाचिन्नपास्वादोऽकुशलकृतायामपि शिखरिण्यामिव* ......" वस्तुसौंदर्याचा दुसऱ्या रीतीनेही अर्थ करणे शक्य आहे. वस्तूचे अर्थात कथावस्तूचे सौंदर्य म्हणजेच कवीने आपल्या प्रतिभेच्या बळावर शब्दार्थ, गुण, अलंकार, वक्रोक्ति, ध्वनि इत्यादी काव्यसौंदर्यतत्त्वांच्या औचित्यपूर्ण योजनेने कथावस्तूत ओतलेले सौंदर्य; तसेच नटानेही आपल्या अप्रतिम अभिनयकौशल्याच्या द्वारा विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव वगैरेंचा रसिक प्रेक्षकापुढे केलेला सुंदर आविष्कार.

१४) मुळात 'वासनया' असे पद आहे. झळकीकर वासना शब्दाचा अर्थ 'धारावाहिनी इच्छा वासना' (वरील आवृत्ति, पृ. ९०) असा देतात. वासनया म्हणजे "वासनाबलाने–इच्छाबलाने" असा अर्थ अर्जुनवाडकर आणि मंगरूळकर करतात (पहा: मम्मटभट्ट विरचित काव्यप्रकाश, देशमुख प्रकाशन, पुणे १९६२, पृ. १३८). "प्रतिभा आणि वासना हे साहित्यशास्त्रात पर्याय आहेत" असे

करून, उत्तर देतो की केव्हा केव्हा मिथ्याज्ञानापासूनही अर्थक्रिया (अर्थात् प्रयोजनसिद्धि, उद्दिष्टाचे साफल्य) घडते असे दिसून येते. तेव्हा कृत्रिम (खोटचा) विभाव वगैरेंनी ज्ञात झालेल्या स्थायिभावाचा आस्वाद प्रेक्षकाला घेता येतो. पण खरे पाहू गेले असता स्थायिभावाचे ज्ञान हे सम्यग्ज्ञान, मिथ्याज्ञान, संशय, सादृश्य या प्रकारांच्या ज्ञानाहून वेगळे आहे आणि जरी हे ज्ञान प्रसिद्ध अशा सर्वज्ञानप्रकाराहून वेगळे ठरत असले तरी ते अनुभवसिद्ध असल्यामुळे कोणालाही ते नाकारता येणार नाही.[१५]

## महिमभट्टाचा काव्यानुमितिवाद

शंकुकानंतर सुमारे २०० वर्षांनी महिमभट्टाने आपला व्यक्तिविवेक हा ग्रंथ आनंदवर्धनाच्या ध्वनिसिद्धान्त आणि व्यंजनासिद्धान्त खोडून काढण्यासाठी लिहिला. वाच्यार्थाहून वेगळा रसादि अर्थच काव्याचा आत्मा आहे या आनंदवर्धनाच्या मताशी तो सहमत आहे.[१६] त्याचा मतभेद आहे, तो "हा वाच्यार्थाहून वेगळा असा रसादि अर्थ ' कशा रीतीने कळतो याविषयी आहे.

---

ग. त्र्यं. देशपांडे म्हणतात आणि या अर्थाच्या समर्थनासाठी प्रदीपकारांचे वचन अगोदर उद्धृत करतात : " प्रतिभाशुप्रामित्यनेन *नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा प्रतिभा वा वासना इत्युच्यते* " (पहा : भारतीय साहित्यशास्त्र, पृ. २१९-२०). राजशेखराप्रमाणे प्रतिभा दोन प्रकारची आहे. एक कारयित्री आणि दुसरी भावयित्री. भावयित्री प्रतिभा म्हणजेच रसिकता आणि हाच ' वासना ' शब्दाचा अर्थ पुढील वचनात अभिप्रेत आहे :

सवासनानां नाट्यादौ रसस्यानुभवो भवेत् ।
निर्वासनास्तु रङ्गान्तर्वेश्मकुड्याश्मसंनिभाः ॥

— काव्यप्रकाश (बालबोधिनी आवृत्ति), पृ. ९२ वर उद्धृत.

विश्वनाथ आपल्या साहित्यदर्पणात (तृतीय परिच्छेद, ८–९) "उक्तंच धर्मदत्तेन" असे म्हणून हाच श्लोक (पाठभेद असलेला) देतो. त्याचा प्रथमार्ध असा आहे : सवासनानां सभ्यानां रसस्यास्वादनं भवेत् ।

१५) युक्त्या पर्यनुयुज्येत स्फुरन्ननुभवः कया । — वरील आवृत्ति, पृ. २७३

१६) काव्यस्यात्मनि संज्ञिनि रसादिरूपे न कस्यचिद्विमतिः । — व्यक्तिविवेक १·२६

अभिधा आणि लक्षणा या दोन शब्दवृत्तीहून भिन्न अशा तिसऱ्या शब्दाच्या व्यंजनावृत्तीने तो कळतो" असे आनंदवर्धन म्हणतो तर "अभिधा ही एकच शब्दवृत्ति आहे. तथाकथित लक्षणा आणि व्यंजना ह्या दोन्ही शब्दवृत्ति अनुमानातच[१७] अंतर्भूत होतात आणि तो रसादि अर्थ अनुमानाने ज्ञात होतो" असे महिमभट्ट म्हणतो. या अनुमानाचे स्वरूप असे :

धूमावरून अग्नीचे अनुमान होते. या अनुमानात ज्याप्रमाणे धूम हा लिंग आणि अग्नि हा लिंगी असतो त्याप्रमाणे काव्यातून रसादि अर्थ प्रतीत होताना वाच्यार्थ हा लिंग आणि रसादि अर्थ हा लिंगी असतो. या रसादि अर्थाचा निर्देश तो 'अनुमेय अर्थ' अथवा 'काव्यानुमिति' असा करतो. हा 'अनुमेय अर्थही' केव्हा केव्हा आणखी वेगळ्या अशा तिसऱ्या अर्थाच्या ज्ञानाचे लिंग होतो. अशा ठिकाणी दोन अनुमेय अर्थात लिंगलिंगिभाव असल्याचे आढळते. लिंगावरून लिंगीचे ज्ञान म्हणजे अनुमिति होय. आता, "शब्दाच्या ठिकाणी अभिधा ही एकच वृत्ति असते आणि वाक्यातील शब्द ऐकल्यानंतर किंवा वाचल्यानंतर त्यांच्या वाच्यार्थाहून निराळे जे जे अर्थ प्रतीत होतात ते ते अनुमानानेच" असा नैयायिकांचा सिद्धान्त आहे.

साहित्याच्या प्रांतात प्रथम श्रीशंकुकाने नैयायिकांच्या या सिद्धान्ताचा, भरताच्या प्रसिद्ध रससूत्राचा अर्थ करताना, उपयोग केल्याचे दिसते. विभावादि सामग्री लिंग होय व अनुकर्त्या (नटा)च्या ठिकाणचा स्थायी लिंगी होय[१८] असे तो म्हणतो. सूत्रातील "संयोगात्"[१९] शब्दाचा 'गम्यगमकभावरूपात्' असा अनुवाद करतो. फक्त हे अनुमान शास्त्रीय अनुमानाहून काहीसे वेगळे

---

१७) शब्दस्यैकाभिधा शक्तिरर्थस्यैकैव लिङ्गता । — व्यक्तिविवेक १·२७

१८) 'विभावाद्ययोगे स्थायिनो लिङ्गाभावेनावगत्यनुपपत्तेः' व
'अनुकर्तृस्थत्वेन लिङ्गबलतः प्रतीयमानः स्थायी भावः'
— अभिनवभारती (बरील आवृत्ति), पृ. २७२

१९) कारणकार्यसहकारिभिः .... विभावादिशब्दव्यपदेश्यैः

असते–कारण ते रूक्ष व नीरस नसून सुंदर, आल्हादजनक असते–असे त्याने म्हटले आहे.[२०]

## भामहाचे काव्यप्रत्यक्ष व काव्यानुमान

न्यायशास्त्रातील अनुमान हे यथार्थज्ञानजनक व काटेकोर असते. काव्य-नाटच क्षेत्रातील अनुमान ढोबळ, शिथिल अथवा सैल असते पण त्याबरोबरच ते आल्हादक असते. प्रत्यक्ष आणि अनुमान ही न्यायशास्त्रातील दोन्ही प्रमाणे–प्रमाण म्हणून–काटेकोर स्वरूपाची आणि यथार्थज्ञानजनक असलीच पाहिजेत. काव्याच्या क्षेत्रात त्यांचे स्वरूप काहीसे वेगळे असते आणि यथार्थज्ञानजनकतेवर त्यांचा भर नसतो याची सुरेख व सोदाहरण चर्चा भामहाने आपल्या काव्यालंकार या नावाच्या ग्रंथात–न्यायनिर्णय[२१] नावाच्या पाचव्या परिच्छेदात–केली आहे. जिज्ञासूनी ती मुळातच पाहावी. येथे केवळ दिग्दर्शन करून संतोष मानला पाहिजे. काव्यप्रत्यक्ष आणि शास्त्रप्रत्यक्ष हे पुष्कळदा भिन्न असते. भामहाने दिलेल्या पुढील उदाहरणा-वरून हे स्पष्ट होईल. "आकाश तलवारीच्या पात्याप्रमाणे निळे आहे. हा

---

२०) "संयोगात्" गम्यगमकभावरूपात् अनुमीयमानोऽपि वस्तुसौंदर्यबलाद् रसनीयत्वेनान्यानुमीयमानविलक्षणः ...

— काव्यप्रकाश (वरील आवृत्ति), पृ. ८९–९०

२१) श्लोक ३२–६०; भामह काव्य आणि आगम (शास्त्र) यातील भेद दाखवताना म्हणतो :

लक्ष्म प्रयोगदोषाणां भेदेनानेन वर्त्मना ।
सन्धादिसाधनासिद्ध्यै शास्त्रेपूदितमन्यथा ॥
तज्ज्ञैः काव्यप्रयोगेषु तत्त्वादुष्कृतमन्यथा ।
तत्र लोकाश्रयं काव्यमागमास्तत्त्वदर्शिनः ॥–३२–३३

तुलना : न स्वरूपनिबन्धनमिदं रूपमाकाशस्य सरित्सलिलादेर्वा किन्तु प्रतिभास-निबन्धनम् । न च प्रतिभासस्तादात्म्येन वस्तुन्यवतिष्ठते ।

— काव्यमीमांसा (बडोदा आवृत्ति, १९३४), पृ. ४४

शब्द (आवाज) दुरून ऐकू येतो. नद्यांचे तेच ते पाणी आहे. आणि काय आश्चर्य! सूर्य-चंद्र वगैरे महाज्योति केवढ्या स्थिर आहेत."२२

तत्त्वतः पाहता ही वर्णने सत्य नाहीत. शास्त्राप्रमाणे आकाशाला रंगच नाही; शब्द कर्णशष्कुलीतच असतो; नद्यांचे पाणी क्षणोक्षणी बदलत असते; आणि चंद्र-सूर्य वगैरे आकाशातील ग्रहगोल काही स्थिर नसतात. परंतु लोकानुभवावर आधारलेली असल्याने काव्याच्या क्षेत्रात ती सत्यच होत. काव्यानुमानाचे पुढील उदाहरण पाहावे :

"ज्या अर्थी कुररींचे (सारस अथवा क्रौंच पक्षिणींचे) कूजन ऐकू येत आहे आणि कमळांचा सुगंध पसरला आहे त्या अर्थी या विस्तीर्ण वनात जवळच कोठे तरी सरोवर असले पाहिजे."२३ या ठिकाणी 'सरोवराचे अस्तित्व' हे साध्य आहे व 'कूजन' आणि 'सौरभ' हा हेतु आहे. कूजन व सौरभ हे काही साक्षात् सरोवराचे धर्म नव्हेत. तथापि 'अन्यधर्मोऽपि तत्सिद्धिं संबन्धेन करोत्ययम्' या भामहवचनाप्रमाणे हे लोकाधिष्ठित अनुमान सत्य आहे.

## भामहाचे श्रेय

याप्रमाणे काव्यप्रत्यक्ष आणि काव्यानुमान यांचे लोकाश्रयाच्या म्हणजे लोकानुभवाच्या आधारावर स्वरूप स्पष्ट करून त्यांचे न्यायशास्त्रीय प्रमाणाहून वेगळेपण कसे आहे हे भामहाने दाखवले आहे. आनंदवर्धनापूर्वी भामह होऊन गेला. त्यामुळे ध्वन्यालोकात आनंदवर्धनाने युक्तिवादपूर्वक स्थापन केलेल्या ध्वनितत्त्वाचा आणि व्यंजनावृत्तीचा त्याने स्वीकार करण्याचा

---

२२) असिसंकाशमाकाशं शब्दो दूरानुपात्ययम् ।
तदेव वारि सिन्धूनामहो स्थेमा महार्चिषः ॥ – ३४

२३) यथाभितो वनाभोगमेतदस्ति महत्सरः ।
कूजनात्कुररीणां च कमलानां च सौरभात् ॥
अन्यधर्मोऽपि तत्सिद्धिं संबन्धेन करोत्ययम् ।
धूमादभ्रंकषात्साग्नेः प्रदेशस्यानुमामिव ॥ ४८–४९

अथवा त्यांचे खंडन करण्याचा प्रश्नच नव्हता.२४ परंतु काव्यातील प्रत्यक्ष आणि अनुमान यांचे, शास्त्रीय ग्रंथात प्रमाण म्हणून स्वीकारलेल्या प्रत्यक्ष व अनुमानाहून, स्वरूप कसे वेगळे आहे ते त्याने सोदाहरण प्रथमच प्रतिपादन केले आहे. हे त्याचे श्रेय त्याला मोकळ्या मनाने सर्वांनी दिले पाहिजे.

महिमभट्टापूर्वी होऊन गेलेल्या शंकुकाने भरताच्या प्रसिद्ध रससूत्राचे– विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद् रसनिष्पत्तिः – विवरण करताना सर्वप्रथम अनुमानप्रक्रियेचा उपयोग केल्याचे दिसून येते. विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव हे सर्व मिळून हेतु (साधन, लिंग, ज्ञापक, अनुमापक, गमक) रस (भाव वगैरे) अर्थ हे साध्य (लिंगी, ज्ञाप्य, अनुमेय, अनुमाप्य, गम्य) आणि 'संयोगाद्' म्हणजे गम्यगमकभावरूपसंयोगात् असे त्याने आपल्या विवरणात स्पष्ट केले आहे. या त्याच्या निःसंदिग्ध विवरणावरून श्रीशंकुक आणि महिमभट्ट यांचे अनुमितिवादाविषयी पूर्णपणे एकमत आहे असा निष्कर्ष निघतो. तर मग महिमभट्टाने स्वमताच्या पुष्टचर्थं शंकुकमताचा हवाला आपल्या ग्रंथात कोठेही का दिला नाही याचे कोडे पडते. कदाचित् "अभिधा हा शब्दाचा एकच व्यापार आहे, 'लक्षणा' आणि 'व्यंजना' या वृत्ति अनुमानातच अंतर्भूत होतात" असा प्राचीन नैयायिकांचा सिद्धान्त असल्याने आणि त्याचाच त्याने अवलंब केला असल्याने शंकुकाच्या अनुमितिवादाचा हवाला देण्याची त्याला आवश्यकता वाटली नसावी.

## महिमभट्टाचे श्रेय

महिमभट्टाची दोषमीमांसा सर्वमान्य झाली. परंतु त्याचा काव्यानुमितिवाद अथवा अनुमानपक्ष हा त्याच्याबरोबरच संपला, असे आढळून येते.

---

२४) भामहाने काव्यालंकाराच्या सहाव्या शब्दशुद्धि नावाच्या परिच्छेदात जी शब्दचर्चा केली आहे त्यावरून त्याने व्यंजनावृत्तीला अथवा ध्वनिसिद्धान्ताला मान्यता दिली असती असे वाटत नाही. या दृष्टीने त्याचा खालील श्लोक खूप बोलका अथवा सूचक आहे :

शपथैरपि चादेयं वचो न स्फोटवादिनाम्।
नभःकुसुममस्तीति श्रद्दध्यात् कः सचेतनः॥ — काव्यालंकार ६·१२

मम्मटाने आपल्या काव्यप्रकाशाच्या पाचव्या उल्लासाच्या अखेरीस[२५] महिमभट्टाच्या 'अनुमानपक्षा'चे, त्याचे नाव न घेता, परीक्षण करून खंडन केले आहे. शास्त्रातील अनुमानाचा उद्देशच यथार्थज्ञान हा असतो. तर्कशास्त्राच्या चौकटीत काव्यातील अनुमान ढोबळ अर्थानेच बसेल. ते रंजनात्मक असल्याने प्रमाण या दृष्टीने यथार्थज्ञानजनक आणि काटेकोर स्वरूपाचे असणार नाही. हे लक्षात घेऊनच ध्वनीचे मम्मटासारखे खंदे पुरस्कर्ते काव्यानुमितिवाद खोडून काढतात. अनुमानाच्या बाबतीतील मम्मटासारख्या साहित्यशास्त्रकारांचा हा यथार्थपणाचा आणि काटेकोरपणाचा आग्रह अनाकलनीय आहे.

## काव्यानुमितिवाद का स्वीकारावा?

'अनुमानपक्षा'चा विरोधक स्वतः अभिनवगुप्त सहृदयाच्या ठिकाणी "दुसऱ्यांच्या स्थायीस्वरूप चित्तवृत्तीचे अनुमान करण्याच्या सरावाने प्राप्त झालेली कुशलता अथवा नैपुण्य" हवे असे आपल्या रससूत्रप्रतिपादनात निक्षून सांगतो.[२६] तसेच मम्मट, रुय्यक, विश्वनाथ अप्पय दीक्षित, जगन्नाथ यासारखे साहित्यशास्त्रकार काव्यलिंग आणि अनुमान हे अलंकार म्हणून, खळखळ न करता स्वीकारतात (अर्थात् चमत्कृति = विच्छित्ति त्यात हवी, त्यासाठी त्यातील हेतू कविप्रतिभानिर्मित हवा, तो धूमासारखा रूक्ष, नीरस नसावा हे ते गृहीतच धरतात.) येथील अनुमान शास्त्रपूत पाहिजे असे ते बिलकूल म्हणत नाहीत. [तर्क- (अथवा न्याय-) शास्त्रातील सर्व अटी काटेकोरपणे पाळल्याच पाहिजेत असा त्यांचा दंडक नाही]. आलंकारिक (अथवा साहित्यशास्त्रकार) 'चित्रतुरगादिन्याय' स्वीकारून रसप्रतीति ही सम्यग्ज्ञान, मिथ्याज्ञान

---

२५) वरील आवृत्ति (पृ. २५२-२५६)

२६) तत्र लोकव्यवहारे कार्यकारणसहचारात्मकलिङ्गदर्शने स्थाय्यात्मपरचित्तवृत्त्यनुमानाभ्यासपाटवाद् .........

— वरील आवृत्ति, पृ. २८४

तसेच 'तथा हि लौकिकेनानुमानेन संस्कृतः प्रमदादि न ताटस्थ्येन प्रतिपद्यते...

— वरील आवृत्ति, पृ. २८४

संशयज्ञान व सादृश्यज्ञान या रूढ प्रतीति-प्रकारात मोडत नसल्याने ती अलौकिक असल्याचा उद्बोध करतात. मणि-प्रदीप-प्रभा दृष्टान्त उद्धृत करून मिथ्याज्ञानापासूनही अर्थक्रिया (प्रयोजनसिद्धि) होते असे रसानुभवाच्या विवेचनात सांगतात. कविसृष्टि ही ब्रह्मदेवाच्या सृष्टिपेक्षा श्रेष्ठ व ब्रह्मदेवाच्या सृष्टीतील नियमांना झुगारून देणारी आहे असे अभिमानाने ते वर्णन करतात. सर्व अर्थालंकारांच्या मुळाशी 'आहार्य ज्ञान'च आहे असे गृहीत धरतात; या आलंकारिकांनी काहीही खळखळ न करता "प्रतीयमान अर्थाची प्रतीति अनुमानाने होते, त्यासाठी नवी, अपूर्व अशी व्यंजनावृत्ति मानण्याची बिलकूल आवश्यकता नाही" ह्या महिमभट्टाच्या मताचा स्वीकार करायला हवा होता. भामहाने वर्णिलेले काव्यगत प्रत्यक्ष सत्य म्हणून ते स्वीकारतात, मात्र त्याने वर्णिलेले काव्यगत अनुमान ते स्वीकारावयास तयार नाहीत. हा 'अर्धजरतीय न्याया'चा प्रकार झाला. तटस्थ अभ्यासकांना तो मान्य होणार नाही. पूर्वीच्या मम्मटादिकांनी महिमभट्टाची काव्यार्थज्ञानविषयक काव्यानुमितीची उपपत्ति जरी नाकारली तरी आधुनिक विद्वानांनी समतोलपणे विचार करून, कोणत्याही अभिनिवेशाला बळी न पडता न्यायाचार्य महिमभट्टाला त्याचे योग्य ते श्रेय द्यावे असे येथे सांगावेसे वाटते.२७

---

२७) प्रस्तुत वादाचा समारोप प्रा. पटवर्धनांनी प्रस्तावना लेखकाला पाठवलेल्या आपल्या (पुणे–४, दिनांक २९ जून १९८०) पत्रात पुढीलप्रमाणे केला आहे :

"वाच्य-वाचक संबंध, लक्ष्य-लक्षक संबंध, संपूर्ण वाक्य व त्याचा एकमुखी तात्पर्यार्थ यामधील संबंध, अनुमापक-अनुमेय संबंध व ध्वनिवाद्यांचा व्यंग्य-व्यंजक संबंध हे सर्व एका व्यापक गम्य-गमक संबंधाचे विशिष्ट आविष्कार आहेत असे मला वाटते. निरनिराळ्या शास्त्रकारांनी आपापल्या दृष्टिकोनातून एकाच गम्य-गमक संबंधाला निरनिराळी नावे देऊन त्याचे विवेचन केलेले आहे. गम्य-गमक संबंध हेच खरे व्यापक सत्य असून इतर सर्व संबंध त्याची विशिष्ट स्वरूपे आहेत असे म्हणता येईल. या संदर्भात उपनिषदातील "वाचारम्भणं विकारो नामधेयं, मृत्तिकेत्येव सत्यम्" या वचनाची आठवण होते. मृत्तिका

# परिचयग्रंथकाराचे अभिनंदन

संस्कृत व प्राकृतचे नामांकित प्राध्यापक म्हणून प्रा. मा. वा. पटवर्धन यांचा साऱ्या महाराष्ट्रात लौकिक आहे. चार तपाहून अधिक त्यांचा प्राचीन भारतीय (अर्थात् संस्कृत) साहित्यशास्त्राचा गाढ अभ्यास आहे. 'नामूलं लिख्यते किञ्चित्' असा त्यांचा बाणा आहे. महिमभट्टाचा व्यक्तिविवेक हा साहित्यशास्त्रावरील ग्रंथ अत्यंत कठीण म्हणून प्रसिद्ध आहे. या ग्रंथात आनंदवर्धनाच्या ध्वनिसिद्धान्ताचे खंडन करून महिमभट्टाने आपल्या काव्यानुमिति सिद्धान्ताची स्थापना केली आहे. आणि विवेचनाच्या ओघात अनेक साहित्यशास्त्रविषयक प्रश्नांची चर्चा करून त्याने स्वतःची स्वतंत्र मतेही मांडली आहेत. साहजिकच या ग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण असे आहे. या अतिशय अवघड अशा ग्रंथाचे प्रा. पटवर्धन यांनी पांक्त अध्ययन केले असल्याच्या खुणा प्रस्तुत परिचयग्रंथात पानोपानी आढळतात. तसेच हा ग्रंथ तयार करताना त्यांनी खूप परिश्रम घेतले असल्याचे त्यांच्या टीपावरून स्पष्ट दिसून येते; आणि त्यांनी आपली दृष्टि पूर्वग्रहदूषित अथवा अभिनिवेशाची न ठेवता समतोल चिकित्सक व चोखंदळ ठेवल्याचेही दिसून येते. विषयप्रतिपादन तौलनिक, विवेचक दृष्टिकोणातून करून त्यांनी मूळ

---

हे उपादानकरण, घट, शराव, उदंचन इत्यादी निरनिराळ्या आकारांच्या पात्रांना व्यापून राहिलेले असते. तसेच गम्य-गमकत्व हा व्यापक संबंध वाच्य-वाचकत्व, लक्ष्य-लक्षकत्व, अनुमेय-अनुमापकत्व, व्यंग्य-व्यंजकत्व इत्यादी संबंधाना व्यापून राहिलेला आहे. तात्त्विक दृष्ट्या हे जरी खरे असले तरी व्यवहाराच्या पातळीवर उतरून शास्त्रीय चर्चा करताना, त्या एकाच गम्य--गमक-भावाचे विश्लेषण करून निरनिराळ्या परिस्थितींमध्ये त्याचे विशिष्ट आविष्कार कसे दृष्टीस पडतात हे दाखविणे इष्ट व आवश्यक ठरते. गम्य--गमक-भाव हा Synthetic View आहे, तर वाच्य-वाचक-भाव इत्यादी Analytical Views आहेत, असे मला वाटते. निरनिराळ्या विशिष्ट वादांचा पुरस्कार केल्यामुळे निरनिराळ्या आचार्यांनी साहित्यशास्त्रविषयक विचारांना समृद्ध केले आहे असे म्हणता येईल."

ग्रंथकाराला आणि त्याच्या ग्रंथाला पूर्ण न्याय दिला आहे. मूळ संस्कृत ग्रंथाचे सम्यग् आलोडन व परिशीलन करून मराठी माध्यमातून साहित्यशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या प्रौढ वाचकापुढे त्यांनी 'व्यक्तिविवेका'चे नवनीतच या परिचयग्रंथाच्या रूपाने ठेवले आहे. असा हा सर्वांगसुंदर परिचयग्रंथ लिहिल्याबद्दल प्रा. पटवर्धन सर्वथैव हार्दिक अभिनंदनास पात्र आहेत.

वा. म. कुलकर्णी

# १

# व्यक्तिविवेकपरिचय

## ग्रंथ व ग्रंथकार यांच्याविषयी प्रास्ताविक

राजानक महिमभट्टाने (इसवी सन ११ वे शतक) व्यक्तिविवेक या ग्रंथामध्ये ध्वन्यालोक (लेखक आनंदवर्धन, इ. स. नववे शतक) या ग्रंथात प्रतिपादिलेल्या ध्वनिवाद किंवा व्यंजनावाद या साहित्यशास्त्रीय मताचे खंडन केले आहे.१ हा ग्रंथ विचारपरिप्लुत व साहित्यशास्त्रातील अनेक महत्त्वाच्या विषयांची चर्चा करणारा असला तरी ध्वनिवादासारख्या सर्वमान्य सिद्धान्ताला विरोध करून त्याचे खंडन करण्याच्या उद्देशाने लिहिलेला असल्यामुळे बाजूला पडल्यासारखा होऊन उपेक्षित राहिला. परंतु त्यामुळे त्याचे महत्त्व कमी होते असे मुळीच नाही. म्हणूनच प्रस्तुत परिचयग्रंथामध्ये या ग्रंथाविषयी चर्चा करण्याचे योजिले आहे.

---

[व्यक्तिविवेकातील संग्रहश्लोकांक व पृष्ठांक श्री. रेवाप्रसाद द्विवेदी यांच्या हिंदी संस्करणाला अनुसरून दिले आहेत (काशी संस्कृत ग्रन्थमाला, १२१, वाराणसी, इ. स. १९६४).]

१) अनुमानेऽन्तर्भावं सर्वस्यैव ध्वनेः प्रकाशयितुम्। व्यक्तिविवेकं कुरुते प्रणम्य महिमा परां वाचम्॥ व्य. वि. १, १. रुय्यकाने (व्याख्यानटीका, पृ. ५) भट्टनायकाच्या हृदयदर्पण या ग्रंथाला ध्वनिध्वंसग्रन्थ म्हटले आहे. तीच संज्ञा व्य. वि. या ग्रंथाला लागू पडणारी आहे.

### ग्रंथाच्या नावाचा अर्थ व प्रतिपाद्य विषय

व्यक्तिविवेक या ग्रंथनामाचा अर्थ व्यक्तिसिद्धान्ताचे (म्हणजे ध्वनि-सिद्धान्ताचे) खंडन करण्याच्या दृष्टीने केलेले परीक्षण असा आहे. ध्वन्यालोका-मध्ये प्रतिपादिलेल्या सर्वच मतांचे खंडन महिमभट्टाने या ग्रंथात केले आहे असे नसून, केवळ महत्त्वाच्या मतांचे खंडन केले आहे व त्याचबरोबर ध्वन्या-लोकातील पुष्कळ मतांचा स्वीकारही केला आहे.२ या ग्रंथाची विमर्शनामक तीन प्रकरणे असून, पहिल्या प्रकरणात ध्वन्यालोकातील ध्वनि ( = ध्वनिकाव्य) लक्षणाचे खंडन, ध्वनिवाद्यांच्या व्यंजनावृत्तीचे खंडन, मीमांसकांच्या तात्पर्य-वृत्तीचे खंडन, काही दार्शनिकांनी व आलंकारिकांनी स्वीकारिलेल्या लक्षणा-वृत्तीचे खंडन आणि कुन्तकाच्या (इ. स. १० वे शतक) वक्रोक्ति सिद्धान्ताचे खंडन केले आहे.३ दुसऱ्या प्रकरणात काव्यदोषांचे पाच व्यापक प्रकार सांगून व त्यांचे सविस्तर आणि सोदाहरण विवेचन करून ध्वन्यालोकाच्या प्रथम उद्योतातील पहिल्या प्रतिज्ञाकारिकेमध्ये हे सर्व दोष कसे आहेत, हे दाखविले आहे.४ तिसऱ्या प्रकरणात ध्वन्यालोकातील ध्वनिकाव्याच्या व गुणीभूतव्यंग्य काव्याच्या सुमारे पन्नास उदाहरणांचे परीक्षण करून त्यांमधील काव्यमय आशय व्यंजनेमुळे प्रतीत होत नसून अनुमानाने प्रतीत होतो हे दाखविले आहे.५

### ग्रंथाचे दुसरे नाव

व्यक्तिविवेक या ग्रंथाचा निर्देश प्रत्येक विमर्शाच्या शेवटी जोडलेल्या पुष्पिकेमध्ये "काव्यालंकार" या शब्दाने केला आहे. तसेच विमर्श१, प्रास्ताविक

---

२) प्राणभूता ध्वनेर्व्यक्तिरिति सैव विवेचिता । यस्त्वन्यत्तत्र विमतिः प्रायो नास्तीत्युपेक्षितम् ॥ व्य. वि. ३, ३३. १, ३ मध्ये या संदर्भात विप्रतिपत्ति (मतभिन्नता) व संप्रतिपत्ति (मतैक्य) हे शब्द वापरले आहेत.

३) ध्वनिलक्षणाक्षेपो नाम प्रथमो विमर्शः । (व्य. वि. पृ. १७८).

४) अनौचित्यविचारो नाम द्वितीयो विमर्शः । (व्य. वि. पृ. ४६८). अनौचित्य-विचार म्हणजे दोषविचार. महिमभट्टाच्या मते काव्यदोष म्हणजे अनौचित्य (किंवा औचित्यभंग) च होय. पहा : व्य. वि. १, ९१–९५ (पृ. १५९, १६०); २ (पृ. १७९).

५) ध्वनेरनुमानेऽन्तर्भावोपदर्शनं नाम तृतीयो विमर्शः । (व्य. वि. ३, पृ. ५११).

पद्य ४ मध्ये "स्वालंकार" (स्वरचित अलंकार म्हणजे काव्यालंकार) या शब्दाने प्रस्तुत ग्रंथाचा निर्देश केला आहे. येथे अलंकार हा शब्द काव्यातील सौंदर्याचा विचार करणारा ग्रंथ या अर्थी वापरला आहे.६ ध्वनिसिद्धान्ताचे खंडन हा जरी व्यक्तिविवेकाचा मुख्य विषय असला तरी त्यामध्ये काव्य-शास्त्राशी संबंध असणाऱ्या अनेक विषयांचा ऊहापोह केलेला आहे. उदाहरणार्थ, काव्यस्वरूप, कविप्रतिभेचे स्वरूप, काव्याची प्रयोजने, रसस्वरूप, काव्य व नाट्य यांमधील साम्य व भेद, काव्यदोषांचे सामान्य व विशेष स्वरूप आणि त्यांचे प्रकार, काव्यातील अलंकारांच्या वापराच्या बाबतीत औचित्यानौचित्यविवेक इत्यादी. म्हणजे व्यक्तिविवेक या ग्रंथाची कामगिरी द्विविध आहे : (१) ध्वन्यालोकखंडन (विध्वंसक कामगिरी) व (२) काव्यविषयक चर्चा (विधायक कामगिरी). या ग्रंथाच्या विधायक स्वरूपाला अनुसरून त्याला काव्यालंकार ही संज्ञा ग्रंथकर्त्याने दिली असावी. भामह, रुद्रट व वाग्भट यांच्या साहित्यशास्त्रावरील ग्रंथांना काव्यालंकार अशीच संज्ञा असून उद्भट व वामन यांच्या ग्रंथांच्या नावांमध्ये काव्यालंकार हा शब्द वापरलेला आढळतो.७

## ग्रंथाचे स्वरूप व विस्तार

या ग्रंथातील विवेचनाचे स्वरूप गद्यवृत्ति व संस्कृत आणि प्राकृत साहित्यातील उदाहरणे व त्यांवरील चर्चा व संग्रहश्लोक (किंवा अंतरश्लोक) असे आहे. परंतु प्रथम कारिका लिहून नंतर त्यांचे विवरण वृत्तीमध्ये केलेले नसून, प्रथम गद्यमय विवेचन आणि उदाहरणे व त्यानंतर संग्रहश्लोक किंवा

---

६) पहा : वामन, काव्यालंकारसूत्र १, १, १–२ : काव्यं ग्राह्यम् अलंकारात् । सौन्दर्यमलंकारः ।

७) उद्भटाचा काव्यालंकारसारसंग्रह, वामनाची काव्यालंकारसूत्रवृत्ति, वामनाच्या ग्रंथाच्या नावामध्ये काव्यालंकार हा शब्द काव्यविषयक चर्चा या अर्थानेच वापरलेला दिसतो. तसेच कुन्तकाच्या ग्रंथाचे रूढ नाव जरी वक्रोक्तिजीवित असे आहे, तरी १, ३ मध्ये त्याने त्या ग्रंथाला 'काव्यस्य अलंकारः' असे, व वृत्तीमध्ये 'ग्रंथस्य अलंकारः (=काव्यालंकारः) इत्यभिधानम्' असे म्हटले आहे.

संग्रहआर्या यांमध्ये त्या विवेचनाचा सारांश सांगितलेला आहे, तर काही ठिकाणी अंतरश्लोक किंवा अंतरआर्यांच्या योगाने त्या विवेचनामध्ये भर घातली आहे.८ पहिल्या विमर्शामध्ये ९९, दुसऱ्यात १२४ व तिसऱ्यात ३४ असे एकूण २५७ संग्रहश्लोक (किंवा आर्या) व अंतरश्लोक (किंवा आर्या) या ग्रंथामध्ये आहेत. याशिवाय पहिल्या विमर्शात २ प्रास्ताविक पद्ये आणि तिसऱ्या विमर्शात ४ उपसंहारात्मक पद्ये आहेत. पहिले दोन विमर्श बरेच विस्तृत असून तिसरा त्यामानाने लहान आहे.९

### ग्रंथकाराविषयी वैयक्तिक माहिती

या ग्रंथाच्या पहिल्या विमर्शामध्ये (१, १) ग्रंथकाराने आपले नाव महिमा असे सांगितले आहे. विमर्श ३, ३६ येथे राजानकमहिमक असा त्याने स्वतःचा निर्देश केला आहे. तसेच तीनही विमर्शांच्या पुष्पिकांमध्ये राजानक-महिमभट्ट या शब्दाने ग्रंथकाराचा नामनिर्देश केला आहे. तिसऱ्या विमर्शाच्या शेवटी (३, ३६) त्याने आपल्या पित्याचे नाव श्रीधैर्य असे असल्याचे म्हटले

---

८) पहा : डॉ. काणे, History of Sanskrit Poetics, पृ. २५५; व्यक्तिविवेक (काशी संस्कृत सीरिज पुस्तकमाला, १२१, बनारस, इ. स. १९३६), मधुसूदनी विवृति, पृ. १९२; काव्यानुशासन, विवेकटीका (मुंबई संस्करण, १९६४), पृ. ४१२ वर हेमचंद्राने अन्तरश्लोकौ याचे विवरण "अन्तरे मध्ये वक्तव्य-शेषाभिधायकौ श्लोकौ" असे केले आहे. पहा : पी. वेंकटेश्वरलु, पृ. २०९, (महिमभट्टीयध्वन्यभाववादविमर्श, प्रबन्ध, पुणे १९६७). ध्वन्यालोकामध्ये परिकरश्लोक व संग्रहश्लोक वृत्तीमध्ये ठिकठिकाणी समाविष्ट केलेले आहेत. कुन्तकाच्या वक्रोक्तिजीवितामध्ये सुद्धा अन्तरश्लोक आढळतात.

९) व्यक्तिविवेक हा ग्रंथ महिमभट्टाने आपल्या नातवाच्या मार्गदर्शनासाठी लिहिला असे ३, ३५ येथे म्हटले आहे. दुसऱ्या विमर्शातील काव्यदोषविवेचन त्याने आपल्या शिष्यांच्या विनंतीला मान देऊन केले असे २, १ येथे म्हटले आहे. यावरून महिमभट्ट हा आपल्या शिष्यांना साहित्यशास्त्र मोठ्या आस्थेने शिकविणारा प्रभावी व सिद्धहस्त शिक्षक होता असे दिसते.

आहे.१० परंतु त्याने आपल्या पित्याविषयी अधिक माहिती कोठेही दिलेली नाही. त्याने आपल्या गुरुचे नाव महाकवि श्यामल असे होते असे म्हटले आहे. तिसऱ्या विमर्शातील पद्य ३५ मध्ये त्याने असे म्हटले आहे की मी हा ग्रंथ माझ्या तीन व्यवहारकुशल नातवांच्या व्युत्पत्तीसाठी (नातवांना बहुश्रुत करण्यासाठी) प्रबोधनासाठी लिहिला व ते तीन नातू सर्वगुणसंपन्न भीमाचे पुत्र होते.११ आपल्या नातवांच्या बाबतीत महिमभट्टाने नप्तृ हा शब्द वापरला आहे. यावरून हे तीन नातू महिमभट्टाच्या मुलीचे पुत्र असावेत व भीम हा महिमभट्टाचा जावई असावा असे डॉ. काणे म्हणतात.१२ नप्तृ या शब्दाचे पुत्राचा पुत्र (पौत्र) व मुलीचा पुत्र (दौहित्र) असे दोनही अर्थ असल्याने महिमभट्टाचे नातू हे त्याच्या मुलीचे पुत्र किंवा पुत्राचे पुत्र असू शकतील. ते त्याचे दौहित्र असल्यास भीम हा महिमभट्टाचा जावई असला पाहिजे व ते त्याचे पौत्र असल्यास भीम हा महिमभट्टाचा पुत्र असला पाहिजे. याबाबतीत निश्चितपणे विधान करणे शक्य नाही. डॉ. व्रजमोहन चतुर्वेदी यांच्या मते१३ अमितगुण (=सर्वगुणसंपन्न) हे विशेषण ३, ३५ येथे भीमाला लावले असल्यामुळे तो महिमभट्टचा पुत्र नसून जावईच असला पाहिजे, कारण अमितगुण हे विशेषण स्वपुत्राच्या बाबतीत वापरलेले असणे शक्य वाटत नाही. जावयाच्या बाबतीत मात्र ते विशेषण वापरलेले असणे अगदी शक्य आहे.१४ विमर्श ३, ३५ येथे वापरलेला क्षेमयोगभाजानाम् हा शब्द महिमभट्टाच्या नातवांच्या नावांचा

---

१०) श्रीधैर्यस्यात्मभुवा महाकवेः श्यामलस्य शिष्येण ।
व्यक्तिविवेको विदधे राजानकमहिमकेनायम् ॥

११) आधातुं व्युत्पत्तिं नप्तॄणां क्षेमयोगभाजानाम् ।
सत्सु प्रथितनयानां भीमस्यामितगुणस्य तनयानाम् ॥
—सज्जनांना व्यवहारकुशल किंवा सदाचरणी म्हणून माहीत असलेले (सत्सु प्रथितनयानाम्)

१२) History of Sanskrit Poetics, पृ. २५४.

१३) महिमभट्ट (दिल्ली, १९६६), पृ. १७.

१४) परंतु भीम हा महिमभट्टाचा पुत्र असला तरी त्याच्याविषयी वाटणाऱ्या प्रेमयुक्त आदरामुळे त्याच्याबाबतीत अमितगुण हे विशेषण वापरलेले असणे शक्य आहे.

निर्देश करणारा आहे असे डॉ. काणे म्हणतात.[१५] भाज हे व्यक्तीचे नाव या दृष्टीने चमत्कारिक वाटते, म्हणून भाज हा शब्द लेखक प्रमादामुळे भोज या शब्दाच्या जागी लिहिला गेला असावा असा डॉ. काणे यांचा तर्क आहे. रेवाप्रसाद द्विवेदी यांनी व्यक्तिविवेकाच्या हिंदी संस्करणामध्ये क्षेमयोग-भोजानाम् हा पाठ स्वीकारिला आहे. त्रिवेंद्रम संस्करण (संपादक गणपति शास्त्री) व काशी संस्कृत सीरिज संस्करण (संपादक मधुसूदन शास्त्री) यांमध्ये क्षेमयोगभाजानम् असेच छापले आहे. डॉ. चतुर्वेदी (पृ. १८) यांच्या मते क्षेम, योग व भाज ही व्यक्तींची नावे नसून क्षेमयोगभाजानाम् हे नप्तृणाम् याचे विशेषण आहे व ते योगक्षेमभाजानाम् (स्वतःचा चरितार्थ चालविण्यास समर्थ) याच्या ऐवजी वृत्ताच्या सोयीसाठी वापरले आहे. क्षेमयोगभाज हा अकारान्त शब्द पाणिनीच्या कर्मण्यण् (अष्टाध्यायी ३, ३, १) या सूत्रानुसार भज् या धातूला अण् (= अ) हा कृत् प्रत्यय लावून तयार करण्यात आला आहे असे डॉ. चतुर्वेदी म्हणतात. महिमभट्टाचे हे तीन नातू सदाचरणी व व्यवहारचतुर होते हे 'सत्सु प्रथितनयानाम्' या विशेषणामुळे जसे ध्यानात येते, तसेच ते स्वतःचा चरितार्थ चालविण्यास समर्थ होते, म्हणजे वयाने प्रौढ (सुमारे २५ ते ३० वर्षे वयाचे) होते असेही ध्यानात येते असे डॉ. चतुर्वेदी यांचे म्हणणे आहे.

## महिमभट्टाचा गुरू

महिमभट्टाच्या श्यामलनामक गुरूविषयी काही माहिती उपलब्ध नाही. तो महाकवि होता असे महिमभट्टाने म्हटले आहे.[१६] परंतु श्यामल किंवा श्यामलक या नावाच्या कवीने लिहिलेले काव्य किंवा प्रबन्ध उपलब्ध नाही. श्यामलक नावाच्या कवीचा एक श्लोक वल्लभदेवाच्या सुभाषितावलीमध्ये (क्र. २२९२) उद्धृत केलेला आढळतो. तसेच क्षेमेन्द्राने सुवृत्ततिलक व औचित्यविचारचर्चा या ग्रंथांमध्ये श्यामल नावाच्या कवीची काही पद्ये उद्धृत

---

१५) History of Sanskrit Poetics, पृ. २५४.

१६) व्य. वि. ३,३६ : महाकवेः श्यामलस्य शिष्येण ।

केली आहेत. श्यामिलक नावाच्या लेखकाने पादताडितक या नावाचा भाण लिहिल्याचे प्रसिद्ध आहे. परंतु पादताडितकाचा कर्ता श्यामिलक हा महिमभट्टाच्या श्यामलक गुरूहून निराळा असावा असे वाटते. कारण पाद-ताडितकाचा लेखक श्यामिलक हा इसवी सनाच्या पाचव्या शतकामध्ये होऊन गेला असे डॉ. मोतीचन्द्र व डॉ. आगरवाल यांनी शृङ्गारहाट या ग्रंथाच्या भूमिकेमध्ये पृ. ७ वर टी. बरो या पंडिताच्या एका लेखाच्या आधारे म्हटले आहे, तर महिमभट्टाचा गुरू श्यामलक हा महिमभट्टाचा समकालीन, म्हणजे इसवी सनाच्या अकराव्या शतकातील असला पाहिजे. परंतु चतुर्वेदी यांच्या मते महिमभट्टाचा गुरु श्यामल व पादताडितकाचा लेखक श्यामिलक हे एकच होत.१७

### महिमभट्ट काश्मीरचा रहिवासी

महिमभट्टाने आपल्या नावाला राजानक हे जे उपपद जोडले आहे, त्यावरून तो काश्मीर देशाचा रहिवासी (काश्मीरी ब्राह्मण) होता व काश्मी-रच्या राजाचा आश्रित होता असे दिसते. आनन्दवर्धन, रत्नाकर, मम्मट, रुय्यक, कुन्तक इत्यादी लेखकांच्या नावांपूर्वी राजानक हे उपपद जोडलेले आढळते. राजानक या उपपदाचा अर्थ राजाच्या कृपेला पात्र झालेला व राजाने गौरविलेला असा आहे. महिमभट्टाला आश्रय देऊन गौरविणारा हा काश्मीरी राजा कोण हे मात्र ज्ञात नाही. महिमभट्ट हा काश्मीरातील शैववेदान्तमताचा अनुयायी होता हे व्यक्तिविवेकाच्या पहिल्या विमर्शातील प्रारंभीच्या नमनपर पद्यावरून व संग्रहश्लोक ९ आणि १४ यांवरून वाटते.१८

---

१७) डॉ. चतुर्वेदी, महिमभट्ट, पृ. १३.

१८) या संबंधात डॉ. के. सी. पांडे यांचा भारतीय विद्या, खंड ११ (इ. स. १९५०) पृ. १८७–१९४ येथील लेख पहावा. त्यामध्ये काश्मीरातील शैवसंप्रदायाचा महिमभट्टाच्या विचारसरणीवरील प्रभाव या विषयाची सविस्तर चर्चा केलेली आहे. याच लेखकानी आपल्या इण्डियन एस्थेटिक्स, खंड २ (बनारस, १९५०), या ग्रंथाच्या पृ. २७५–२८५ येथे वरील विषयाचा विचार केला आहे.

### महिमभट्टाचे ग्रंथकर्तृत्व

व्यक्तिविवेक या ग्रंथाव्यतिरिक्त आपण तत्त्वोक्तिकोश या नावाचा एक शास्त्रीय ग्रंथ लिहिला होता असे २.११९ (पृ. ४५३) येथे महिमभट्टाने म्हटले आहे.[१९] हा ग्रंथ काव्यतत्त्वाचा म्हणजे काव्याच्या स्वरूपाचा विचार करणारा व पूर्वकालीन लेखकांनी काव्यरूपासंबंधी प्रगट केलेल्या मतांचा संग्रह आणि ऊहापोह करणारा असावा, असे त्याच्या नावावरून वाटते. तत्त्वोक्ति हा शब्द मुख्यतः काव्यतत्त्वोक्ति या अर्थानेच वापरलेला असावा. कारण या ग्रंथामध्ये कविप्रतिभेच्या स्वरूपाचा विचार केला आहे असे महिमभट्टाने म्हटले आहे.

रसानुगुणशब्दार्थचिन्तास्तिमितचेतसः ।
क्षणं स्वरूपस्पर्शोत्था प्रज्ञैव प्रतिभा कवेः ।। ११७ ।।
सा हि चक्षुर्भगवतस्तृतीयमिति गीयते ।
येन साक्षात्करोत्येष भावांस्त्रैकाल्यवर्तिनः ।। ११८ ।।
इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिः प्रतिपादितम् ।
शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्य इति नेह प्रपञ्चितम् ।। ११९ ।।

या तीन श्लोकांपैकी पहिले दोन श्लोक तत्त्वोक्तिकोश या ग्रंथातून महिमभट्टाने उद्धृत केले असावेत असे दिसते. महिमभट्टाने रचलेल्या या तत्त्वोक्तिकोशाप्रमाणे आनन्दवर्धनाने सुद्धा तत्त्वालोक नावाचा एक ग्रंथ लिहिला होता व त्यामध्ये इतर विषयांव्यतिरिक्त शास्त्रनय आणि काव्यनय (म्हणजे शास्त्राचा दृष्टिकोन व काव्याचा दृष्टिकोन) या विषयांचा विचार केला होता असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे.[२०] कदाचित आनन्दवर्धनाच्या

---

१९) इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिरुपपादितम्।
शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्ये, इति नेह प्रपञ्चितम्॥

२०) लोचन, ४, पृ. ५३३ (काशी संस्करण, १९४०) : एतच्च (शास्त्रनयकाव्यनय-स्वरूपं) ग्रन्थकारेण तत्त्वालोके वितत्योक्तम्। इह तस्य न मुख्योऽवसरः, इति नास्माभिस्तद् दर्शितम्। लोचन, १, पृ. ६७ : तदुत्तीर्णत्वे तु सर्वं परमेश्वराद्वयं ब्रह्म इत्यस्मच्छास्त्रकारेण न न विदितं तत्त्वालोकग्रंथं विरचयता।

तत्त्वालोक या ग्रंथामुळेच महिमभट्टाला तत्त्वोक्तिकोश हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा मिळाली असावी व या दोनही ग्रंथांचा विषय अंशत: तत्त्वज्ञान आणि अंशत: साहित्यशास्त्रविमर्श असा असावा. दुर्दैवाने हे दोनही ग्रंथ काळाच्या उदरात लुप्त झाले ही संस्कृत साहित्याची मोठीच हानि होय.

विमर्श २.२ (पृ. १८४) येथे महिमभट्टाने वापरलेल्या "स्वकृतिषु" या शब्दामुळे त्याने काही काव्यरचना केली असावी असे मानण्यास आधार मिळतो.[२१] म्हणजे आनन्दवर्धनाप्रमाणे महिमभट्ट सुद्धा कवि आणि साहित्य-शास्त्रकार होता; एवढेच नव्हे, तर आनन्दवर्धनाचा आदर्श स्वत:पुढे ठेवून व त्याच्याशी स्पर्धा करण्यासाठी महिमभट्टाने शास्त्र व काव्य या दोनही क्षेत्रांमध्ये ग्रंथरचना केली असे म्हणणे शक्य आहे.

---

२१) महिमभट्टाने विमर्श दोन मध्ये कालिदासादि कवींच्या पद्यातील दोष दाखवून ते दूर करण्यासाठी ज्या सुधारणा अनेक ठिकाणी सुचविल्या आहेत, त्यावरून काव्यरचनेतील त्याच्या सफाईदारपणाची कल्पना करता येते. व्यक्तिविवेकामध्ये उदाहरणादाखल उद्धृत केलेल्या पद्यांपैकी ज्यांचे मूळ सापडत नाही, त्यांपैकी काही महिमभट्टाने रचलेली असण्याची शक्यता आहे. परंतु आनन्दवर्धन, अभिनवगुप्त, विश्वनाथ वगैरे लेखक ज्याप्रमाणे यथा मम असे म्हणून स्वरचित पद्ये उद्धृत करतात त्याप्रमाणे महिमभट्टाने कोठेही केलेले आढळत नाही.— व्य. वि. २,२ मधील स्वकृतिषु या शब्दाचा संबंध केवळ व्यक्तिविवेक या ग्रंथाशी असण्याची शक्यता आहे. कारण १,४ मध्ये "स्वालंकारविकल्पप्रकल्पने वेत्ति कथमिवावद्यम्" या वाक्याचा रोख व्यक्तिविवेक या ग्रंथाकडेच आहे. परंतु २,२ चा संबंध जर केवळ व्यक्तिविवेक या ग्रंथाशी असता तर स्वकृतिषु असा बहुवचनी प्रयोग न करता स्वकृतौ असा एकवचनी प्रयोग महिमभट्टाने केला असता. म्हणून स्वकृतिषु याचा अर्थ "माझ्या काव्यरचना व माझा व्यक्तिविवेक यांच्या बाबतीत" असा करणे इष्ट होईल. व्यक्तिविवेक या ग्रंथात शब्दयोजनेचे काही दोष आहेत हे रुय्यकाने आपल्या व्याख्याननामक टीकेमध्ये दाखविले आहे (उदा. पृ. ४ व २८६). विमर्श दोन मध्ये पृ. ४६१ वर महिमभट्टाने ध्वन्यालोक १,१ या कारिकेतील नानाप्रकारचे दोष टाळून जी स्वमतानुसार निर्दोष फेररचना करून दाखविली आहे, तीमध्ये सुद्धा काही दोष दाखविणे शक्य आहे.

**महिमभट्टाचा समय**

महिमभट्टाने व्यक्तिविवेकामध्ये आनन्दवर्धनकृत ध्वन्यालोक व अभिनवगुप्तकृत लोचन या दोनही ग्रंथातील वचने उद्धृत करून ध्वनिसिद्धान्ताचे खंडन केले आहे. तसेच एका ठिकाणी (१, २९, पृ. २८५) कुन्तकाच्या नावाचा निर्देश करून व वक्रोक्तिजीवित या ग्रंथातील अवतरणे देऊन वक्रोक्तिसिद्धान्ताचेही खंडन केले आहे. याशिवाय त्याने भरत, भामह व वामन यांच्या ग्रंथातील अवतरणे उद्धृत केली आहेत. तसेच कालिदास, भारवि, माघ, भवभूति, श्रीहर्ष (रत्नावली इत्यादी नाटकांचा कर्ता), बाण, भट्टनारायण, राजशेखर, भल्लट, रत्नाकर (हरविजय या महाकाव्याचा लेखक) यांच्या काव्यनाटकातील अवतरणे त्याने ठिकठिकाणी उद्धृत केली आहेत. व्यक्तिविवेक १, ४ व ५ येथे त्याने भट्टनायकाचा हृदयदर्पणनामक ग्रंथ व ध्वन्यालोकावरील चन्द्रिकानामक लोचनपूर्वकालीन टीका यांचा द्व्यर्थी शब्द वापरून ओझरता निर्देश केला आहे.[२२] यावरून महिमभट्टाचा काळ या सर्व ग्रंथकारांच्या नंतरचा आहे हे स्पष्ट आहे. विशेषतः राजशेखराचे बालरामायण व विद्धशालभञ्जिका, अभिनवगुप्ताचे लोचन आणि कुन्तकाचे वक्रोक्तिजीवित या ग्रंथांतील अवतरणे व्यक्तिविवेकामध्ये उद्धृत केलेली असल्यामुळे महिमभट्टाचा काळ इ. स. १०२० नंतरचा असला पाहिजे यात शंका नाही.[२३] रुय्यकाने (इ. स. ११३५ ते ११५०) अलंकारसर्वस्व या ग्रंथामध्ये महिमभट्टाचा व्यक्तिविवेककार या शब्दाने निर्देश करून त्याच्या मताचा सारांश दिला आहे.[२४] तसेच व्यक्तिविवेकावर व्याख्यान नावाची जी टीका खंडित स्वरूपात उपलब्ध आहे, ती रुय्यकानेच लिहिली असे मानले जाते.[२५]

---

२२) सहसा यशोऽभिसर्तुं समुद्यताऽदृष्टदर्पणा मम धीः ।
स्वालंकारविकल्पप्रकल्पने वेत्ति कथमिवावद्यम् ॥ ४ ॥
ध्वनिवर्त्मन्यतिगहने स्खलितं वाण्याः पदे पदे सुलभम् ।
रभसेन यत् प्रवृत्ता प्रकाशकं चन्द्रिकामदृष्ट्वैव ॥ ५ ॥

२३) काणे, History of Sanskrit Poetics, पृ. २५५.

२४) काणे, पृ. २८५; अलंकारसर्वस्व (काव्यमाला संस्करण, १९३९), पृ. ९–१०.

२५) काणे, पृ. २५६.

हेमचन्द्राने (इ. स. ११०० ते ११५०) आपल्या काव्यानुशासन या प्रायः संकलनात्मक ग्रंथामध्ये व्यक्तिविवेक विमर्श दोन मधील काव्यदोष विवेचनाचा समावेश केला आहे.२६ इसवी सनाच्या बाराव्या शतकातील श्रीहर्ष या महाकवीने खण्डनखण्डखाद्य नामक ग्रंथात महिमभट्टाचा निर्देश व्यक्तिविवेकाचा लेखक म्हणून केला आहे. वरील विवेचनानुसार हे निश्चित ठरते की इ. स. १००० ते ११०० हा महिमभट्टाचा काळ असला पाहिजे.

### व्यक्तिविवेकावरील टीका व सहायक लिखाण

व्यक्तिविवेकावरील रुय्यकाची (इ. स. १२ वे शतक, पूर्वार्ध) व्याख्याननामक टीका खंडित स्वरूपात उपलब्ध आहे. प्रथमविमर्शावरील टीका रेवाप्रसाद द्विवेदी यांच्या हिंदी संस्करणात पृ. ११० वर संपते. पहिल्या विमर्शाच्या त्यानंतरच्या जवळजवळ एकतृतीयांश भागावर ही टीका उपलब्ध नाही.

२६) काव्यानुशासनातील तिसऱ्या अध्यायाच्या ४ ते ७ या चार सूत्रांत व त्यांवरील अलंकारचूडामणि आणि विवेक या दोन स्वरचित टीकांमध्ये हेमचन्द्राने ३१ काव्यदोषांचे सोदाहरण विवेचन केले आहे (काव्यानुशासन, मुंबई, १९६४, पृ. १९९–२७३). या ३१ दोषांमध्ये महिमभट्टाने व्यक्तिविवेकामध्ये विवेचिलेल्या विधेयाविमर्श, भग्नप्रक्रम, क्रमभेद, पौनरुक्त्य व वाच्यावचन (आणि अवाच्यवचन) या दोषांचा समावेश झाला असून या दोषांची चर्चा व उदाहरणे आणि त्या उदाहरणांतील दोष दूर करण्यासाठी सुचविलेल्या सुधारणा हे सर्व व्यक्तिविवेकामधूनच घेतले आहे. हेमचन्द्राच्या काव्यानुशासन या प्रायः संकलनात्मक व संग्राहक ग्रंथात जशी ध्वन्यालोक, लोचन, काव्यप्रकाश इत्यादी पूर्वकालीन ग्रंथांतून उसनवारी केली आहे, तशीच व्यक्तिविवेक या ग्रंथातून केली आहे, हे काव्यानुशासनाचे अवलोकन केल्यास सहज ध्यानात येण्यासारखे आहे. विवेकटीकेमध्ये पृ. २११ वर व्यक्तिविवेकातील २·३३ ते ३६ हे चार संग्रह श्लोक, पृ. २५६–२५७, २·१५ ते १८ हे चार संग्रह श्लोक व पृ. २५८–२५९ वर २·१८–२२ हे पाच संग्रह श्लोक, असे एकुण १३ संग्रह श्लोक उद्धृत केले आहेत. यावरून हेमचन्द्राने काव्यदोषांची चर्चा करताना व्यक्तिविवेक या ग्रंथाचा नामनिर्देश न करता मोठ्या प्रमाणात उपयोग केला आहे हे स्पष्टपणे दिसून येते.–काव्यप्रकाश (उल्लास ५) व व्यक्तिविवेक (विमर्श ३) यांमध्ये 'भम धम्मिअ वीसद्धो' इत्यादी गाथेतील गूढ अर्थ अनुमानाने प्रतिपादताना

दुसऱ्या विमर्शावरील टीका हिंदी संस्करणाच्या पृ. ४१४ वर संपते. त्यानंतरच्या सुमारे एकचतुर्थांश भागावर टीका उपलब्ध नाही. तिसऱ्यावरील टीका मुळीच उपलब्ध नाही. या टीकेमध्ये तिच्या त्रुटित स्वरूपामुळे टीकेच्या लेखकाचा निर्देश कोठेही केलेला आढळत नाही. परंतु अलंकारसर्वस्व या ग्रंथातील वृत्तीचा लेखक जो राजानक रुय्यक, त्यानेच ही टीका लिहिली असावी असे वाटते. अलंकारसर्वस्वाचा टीकाकार जयरथ पृ. १६ (काव्यमाला संस्करण) वर व्यक्तिविवेकावरील रुय्यकाच्या टीकेचा निर्देश करतो. हिंदी संस्करणाच्या पृ. २८६ वर नाटयमीमांसा व साहित्यमीमांसा या दोन स्वरचित ग्रंथांचा, पृ. ३५१ आणि ३९३ वर हर्षचरितवार्तिक या स्वरचित ग्रंथाचा व पृ. ३५४ वर बृहतीनामक स्वरचित ग्रंथाचा या टीकाकाराने निर्देश केला आहे. अलंकार-सर्वस्व पृ. ७७ वर रुय्यकाने स्वरचित हर्षचरितवार्तिक व साहित्यमीमांसा या ग्रंथांचा निर्देश केला आहे. या सर्व निर्देशांवरून सध्या त्रुटित स्वरूपात उपलब्ध असलेली व्यक्तिविवेकावरील व्याख्याननामक टीका रुय्यकानेच लिहिली आहे असे सिद्ध होते. ही टीका त्रुटित व त्रोटक असली तरी पांडित्य-पूर्ण आहे. पण टीकाकार ध्वनिसंप्रदायाचा अनुयायी असल्यामुळे तो काही ठिकाणी व्यक्तिविवेकातील युक्तिवादाचे खंडन व ध्वनिवादाचे समर्थन करतो (उदा० पहा : पृ. २० हिंदी संस्करण). पृ. ४, ३३, ३३९ व ३५२ येथे तो

---

केलेल्या शब्दयोजनेत बरेच साम्य असले व काव्यप्रकाश उल्लास ७ आणि व्यक्तिविवेक विमर्श २ यांमधील काव्यदोषांच्या चर्चेत, दोषांच्या उदाहरणांत व ते दोष टाळण्यासाठी करावयाच्या सुधारणांत जरी पुष्कळ साम्य असले आणि महिमभट्टाने विवेचिलेल्या सर्व काव्यदोषांचा अन्तर्भाव मम्मटाने विवेचि-लेल्या काव्यदोषांमध्ये होत असला, तरी मम्मटाने व्यक्तिविवेकातून उसनवारी केली, का महिमभट्टाने काव्यप्रकाशातून उसनवारी केली हे निश्चितपणे सांगणे कठीण आहे. पहा : काणे पृ. २५५-२५६. डॉ. व्ही. राघवन् शृङ्गारप्रकाशा-वरील ग्रंथात (पृ. २४३, २४४) निश्चितपणे म्हणतात की काव्यदोषांचे विवेचन करताना मम्मटाने व्यक्तिविवेकाचा उपयोग केला आहे. डॉ. बेचन झा यांचेही मत असेच आहे. पहा : Concept of Poetic Blemishes in Sanskrit Poetics, पाटणा युनिव्हर्सिटी, १९६५, पृ. १५३.

महिमभट्टाच्या अहंमन्यपणाची निंदा करतो.२७ काही ठिकाणी (उदा० पृ. ४४) तो महिमभट्टाची प्रशंसा करतो.२८ रुय्यकाने काही ठिकाणी (उदा० पृ. १४, ७६) महिमभट्टाच्या मताचे खंडन करणारे संग्रह श्लोक रचलेले आढळतात.

व्यक्तिविवेकावर साहित्याचार्य श्री. मधुसूदन मिश्र यांनी अलीकडच्या काळात लिहिलेली मधुसूदनीविवृति या नावाची टीका (काशी संस्कृत सीरिज, क्रमांक १२१) बनारस येथे १९३६ मध्ये प्रसिद्ध झाली आहे. ही टीका संपूर्ण व्यक्तिविवेकावर असून सुबोध व मूळ ग्रंथाचा आशय जाणण्यास उपयुक्त आहे.

डॉ. काणे यांनी पृ. २५७ येथे व्यक्तिविवेकावरील तिलकरत्न नामक टीकेचा निर्देश केला आहे व त्या संबंधात डॉ. एस्. आर्. भांडारकर यांच्या Report on the search of Manuscripts in Rajputana and Cenrtal India for 1904–1905 and 1905–1906 (pp. 39–40, 85–87) या ग्रंथाचा हवाला दिला आहे. इ. स. १९६७ मध्ये श्री. पी. वेंकटेश्वरलु यांनी लिहिलेल्या महिमभट्टीयध्वन्यभाववादविमर्शः या प्रबंधात पृ. २१७ येथे या टीकेचा तिलक या नावाने निर्देश केला असून तिची प्रतिलिपी (नक्कल) भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमन्दिर, पुणे येथे आहे असे म्हटले आहे.

अलीकडच्या काळात इ. स. १९६४ मध्ये श्री. रेवाप्रसाद द्विवेदी यांनी व्यक्तिविवेकाचे हिंदी भाषांतर व विवरण उपोद्घातासह आणि मूळ संस्कृत संहिता व व्याख्यान टीका यांसह प्रसिद्ध केले आहे (काशी संस्कृत ग्रंथमाला, क्रमांक १२१, वाराणसी). हा ग्रंथ विद्वत्ताप्रचुर असून मूळ ग्रंथाच्या

---

२७) पृ. ४ : एतच्चास्य साहित्यिकदुर्निरूपकस्य प्रमुख एव स्खलितम् इति महान् प्रमादः। पृ. ३३९ : तदेतदस्य विश्वम् अगणनीयं मन्यमानस्य आत्मनः सर्वोत्कर्षशालिताख्यापनमिति। पृ. ३५२ : एवंविधे च प्रदेशे ग्रन्थकारो हेवाकितयैव दूषणमदात्।

२८) रुय्यकाने आपल्या टीकेमध्ये पृ. ३०५ वर दुसऱ्या एका टीकाकाराच्या मताचे खंडन केले आहे (शाब्दः प्रक्रमभेद इति, शब्दविषयत्वाच्छाब्दः। शाब्दप्रक्रमभेद इति तु प्रकृतिप्रक्रमभेदस्यानुक्रमेण ये पठन्ति तैः शाब्दश्चार्थश्चेत्युत्तरो ग्रन्थो नालोचित इति उपेक्ष्यमेतत्।). यावरून रुय्यकाच्या पूर्वी व्यक्तिविवेकावर एक टीकाग्रंथ लिहिला गेला होता व तो रुय्यकाच्या अवलोकनात होता असे दिसते.

अध्ययनास फार उपयोगी आहे. प्रस्तुत ग्रंथामध्ये विमर्श १ व २ वरील रुय्यकाची संस्कृत टीका (व्याख्यान) छापली असून तिचे हिंदीमध्ये विवरण केले आहे.

डॉ. कीर्तिचन्द्र पांडे यांच्या Comparative Aesthetics या ग्रंथाच्या Indian Aesthetics नामक प्रथम खंडामध्ये (इ. स. १९५०, बनारस) पृ. २७०–३२५ येथे महिमभट्ट व व्यक्तिविवेक यांसंबंधी प्रदीर्घ विवेचन केलेले असून त्यात महिमभट्टाचा समय, त्याच्याविषयी वैयक्तिक माहिती व व्यक्तिविवेक या ग्रंथाच्या प्रथम व द्वितीय विमर्शातील विवेचनाचा सारांश यासंबंधी विचार केला आहे. महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकावरून तो न्याय किंवा वैशेषिक मताचा पुरस्कार करणारा नसून काश्मीरमध्ये उदयास आलेल्या शैववेदान्त मताचा अनुयायी असल्याचे डॉ. पांडे यांनी दाखविले आहे. हाच विषय डॉ. पांडे यांनी भारतीय विद्या, खंड ११, इ. स. १९५०, पृ. १८७ ते १९४ वरील लेखात चर्चिलेला आहे. श्री. पी. वेंकटेश्वरलु यांच्या वर निर्दे-शिलेल्या प्रबंधात व्यक्तिविवेक या ग्रंथाचे सर्वांगीण समालोचन संस्कृत भाषेत केले आहे. ध्वनिसिद्धांतावर महिमभट्टाने घेतलेल्या आक्षेपांची चर्चा करून, त्या आक्षेपांचे खंडन करण्याचा श्री. वेंकटेश्वरलु यांनी प्रयत्न केला आहे.

इ. स. १९६८ मध्ये डॉ. ब्रजमोहन चतुर्वेदी यांनी महिमभट्ट या हिंदी ग्रंथात व्यक्तिविवेकाचे सर्वांगीण परीक्षण व मूल्यमापन केले आहे (पृष्ठसंख्या ३४७). व्यक्तिविवेकाच्या अभ्यासकांना हा ग्रंथ श्री. वेंकटेश्वरलु यांच्या ग्रंथाप्रमाणेच फार उपयुक्त आहे.

इ. स. १९६८ मध्ये कर्नाटक विद्यापीठाचे डॉ. के. कृष्णमूर्ति यांनी लिहिलेल्या Dhvanyáloka and its Critics या ग्रंथाच्या सातव्या प्रकरणात (पृ. २९०–२९६) व्यक्तिविवेकासंबंधी चर्चा केली आहे.

डॉ. बेचन झा यांनी Concept of Poetic Blemishes in Sanskrit Poetics (चौखांबा प्रकाशन, १९६५) या ग्रंथाच्या आठव्या प्रकरणामध्ये (पृ. १३४–१५३) व्यक्तिविवेकाच्या द्वितीय विमर्शातील काव्यदोषविवेचनाचे परीक्षण संक्षेपाने केले आहे.

डॉ. आ. र. अष्टीकर यांनी लिहिलेल्या 'ध्वनिसिद्धान्तः पूर्वपीठिका व परिणाम' (हिंदु धर्मसंस्कृतिमंदिर प्रकाशन, नागपूर, १९७४) या ग्रंथाच्या अकराव्या प्रकरणामध्ये (पृ. १८६–१९५) व्यक्तिविवेकासंबंधी थोडक्यात विचार केला आहे.



# २

# व्यक्तिविवेक

## *ग्रंथाशयाचे विवरण–प्रथमविमर्श*

ग्रंथाच्या प्रारंभी सहा प्रास्ताविक पद्यांमध्ये ग्रंथकाराने आपले हृद्गत प्रगट केले आहे.

१. व्यक्तिविवेक हा ग्रंथ लिहिण्यात ग्रंथकाराचा उद्देश : ध्वनिवाद्यांनी प्रतिपादिलेल्या वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसध्वनि या तीन ध्वनिप्रकारांचा अनुमानामध्ये कसा अन्तर्भाव होतो हे दाखविणे.

२. या ग्रंथामुळे ध्वनिवादाचे पुरस्कर्ते ग्रंथकारावर रुष्ट होतील पण अनुमितिवादाचे पुरस्कर्ते आनन्दित होतील. ग्रंथकाराशी सहमत असणाऱ्यांसाठी हा ग्रंथ लिहिला जात आहे.

३. ध्वनिकार आनन्दवर्धन याच्या मुख्य सिद्धान्ताचे खंडन जरी या ग्रंथात केले आहे तरी त्याच्या इतर अनेक मतांशी ग्रंथकार सहमत आहे.[१] संस्कृत-साहित्यशास्त्रकारांमध्ये ध्वनिकाराचे स्थान मोठे आहे. त्याच्या मुख्य सिद्धान्ताचे परिशीलनपूर्वक खंडन केल्याने ग्रंथकाराच्या मोठेपणात भर पडली आहे.

---

१) व्य. वि. ३·३३ : प्राणभूता ध्वनेर्व्यक्तिरिति सैव विवेचिता।
यत्त्वन्यत् तत्र विमतिः प्रायो नास्तीत्युपेक्षितम्॥

४. हा ग्रंथ लिहिताना ग्रंथकाराने भट्टनायकाचा हृदयदर्पण नामक ग्रंथ पाहिलेला नाही.

५. ध्वनिसिद्धान्त फार गहन आहे. ध्वन्यालोकावरील चन्द्रिका या नावाची टीका ग्रंथकाराने पाहिलेली नाही. त्यामुळे ग्रंथकाराच्या हातून काही चुका होण्याचा संभव आहे.२

६. ग्रंथातील प्रमादांकडे कानाडोळा करून विद्वान सज्जनांनी त्यातील गुणांकडे लक्ष द्यावे.

बोलताना व लिहिताना आपण जे शब्द वापरतो त्यांना तीन निरनिराळे अर्थ असतात हे भाषेसंबंधी विचार करणाऱ्यांच्या ध्यानात फार प्राचीन

---

२) पूर्वसूरींचे ध्वन्यालोकावरील खंडनमंडनपर ग्रंथ न पहाता मी हा ग्रंथ लिहिला ही जर महिमभट्टाची दर्पोक्ति असेल तर ती पद्य ३, ५ व ६ मधील विनयोक्तींशी विसंगत व महिमभट्टासारख्या विचारवंताला अशोभनीय आहे असे वाटते. परंतु पद्य ४ व ५ मधील विधाने जर वस्तुस्थितीवर आधारलेली असतील तर त्यांतून दोन निष्कर्ष निघतात. (१) अभिनवगुप्ताना हृदयदर्पण व चन्द्रिका टीका हे दोनही ग्रंथ उपलब्ध होते. कारण त्यानी लोचनात अनेक ठिकाणी त्यांतील अवतरणे दिली आहेत किंवा त्यांतील मतांचा निर्देश केला आहे. अभिनवगुप्ताना उपलब्ध असलेले हे दोनही ग्रंथ त्यांच्यानंतर थोड्याच काळात नष्ट झाल्याने महिमभट्ट ते पाहू शकला नाही. किंवा (२) त्या दोन ग्रंथांविषयी महिमभट्टाने नुसते ऐकले होते, परंतु ते ग्रंथ त्याच्यापर्यंत पोहोचले नव्हते. पण हा दुसरा निष्कर्ष बरोबर वाटत नाही. कारण अभिनवगुप्त व महिमभट्ट हे दोघेही काश्मीरचे रहिवासी होते. काश्मीर देश हा काही इतका विस्तीर्ण नाही की त्यामुळे हृदय-दर्पण व चन्द्रिका टीका हे दोन ग्रंथ महिमभट्टापर्यंत पोहोचू शकले नाहीत. पद्य ४ व ५ मध्ये सहसा व रभसेन हे शब्द वापरले आहेत. त्यांचा अर्थ "एकाएकी, त्वरेने, घाईने" असा आहे. व्यक्तिविवेक हा ग्रंथ लिहून हातावेगळा करण्याची अशी कोणती घाई महिमभट्टाला झाली होती की हृदयदर्पण व चन्द्रिका हे दोन ग्रंथ वाचण्यास त्याला सवड मिळू शकली नाही? व्यक्तिविवेक हा ग्रंथ त्याने आपल्या जीवनाच्या शेवटच्या टप्प्यामध्ये लिहिण्यास घेतल्यामुळे तो लवकर पूर्ण करण्याची त्याला घाई झाली होती काय ?

काळापासून आले होते. शब्दाचा जो सरळ, वरवर दिसणारा अर्थ असतो त्याला वाच्य किंवा मुख्य अर्थ म्हणतात व तो प्रत्येक शब्दाच्या बाबतीत प्राचीन काळापासून चालत आलेल्या संकेतामुळे ठरून गेलेला असतो. त्या अर्थाला शब्द ज्या शक्तीमुळे प्रगट करतो, त्या शक्तीला अभिधा किंवा वाचकत्व म्हणतात. याशिवाय शब्दाला आणखी दोन अर्थ असू शकतात व ते विशिष्ट संदर्भात थोड्याशा विचारानंतर श्रोत्याच्या ध्यानात येतात. या दोन अर्थांपैकी एकाला लक्ष्य अर्थ व दुसऱ्याला व्यङ्ग्य अर्थ म्हणतात. शब्दाच्या ज्या शक्तीमुळे लक्ष्य अर्थ ध्यानात येतो तिला लक्षणा (किंवा उपचार किंवा गुणवृत्ति) व ज्या शक्तीमुळे व्यङ्ग्य अर्थ ध्यानात येतो तिला व्यंजना म्हणतात. याशिवाय वाक्यातील सर्व शब्दांच्या अर्थांपासून जो संपूर्ण वाक्याचा एकमुखी अर्थ वाक्यार्थ म्हणून ध्यानात येतो त्याला तात्पर्य किंवा तात्पर्यार्थ म्हणतात व तो तात्पर्यार्थ वाक्याच्या ज्या शक्तीमुळे ध्यानात येतो, त्या शक्तीला तात्पर्यशक्ति२ म्हणतात. ध्वनिवाद्यांनी या सर्व शक्ती मान्य केल्या असून ललितवाङ्मयाच्या मूल्यमापनामध्ये त्यांचा उपयोग करून घेतला आहे. परंतु ध्वनिवादाचे खंडन करताना महिमभट्टाने जो मुख्य मुद्दा प्रतिपादिला आहे तो हाच की ध्वनिवादी मानतात त्याप्रमाणे शब्दाच्या ठिकाणी अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शक्ती नसून अभिधा ही एकमेव शक्ती आहे. तसेच अर्थाच्या ठिकाणी तात्पर्य व व्यंजना या दोन शक्ती नसून अनुमापकत्व ही एकच शक्ती आहे. म्हणजे वाच्यार्थाच्या ज्ञानानंतर जो कोणताही अर्थ (मग तो ध्वनिवाद्यांच्या मते तात्पर्यार्थ असो किंवा व्यङ्ग्यार्थ असो) विशिष्ट संदर्भात ध्यानात येतो तो तात्पर्य किंवा व्यंजना या शक्तीमुळे ध्यानात येत नसून अनुमानाने ध्यानात येतो. शब्दाच्या ठिकाणी जशी अभिधा ही एकच शक्ती असते तशीच अर्थाच्या म्हणजे वाच्यार्थाच्या ठिकाणी अनुमापकत्व ही एकच शक्ती असते. अनुमापकत्वशक्तीला तर्कशास्त्रात लिङ्गता म्हणतात. म्हणून शब्द व अर्थ यांच्या ठिकाणी व्यंजकत्व सामर्थ्य कधीच असू शकत नाही. असे असल्यामुळे शब्द व त्याचा वाच्यार्थ व्यंजक असतो असे म्हणणे चुकीचे आहे. शब्द हा केवळ वाच्यार्थाचा वाचकच असू शकतो, दुसऱ्या कोणत्याही

---

२) पहा : साहित्यदर्पण २, ३ व २०.

अर्थाचा बोधक असू शकत नाही व वाच्यार्थ हा कोणत्याही दुसऱ्या अर्थाचा केवळ अनुमापकच असू शकतो.४

महिमभट्टाने शब्दाचा अभिधा हा एकच व्यापार मानल्यामुळे जसे शब्दाचे व्यंजकत्व नाकारले आहे तसेच शब्दाचे लक्षकत्व (म्हणजे लक्षणेच्या द्वारा, वाच्यार्थाशी संबद्ध असणारा दुसरा अर्थ प्रगट करण्याचे सामर्थ्य) ही नाकारले आहे. त्याचप्रमाणे त्याने अर्थाच्या ठिकाणी अनुमापकत्व हे एकमेव सामर्थ्य मानले असल्यामुळे वाक्यातील शब्दांच्या वाच्यार्थाने एकमुखी संपिंडित अर्थ (म्हणजे तात्पर्यार्थ) प्रगट करण्याचे सामर्थ्यही नाकारले आहे. त्याच्या मते तथाकथित लक्ष्यार्थ व तथाकथित तात्पर्यार्थ हे वाच्यार्थाच्या ठिकाणी असलेल्या अनुमापकत्व सामर्थ्याने प्रगट केले जातात. तथाकथित तात्पर्यार्थ अनुमानानेच ध्यानात येत असल्यामुळे तात्पर्य या नावाची निराळी शक्ती वाक्याच्या ठिकाणी मानण्याचे काहीच कारण नाही.५

याचा अर्थ असा होतो की महिमभट्टाच्या मते अभिधा (किंवा वाचकत्व) हा खऱ्या अर्थाने एकमेव शाब्द व्यापार (linguistic function) आहे. तथाकथित लक्षणा, व्यंजना व तात्पर्य या शक्ती हे शाब्देतर आणि मानस (किंवा बौद्धिक) व्यापार (non - linguistic and mental or intellectual functions) आहेत. कारण ते अनुमानरूप व्यापार (inferential functions) आहेत. या दृष्टिकोनातून महिमभट्टाने पहिल्या विमर्शामध्ये लक्षणा, व्यंजना व तात्पर्य या तीन व्यापारांचे खंडन केले आहे.६

---

४) शब्द वाच्यार्थाला अभिधेने प्रगट करतो, व वाच्यार्थ हा दुसऱ्या कोणत्या तरी अर्थाला अनुमानाच्या प्रक्रियेने प्रगट करतो. म्हणून शब्द सुद्धा परंपरेने किंवा दूरान्वयाने अनुमापक असतो असे म्हणणे शक्य आहे.

५) लोचन पृ. ५७ व ६२ येथे तात्पर्यार्थ हा अन्यथानुपपत्ति किंवा अन्यथा असिद्धि या प्रमाणाने (म्हणजे अर्थापत्ति या प्रमाणाने) ज्ञात होतो असे म्हटले आहे. नैयायिक व वैशेषिक अर्थापत्ति या प्रमाणाचा अन्तर्भाव अनुमानामध्ये करतात. मीमांसक मात्र अर्थापत्ति हे स्वतंत्र प्रमाण मानतात.

६) पहा : व्य. वि. पृ. ११३–१२४; पृ. ८०–९२; पृ. १३३–१४१.

महिमभट्टाने प्रतिपादिलेल्या अनुमितिवादाचा पुरस्कार प्रथम नैयायिकांनी केला. त्यांच्या मते शब्दाच्या ठिकाणी अभिधा हा एकच व्यापार असतो व वाक्यातील शब्द ऐकल्यानंतर किंवा वाचल्यानंतर त्यांच्या वाच्यार्थाहून निराळे जे जे अर्थ ध्यानात येतात ते ते अनुमानानेच ध्यानात येतात.

ललितवाङ्मयाच्या क्षेत्रात प्रथम शङ्कुकाने अनुमितिवादाचा पुरस्कार केला असे दिसते. त्याच्या मते काव्य व नाटच यांच्यामुळे सामाजिकांना जेव्हा रसाचा अनुभव येतो तेव्हा काव्यातील व नाटचातील पात्रांच्या ठिकाणी उदित झालेल्या भावभावनांचे ज्ञान वाचकांना व प्रेक्षकांना काव्यात व नाटचात वर्णिलेले व चित्रण केलेले विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भाव यांच्यामुळे अनुमानाने होते.७

ध्वन्यालोकाच्या तिसऱ्या उद्योतामध्ये हा अनुमितिवाद ध्वनिसिद्धान्ताचा पूर्वपक्ष म्हणून प्रतिपादिला असून नंतर त्याचे खंडन ध्वनिवादाच्या दृष्टिकोनातून केले आहे.८

भाषिक व्यवहारामध्ये वाक्यात वापरलेल्या शब्दांना प्रायः दोन अर्थ असतात : (१) वाच्य अर्थ म्हणजे शब्दांच्या संकेतलभ्य अर्थांमुळे निष्पन्न होणारा संपूर्ण वाक्याचा सरळ अर्थ, व (२) वाक्य उच्चारणाऱ्या वक्त्याच्या मनात असला तरी शब्दांनी प्रत्यक्षपणे बोलून न दाखविलेला, पण विशिष्ट संदर्भामुळे वाक्यश्रवणानंतर थोडचा वेळाने ध्यानात येणारा प्रतीयमान किंवा प्रच्छन्न अर्थ. आनन्दवर्धनाने (ध्वन्यालोक ३, पृ. ४१६) वाच्यार्थाला शब्दाचा किंवा वाक्याचा स्वार्थ (किंवा नियत अर्थ), व प्रतीयमान अर्थाला अर्थान्तर किंवा औपाधिक अर्थ म्हटले आहे. त्यांपैकी वाच्य अर्थ (स्वार्थ) संकेताने निश्चित झालेला, रूढ (रुळलेला) व स्वाभाविक अर्थ असतो, तर प्रतीयमान

---

७) ध्वन्यालोकाच्या द्वितीय उद्योतावरील लोचन टीकेत (पृ. १८६, काशीसंस्करण) नाट्यशास्त्राच्या सहाव्या अध्यायावरील अभिनवभारतीमध्ये (पृ. १२८, रसभावविचार, कंगले) व मम्मटाच्या काव्यप्रकाशामध्ये (उल्लास ४, पृ. ८८–९०, भांडारकर प्राच्य संशोधन मंदिर संस्करण) शंकुकाचे हे मत प्रतिपादिले आहे.

८) पृ. ४४८–४५५ (काशी संस्करण).

अर्थ (अर्थान्तर) हा संकेताने निश्चित न झालेला, पण विशिष्ट संदर्भामुळे श्रोत्यांच्या ध्यानात येणारा औपाधिक (उपरा, आगन्तुक) अर्थ असतो. प्रतीयमान अर्थाला ध्वनिवादी व्यंग्य (म्हणजे व्यंजना व्यापारामुळे ध्यानात येणारा) अर्थ म्हणतात. भोजाने या प्रतीयमान अर्थाची (ज्याला तो वाक्यशेष म्हणतो त्याची) काही उदाहरणे शृङ्गारप्रकाशाच्या ९ व्या प्रकरणामध्ये दिली आहेत. (पृ. ३२४, म्हैसूर संस्करण, १९५६) : (१) एखाद्या मनुष्याने वाटसरूला "आर्यनिवासोऽयं देशः (हा संभावित, सुसंस्कृत मनुष्यांचा देश आहे)" असे जर म्हटले, तर "तू येथे मुक्काम करावास" हा प्रतीयमान अर्थ वाटसरूच्या ध्यानात येतो. (२) दोन प्रवाशांपैकी एकाने दुसऱ्याला "मध्याह्नो वर्तते (दुपारचे बारा वाजले, सूर्य डोक्यावर आला)" असे जर म्हटले तर "आता आपण येथे थांबून दुपारचे जेवण उरकून घेऊं या" हा पहिल्या प्रवाशाच्या मनातील अर्थ दुसऱ्या प्रवाशाच्या ध्यानात येतो. (३) एखाद्या मनुष्याने एखाद्या प्रवाशाला "सचोरः अयं पन्थाः (या वाटेवर चोरांचा सुळसुळाट आहे)" असे म्हटले तर "या वाटेने तू पुढे जाऊ नकोस" हा प्रतीयमान अर्थ त्या प्रवाशाला कळतो. (४) नदीवर स्नान करण्यासाठी निघालेल्या प्रवाशाला माहीतगार मनुष्याने "ग्राहाः सरिति अस्याम् (ह्या नदीमध्ये सुसरी आहेत)" असे म्हटले की "तू नदीवर स्नान करण्यास जाऊ नकोस" हा अर्थ त्या प्रवाशाच्या लक्षात येतो.

या प्रतीयमान अर्थाला मीमांसक तात्पर्यार्थ मानतात, तर नैयायिक त्याला अनुमेय अर्थ मानतात. लक्षणा या शब्दवृत्तीने ध्यानात येणारा लक्ष्य अर्थ सुद्धा प्रतीयमान अर्थच असतो. कारण वाच्यार्थाचा किंवा स्वार्थाचा बाध झाल्यानंतर तो परार्थ किंवा औपाधिक अर्थ म्हणूनच प्रगट होत असल्याने तो अर्थान्तरच असतो. उदा० "गङ्गायां घोषः (गंगेवर गवळ्यांची वसती आहे)", किंवा "कूपे गर्गकुलम् (विहिरीवर गर्गनामक मनुष्याचे घर आहे)" या वाक्यांतील वाच्यार्थाचा बाध झाल्यानंतर 'तीर' व 'उपकण्ठ (कांठ)' हे प्रतीयमान अर्थ प्रगट होतात. "गतोऽस्तमर्कः (सूर्य मावळला)" इत्यादी वाक्यातील वाच्यार्थाचा बाध न होता त्या वाच्यार्थाला पूरक म्हणून "आता घरी परत जाण्याची वेळ झाली" इत्यादी प्रतीयमान अर्थ प्रगट होतात.

परंतु बोलणाऱ्या व्यक्तीला तो दुसरा अर्थ अभिप्रेत असणें व वाच्यार्थ ध्यानात आल्यानंतर तो ध्यानात येणे हे धर्म दोनही ठिकाणी सारखेच असतात. प्रतीयमान या शब्दाच्या अर्थासारखाच अर्थ असणारे गम्य, गम्यमान, प्रकाश्य, प्रकाश्यमान इत्यादी शब्द आहेत.

नैयायिकांच्या व ध्वनिवाद्यांच्या मताला अनुसरून महिमभट्टाने शब्दांच्या अर्थांचे वाच्य व प्रतीयमान हे दोन प्रकार मानले आहेत. परंतु ध्वनिवादी प्रतीयमान अर्थाला व्यंग्य अर्थ म्हणतात व तो व्यंजनानामक शब्दव्यापारामुळे ध्यानात येतो असे मानतात,[९] तर नैयायिक (व महिमभट्ट) हे अनुमितिवादी असल्याने प्रतीयमान अर्थाला अनुमेय अर्थ म्हणतात व तो अनुमिति या मानस-व्यापारामुळे ध्यानात येतो असे मानतात. त्यांच्या मते अर्थाचे वाच्य अर्थ व अनुमेय अर्थ हे दोनच प्रकार असून ते अनुक्रमे अभिधा या शब्दव्यापारामुळे व अनुमिति या अर्थव्यापारामुळे (म्हणजे मानसव्यापारामुळे) ध्यानात येतात.[१०]

---

९) भामह, दण्डिन्, उद्भट, रुद्रट व वामन या ग्रंथकारांनी आपल्या ग्रंथांमध्ये व्यंग्यार्थयुक्त अनेक वाच्यालंकारांचा विचार केला असला, तरी व्यंग्यार्थाचा स्वतंत्रपणे विचार केलेला नाही. म्हणजे व्यंग्यार्थ हे काव्यातील अत्यंत महत्त्वाचे सौंदर्यतत्त्व या दृष्टीने त्याचा विचार केलेला नाही. व्यंग्यार्थ हे एक उपजीव्य व स्वयंभू सौंदर्यतत्त्व म्हणून त्यांना मान्य नसावे असे वाटते. "गतोऽस्तमर्को भातीन्दुर्यान्ति वासाय पक्षिणः" यासारख्या वाक्यांना त्यातील वस्तुध्वनीमुळे रसध्वनीमुळे उत्तम काव्याची उदाहरणे म्हणून जरी ध्वनिवाद्यांनी मान्यता दिली असली, तरी भामह (काव्यालंकार २, ८७-८८) त्यांना काव्याची उदाहरणे मानीत नाही, कारण त्यामध्ये वक्रोक्ति नाही व ती केवळ वस्तुस्थितीचे कथन करणारी आहेत. काव्यालंकाराच्या सहाव्या प्रकरणात (श्लोक ८–१५) भामहाने वैयाकरणांच्या स्फोटसिद्धान्ताचे खंडन केले आहे. ध्वनिवाद्यांनी ध्वनिसिद्धान्त प्रतिपादताना वैयाकरणांच्या ज्या स्फोटसिद्धान्ताचा आधार घेतला तो स्फोट-सिद्धान्त भामहाला मान्य नसल्याने त्याला व्यंग्य अर्थ हा काव्यातील एक स्वयंभू, स्वतंत्र, सर्वश्रेष्ठ सौंदर्यतत्त्व म्हणून मान्य नव्हते असे वाटते.

१०) व्य. वि. १, पृ. ४७ : अर्थोऽपि द्विविधः। वाच्योऽनुमेयश्च। तत्र शब्दव्यापार-विषयो वाच्यः। स एव मुख्य उच्यते।... तत एव तदनुमिताद् वा लिङ्गभूताद् यदर्थान्तरमनुमीयते सोऽनुमेयः।

ललित साहित्याच्या संदर्भात महिमभट्टाच्या मते प्रतीयमान (म्हणजे अनुमेय) अर्थाचे (१) वस्तु, (२) अलंकार व (३) रस, भाव आदि हे तीन प्रकार आहेत. त्यांपैकी पहिले दोन (म्हणजे वस्तु व अलंकार) वाच्य सुद्धा असू शकतात. पण रसभाव आदि अनुमेय अर्थ केव्हाही वाच्य असू शकत नाही, तो केवळ अनुमेयच असू शकतो.११ वस्तु व अलंकार या प्रकारचा अर्थ वाच्य असताना जितका सुंदर वाटतो त्यापेक्षा अनमेय असताना तो किती तरी अधिक मनोहर वाटतो.१२ याबाबतीत ध्वनिवाद्यांसारखेच महिमभट्टाचे मत आहे. निराळेपणा एवढाच की ध्वनिवादी अनुमेय या शब्दाऐवजी व्यंग्य हा शब्द वापरतात, तर अनुमितिवादी व्यंग्य या शब्दाऐवजी अनुमेय हा शब्द व व्यंजना या शब्दाऐवजी अनुमिति हा शब्द वापरतात.

वाक्यातील शब्दांचे वाच्यार्थ व त्यामुळे नंतर ध्यानात येणारा दुसरा (म्हणजे प्रतीयमान) अर्थ, यामध्ये जसा अनुमापक-अनुमेय संबंध (किंवा हेतुहेतुमत्संबंध अथवा लिङ्गलिङ्गिसंबंध) असतो तसाच वाक्यातील शब्दांच्या वाच्य अर्थामध्ये असतो. वाक्यांच्या द्वारा जे विचार प्रगट केले जातात ते काही वेळा सिद्धरूप म्हणजे आधीच अस्तित्वात असलेल्या वस्तूविषयी किंवा व्यक्तीविषयी केवळ निवेदन करणारे (सिद्धवस्तुकथनपर) असतात. उदा० 'भारताच्या उत्तर सीमेवर हिमालय पर्वत आहे.' अशा प्रकारच्या केवळ वस्तुस्थितिकथनपर वाक्यांमध्ये वाच्यार्थांच्या बाबतीत हेतुहेतुमद्भाव (किंवा साधनसाध्यभाव) हा संबंध नसतो. परंतु ज्यावेळी वाक्याच्या द्वारा आपण एखाद्या वस्तूविषयी किंवा व्यक्तीविषयी आपले मत प्रगट करतो व त्याचे समर्थन करण्यासाठी काहीतरी समर्थक कारण सांगतो त्यावेळी वाक्यांतील वाच्यार्थांमध्ये साधनसाध्यभाव हा संबंध आढळून येतो. भाषिक व्यवहारातील पुष्कळ वाक्ये अशा रीतीने साधनसाध्यभावावर म्हणजे अनुमितिप्रक्रियेवर

---

११) व्य. वि. १, पृ. ४७ : स च त्रिविधः। वस्तुमात्रम्। अलङ्काराः, रसादयश्चेति। तत्राद्यौ वाच्यावपि संभवतः। अन्त्यस्तु अनुमेय एव। तुलना, लोचन १, पृ. ५०-५१.

१२) व्य. वि. १, पृ. ७५ : न च सुखयति वाच्योऽर्थः प्रतीयमानः (= अनुमेयः) स एव यथा।

आधारलेली असतात. भाषिक व्यवहारामध्ये जी वाक्ये त्यांच्या श्रोत्याने एखादी कृति करावी किंवा एखादी कृति करू नये असे सांगणारी असतात, त्यांच्या बाबतीत सुद्धा श्रोत्याने विशिष्ट कृति का करावी किंवा विशिष्ट कृति का करू नये हे त्याला पटवून देण्यासाठी कारणे सांगावी लागतात. वस्तुस्थितिकथनपर वाक्यामध्ये विशिष्ट वस्तुस्थितीचे केवळ निवेदन करणे हाच वक्त्याचा उद्देश असला, तरी तेथे सुद्धा ती वस्तुस्थिती विशिष्ट रूपाचीच का आहे व त्याहून निराळी का नाही हे ऐकणाऱ्याला पटविण्यासाठी कारणे सांगणे अवश्य असते. अशा प्रकारे भाषिक व्यवहार वाच्यार्थाच्या पातळीवरसुद्धा प्रायः साधनसाध्यभावावर अधिष्ठित असतो. हा साधनसाध्यभाव म्हणजे अनुमितिप्रक्रियेतील हेतुहेतुमद्‌भाव किंवा लिङ्गलिङ्गिभावच होय. महिमभट्टाच्या मते वाक्यातून प्रतीत होणारा पण शब्दांच्या वाच्यार्थाहून निराळा असणारा अर्थ (म्हणजे तथाकथित लक्ष्य अर्थ, तात्पर्यार्थ व व्यङ्ग्य अर्थ) हाच केवळ अनुमेय असतो असे नसून स्वतः वाच्यार्थसुद्धा साधनसाध्यभावावर आधारलेला असतो. अशा प्रकारे प्रायः सर्व प्रकारच्या भाषिक व्यवहारांमध्ये अनुमितीची प्रक्रिया अव्याहतपणे चालू असते.[१३]

वाच्यार्थाच्या ज्ञानानंतर वाक्यातून ध्यानात येणारा दुसरा अर्थ म्हणजे प्रतीयमान अर्थ किंवा अनुमेय अर्थ हा वस्तुरूप, अलंकाररूप व रसभावादिरूप (म्हणजे भावनात्मक आशय) असा तीन प्रकारचा असतो. अनुमितिप्रक्रिया तीनही प्रकारच्या प्रतीयमान (किंवा अनुमेय) अर्थाच्या बाबतीत आढळून येते. या दृष्टीने अनुमितिप्रक्रिया ही एक फार व्यापक प्रक्रिया आहे. कारण ती मानवी मनोव्यापारांचे कळतपणे किंवा नकळतपणे एक मूलभूत व अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. ध्वनिवादी ज्या शब्दशक्तीला व अर्थशक्तीला व्यंजना म्हणतात ती अनुमितिप्रक्रियेचा एक आविष्कार आहे. व्यंजनेचे तात्त्विक स्वरूप अनुमापकत्व हेच असल्याने व्यंजनेचा अन्तर्भाव अनुमितीमध्ये होतो

---

१३) व्य. वि. १, पृ. २६-२७ : सर्व एव हि शब्दो व्यवहार साध्यसाधनगर्भतया प्रायेणानुमानरूपोऽभ्युपगन्तव्यः । तस्य परप्रवृत्तिनिवृत्तिनिबन्धनत्वात्, तयोश्च संप्रत्ययासंप्रत्ययात्मनोः अन्यथा कर्तुमशक्यत्वात् । न हि युक्तिमनवगच्छन् कश्चिद् विपश्चिद् वचनमात्रात् संप्रत्ययभाग् भवति ।

असेच म्हटले पाहिजे.[१४] व्यंजना हा शब्दार्थव्यापार काही काव्यात्म प्रकृतीच्या लोकांनी ललितवाङ्मयाच्या संदर्भात स्वीकारला आहे.[१५] तर्कशास्त्राच्या कसोटीवर व्यंजनाचे स्वरूप तपासून पाहिल्यास व्यंजनाव्यापार अनुमिति-व्यापाराहून निराळा नसल्याचे सिद्ध होते.

### काव्यातील व्यंजनावृत्तीचे सैद्धान्तिक दृष्टचा खंडन[१६]

व्यंजना व्यापाराचे खरे स्वरूप कसे असते, तो कोणत्या परिस्थितीमध्ये प्रवृत्त होतो, त्याचे निरनिराळे प्रकार व तो काव्यातील शब्दांच्या वाच्यार्थाचे ठिकाणी असणे कसे अशक्य आहे यासंबंधी चर्चा महिमभट्टाने प्रथम विमर्श पृ. ८०–८६ येथे केली आहे. ही चर्चा ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनातील फार महत्त्वाचा भाग आहे. म्हणून ती खाली विस्तृत स्वरूपात दिली आहे.

वाच्य अर्थ व तथाकथित व्यंग्य अर्थ यांच्यामध्ये व्यंजकव्यंग्यभाव खऱ्या अर्थाने असू शकत नाही. म्हणजे वाच्य अर्थ हा व्यंजक व त्याच्या नंतर काही वेळाने ध्यानात येणारा वस्तु, अलंकार व रसादि या रूपाचा प्रतीयमान अर्थ हा व्यंग्य असे काटेकोरपणाने म्हणता येणार नाही; तर केवळ लक्षणेने किंवा ढिलेपणाने म्हणणे शक्य आहे. कारण व्यंजना व्यापार (अभिव्यक्ती) म्हणजे एक प्रकारची प्रकाशनक्रियाच आहे व तिला पुढील चार गोष्टींची आवश्यकता असते : (१) प्रकाश्य वस्तू; (२) प्रकाश्य वस्तूचे प्रकाशन करणारी प्रकाशक वस्तू; (३) प्रकाश्य वस्तू व प्रकाशक वस्तू या दोहोंचे एकाच वेळी ज्ञान

---

१४) व्य. वि. १, पृ. ६७ : तदेवं वाच्यप्रतीयमानार्थयोः लिङ्गलिङ्गिभावस्य समर्थनात् सर्वस्यैव ध्वनेः अनुमानान्तर्भावः समन्वितो भवति, तस्य (अनुमानस्य) च तदपेक्षया (ध्वन्यपेक्षया) महाविषयत्वात्।

१५) जयन्तभट्ट, न्यायमञ्जरी (पृ. ४५, काशी संस्कृत सीरिज, क्रमांक १०६, इ. स. १९२६) : अथवा नेदृशी चर्चा कविभिः सह शोभते। विद्वांसोऽपि विमुह्यन्ति वाक्यार्थगहनेऽध्वनि ॥

१६) महिमभट्टाने व्यंजनावृत्तीचे जे सैद्धान्तिक पातळीवर खंडन केले आहे, त्या संबंधी डॉ. बी. भट्टाचार्य यांनी Indian Culture, Vol. 13, No. 1 (pp. 59-63) येथे छापलेल्या Suggestion versus Inference in Sanskrit Aesthetics या लेखामध्ये चर्चा केली आहे.

होणे, म्हणजे त्या दोहोंमध्ये समकालीनत्व असणे; व (४) त्या दोन वस्तूंमध्ये प्रकाश्यप्रकाशकसंबंधाव्यतिरिक्त कोणताही संबंध नसणे (उदाहरणार्थ संयोग). प्रकाश्य वस्तू ही सद्रूप म्हणजे अस्तित्वात असणारी किंवा असद्रूप म्हणजे अस्तित्वात नसणारी असू शकते.

सद्रूप वस्तूच्या व्यंजनेचे तीन प्रकार आहेत : (१) उपादानकारणापासून होणारी कार्याची व्यंजना. उपादानकारणामध्ये त्याचे कार्य आधीपासूनच शक्तिरूपाने, म्हणजे सूक्ष्मरूपाने असले तरी ते अदृश्य असते. ते प्रकट स्वरूपात दिसू लागणे हा व्यंजनेचा पहिला प्रकार होय. उदाहरणार्थ दूध या उपादानकारणामध्ये दही आधीपासूनच शक्तिरूपाने (potentially) असते, पण ते दही या विशिष्ट रूपात अदृश्य असते. दुधावर तापविणे व विरजण लावणे या प्रक्रिया केल्यानंतर काही वेळाने दही प्रगट होते. येथे दूध हे व्यंजक व दही हे व्यंग्य असल्याने त्या दोहोंमध्ये व्यंजकव्यंग्यसंबंध आहे. जे लोक दुधामध्ये दही आधीपासूनच शक्तिरूपाने नसते असे मानतात, त्यांच्या मते दही हे दुधापासून उत्पन्न होते. व्यंजनेचा (किंवा अभिव्यक्तीचा) हा पहिला प्रकार सांख्यदर्शनातील सत्कार्यवादावर आधारलेला आहे. (२) कार्य (म्हणजे वस्तू) अस्तित्वात आल्यानंतर कोणत्यातरी प्रतिबंधक कारणामुळे त्याचे ज्ञान नेत्रादि इंद्रियांना होत नाही. अशा वेळी त्या प्रतिबंधक कारणावर मात करणाऱ्या प्रभावी साधनामुळे, त्या प्रभावी साधनाच्या ज्ञानाबरोबरच आधीच अस्तित्वात असलेल्या त्या वस्तूचे ज्ञान नेत्रादि इंद्रियांना होणे हा अभिव्यक्तीचा दुसरा प्रकार होय. उदाहरणार्थ अंधाऱ्या खोलीत आधीपासून असलेल्या, पण अंधारामुळे न दिसणाऱ्या घट वगैरे पदार्थांचे ज्ञान दिव्याच्या प्रकाशामुळे, त्या प्रकाशाच्या ज्ञानाबरोबरच, होते. म्हणजे प्रकाश्य घट व प्रकाशक दिवा या दोहोंचे ज्ञान एकाच वेळी होते.[१७] येथे दिवा हा व्यंजक व घट हा व्यंग्य

---

१७) व्यंजनेच्या बाबतीतील घटप्रदीपदृष्टान्त आनन्दवर्धनाच्या पूर्वी भर्तृहरि या वैयाकरणाने वाक्यपदीय २, २९८–२९९ येथे निर्देशिला आहे. (घटादिषु यथा दीपो येनार्थेन प्रयुज्यते। ततोऽन्यस्यापि सान्निध्यात् स करोति प्रकाशनम्॥ संसर्गिषु तथार्थेषु शब्दो येन प्रयुज्यते। तस्मात् प्रयोजनादन्यानपि प्रत्याययत्यसौ॥)

असल्याने त्या दोहोंमध्ये व्यंजकव्यंग्यसंबंध आहे. प्रकाशक व प्रकाश्य वस्तूंची ज्ञाने एकाच वेळी मनुष्याला होतात हे ध्वन्यालोकात (उद्योत ३, पृ. ४२४) आनंदवर्धनानेसुद्धा दीपघटदृष्टान्त देऊन मान्य केले आहे. (३) एखादी वस्तू आपण पूर्वी अनुभविलेली असल्यामुळे तिचे संस्कार आपल्या मनावर उमटलेले असतात, म्हणजे ती वस्तू संस्काररूपाने आपल्या मनात राहिलेली असते. आता त्या वस्तूशी नित्य साहचर्य असलेली दुसरी एखादी वस्तू आपण पाहिली किंवा त्या वस्तूची रेखाकृती, रंगाकृती किंवा शिल्पाकृती आपण पाहिली किंवा त्या वस्तूचे पाण्यातील अथवा आरशातील प्रतिबिंब आपल्या दृष्टीस पडले किंवा त्या वस्तूचा प्रतिपादक भाषिक शब्द आपण ऐकला, की त्या मूळ वस्तूचे आपल्या मनात उमटलेले संस्कार जागृत होतात व त्यामुळे त्या वस्तूचे स्मृतिरूप ज्ञान आपणास होते. हे स्मृतिरूप ज्ञान म्हणजे त्या मूळ वस्तूचे आपल्या मनात झालेले प्रकाशन (व्यंजना किंवा अभिव्यक्ती)च होय. ज्या वस्तूचे स्मृतिरूप ज्ञान (स्मरण) आपणास होते, ती वस्तू प्रकाश्य किंवा व्यंग्य असते व तिच्याशी नित्य साहचर्याने संबद्ध अशा दुसऱ्या वस्तूचे ज्ञान हे प्रकाशक किंवा व्यंजक असते. उदाहरणार्थ एखादे चित्र किंवा मूर्ती पाहिली

---

अंधाऱ्या खोलीतील घटादि पदार्थांचे दिव्याच्या प्रकाशामुळे जेव्हा प्रकाशन (किंवा अभिव्यक्ती) होते, तेव्हा दिव्यापासून सगळीकडे पसरणाऱ्या प्रकाशाचे ज्ञान व घटादि पदार्थांचे ज्ञान एकाच वेळी होणे हा अभिव्यक्ती या संकल्पने-मधील महत्त्वाचा मुद्दा आहे. दिव्याचा प्रकाश घटादि पदार्थांवर पडला की ते पदार्थ डोळ्यांना दिसू लागतात. प्रकाश हा स्वतः अदृश्य असतो. तो मूर्त वस्तूंवर पडला की त्याची व त्या वस्तूंची जाणीव डोळ्यांना होते. म्हणजे प्रकाशाचे चाक्षुष ज्ञान व त्याने प्रकाशित केलेल्या घटादि मूर्त पदार्थांचे चाक्षुष ज्ञान एकाच वेळी घडून येतात. प्रकाशाचे ज्ञान प्रथम व प्रकाश्य वस्तूचे ज्ञान त्यानंतर काही वेळाने, असा पौर्वापर्यक्रम नसतो.

वस्तुतः आधुनिक भौतिकी विद्येनुसार दिव्याचे किरण प्रथम घटादि पदार्थांवर पडतात व तेथून परावर्तित होऊन पाहाणाऱ्याच्या नेत्रपटलावर पडतात. या दोन क्रिया होण्यास थोडासा काळ लागतो, यात मुळीच शंका नाही. त्यामुळे दिव्याचा प्रकाश व घटादि पदार्थांचे ज्ञान यांमध्ये पौर्वापर्य असतेच. ते असले तरी ध्यानात येत नाही एवढेच फार तर म्हणता येईल.

किंवा भाषेतील गो (गाय) वगैरे शब्द ऐकले की आपल्या मनात त्या चित्राचा किंवा मूर्तीचा विषय व गो (गाय) वगैरे शब्दांचे अर्थ प्रगट होतात किंवा प्रकाशित होतात.

अभिव्यक्तीच्या वरील तीनही प्रकारांमध्ये अभिव्यक्त होणाऱ्या वस्तू (म्हणजे दही, घट, चित्रविषय व गाय) या सद्रूप म्हणजे अस्तित्वात असणाऱ्या आहेत.

परंतु असद्रूप वस्तूच्या अभिव्यक्तीचा एकच प्रकार संभवतो. उदा. सूर्याच्या किंवा चंद्राच्या प्रकाशामुळे इन्द्रधनुष्य ही असद्रूप वस्तू प्रकाशित होते.१८

---

१८) इन्द्रधनुष्य हे आभासरूप म्हणजे असद्रूप असते व त्याची अभिव्यक्ती सूर्यप्रकाश इत्यादिकामुळे होते असे महिमभट्टाने म्हटले आहे. इत्यादिक म्हणजे चन्द्रप्रकाश किंवा दिव्याचा तेजस्वी प्रकाश असे समजावे. इन्द्रधनुष्याच्या खऱ्या स्वरूपाचा विचार केल्यास असे दिसते की वातावरणातील सूक्ष्म जलबिन्दूंमधून प्रकाशकिरण आरपार जाताना त्या प्रकाशकिरणांचे सात घटक रंगांच्या रूपात विघटन झाल्याने दिसू लागलेला सात रंगांचा वक्राकार पट्टा म्हणजेच इन्द्रधनुष्य होय. तेव्हा इन्द्रधनुष्य म्हणजे विघटित प्रकाशच. आता प्रकाश हा सद्रूप किंवा भावरूपच आहे. तो असद्रूप (म्हणजे अभावरूप) मुळीच नाही. शिवाय, प्रकाश हा स्वयंप्रकाश असतो. तो परप्रकाश नसतो. म्हणजे प्रकाशाची जाणीव डोळ्यांना होताना त्या प्रकाशाहून निराळ्या कारणाची आवश्यकता नसते. आता इन्द्रधनुष्य हे प्रकाशरूपच असल्याने ते स्वयंप्रकाश आहे. ते पूर्वी स्वतंत्रपणे अस्तित्वात असून किंवा नसून प्रकाशामुळे प्रकाशित होते असे मुळीच नाही, प्रकाश हा जसा सद्रूप किंवा भावरूप तसेच इन्द्रधनुष्यही सद्रूप किंवा भावरूप असते. ते असद्रूपही नाही व सूर्यादिकांच्या प्रकाशामुळे प्रकाशित होणारेही नाही. सूर्यादिकांचा प्रकाश हे इन्द्रधनुष्याचे उपादान कारण आहे असे म्हणता येईल, अभिव्यंजक कारण आहे असे म्हणता येणार नाही. दूध हे दह्याचे अभिव्यंजक कारण आहे असे ज्या मर्यादित अर्थाने म्हणता येईल, त्याच मर्यादित अर्थाने सूर्यादिकांचा प्रकाश इन्द्रधनुष्याचे अभिव्यंजक कारण आहे असे फार तर म्हणता येईल. असद्रूप वस्तूच्या अभिव्यक्तीचे अधिक चांगले उदाहरण म्हणजे अविद्यमान सर्पाची अंधुक प्रकाशात होणारी अभिव्यक्ती किंवा सूर्याच्या उष्णतेमुळे तापलेल्या भूपृष्ठावर मृगजळाची होणारी अभिव्यक्ती हे होय.

इन्द्रधनुष्य हा केवळ एक आभास असतो. त्याच्या ठिकाणी कोणतेही वस्तुत्व नसते. पण ते सूर्यचन्द्रप्रकाशामुळे अभिव्यक्त होत असल्याने इन्द्रधनुष्य व सूर्यचन्द्रप्रकाश यांमध्ये व्यंजकव्यंग्यसंबंध असतो.

अभिव्यक्तीच्या या प्रकारांमध्ये ध्वनिवाद्यांच्या मते वाच्यार्थामुळे होणारे तथाकथित व्यंग्य अर्थांचे ज्ञान बसत नाही. अभिव्यक्तीचा पहिला प्रकार उपादान कारण व कार्य यांच्यामधील संबंधावर आधारलेला असतो. परंतु वाच्य अर्थ व तथाकथित व्यंग्य अर्थ यांमध्ये उपादानकारण-कार्यसंबंध नसतो, म्हणजे वाच्य अर्थ हा व्यंग्य अर्थाचे उपादानकारण नसतो, तर तो तथाकथित व्यंग्य अर्थाचे ज्ञापक कारण असतो. तसेच दही हा नेत्रग्राह्य व हस्तग्राह्य पदार्थ आहे, पण व्यंग्य अर्थ हा नेत्रग्राह्य व हस्तग्राह्य पदार्थ नाही : तो केवळ मनाच्या मनन या व्यापाराचा विषय असतो. अभिव्यक्तीच्या दुसऱ्या प्रकारात प्रकाशक दीप व प्रकाश्य घट या दोहोंचे ज्ञान एकाच वेळी होते, म्हणजे त्यांच्यामध्ये समकालीनत्व असते. परंतु वाच्यार्थज्ञान व व्यंग्यार्थज्ञान यांच्यामध्ये समकालीनत्व नसून क्रमिकत्व (म्हणजे पौर्वापर्य) असते. वाच्यार्थाचे ज्ञान प्रथम होते व व्यंग्यार्थाचे ज्ञान त्यानंतर काही वेळाने होते. कारण त्या दोहोंमध्ये निमित्तनैमित्तिकसंबंध (म्हणजे कारणकार्यसंबंध) असतो. ही गोष्ट ध्वन्यालोकात आनंदवर्धनानेसुद्धा मान्य केली आहे.१९ वस्तुध्वनि व अलंकारध्वनि

---

१९) ध्वन्यालोक ३, पृ. ४०४ : अत एव विभावादिप्रतीत्यविनाभाविनी रसादीनां प्रतीतिरिति तत्प्रतीत्योः कार्यकारणभावेन व्यवस्थानात् क्रमोऽवश्यंभावी । स तु लाघवान्न प्रकाशते, इति अलक्ष्यक्रमा एव रसादय इत्युक्तम् । घटप्रदीपदृष्टान्त ध्वनिवाद्यांनी स्वीकारलेल्या भाषिक व्यंजनावृत्तीच्या बाबतीत लागू पडत नाही याचे दुसरेही एक कारण महिमभट्टाने असे सांगितले आहे की घट ही इन्द्रियग्राह्य, जड, मूर्त वस्तू आहे. परंतु ध्वनिवाद्यांच्या मतानुसार वाच्यार्थामुळे प्रतीत होणारा तथाकथित व्यंग्य अर्थ हा घटाप्रमाणे इन्द्रियग्राह्य, जड, मूर्त वस्तू नसून मनोग्राह्य, अमूर्त अर्थ असतो. परंतु महिमभट्टाचा हा युक्तिवाद प्रत्ययकारी नाही. कारण अभिव्यक्त होणारे अर्थ हे दोन प्रकारचे असतात : (१) चक्षुरादिइन्द्रियग्राह्य जड मूर्त वस्तू; (२) केवळ मनोग्राह्य अमूर्त अर्थ. हे दोनही प्रकारचे अर्थ आपापल्या अभिव्यंजक कारणांमुळे अभिव्यक्त होतात. दुसऱ्या प्रकारामध्ये

या दोनही ध्वनिप्रकारांमध्ये वाच्यार्थ ज्ञान व व्यंग्यार्थज्ञान यांमध्ये पौर्वापर्य असते व ते स्पष्टपणे प्रतीत होते हे ध्वनिवाद्यांनी त्या दोनही प्रकारांना संलक्ष्यक्रम हे नाव देऊन मान्य केलेच आहे. रसादिध्वनीच्या बाबतीतले पौर्वापर्यसुद्धा ध्वनिवाद्यांनी मान्य केले आहे. कारण त्यांनी रसादिध्वनीला असंलक्ष्यक्रम हे नाव दिले आहे. याचा अर्थ असा होतो की रसादिध्वनीच्या बाबतीत वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमध्ये पौर्वापर्य नसते असे मुळीच नाही. परंतु ते पौर्वापर्य इतके सूक्ष्म (अल्प) असते की ते ध्यानात येत नाही. अशा रीतीने सर्वत्र ध्वनिप्रकारांमध्ये व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाबरोबर प्रतीत होत नसून वाच्यार्थाच्या नंतर काही वेळाने प्रतीत होतो. असे असल्याने अभिव्यक्तीच्या दुसऱ्या प्रकारात ध्वनि बसत नाही, हे स्पष्ट होते.

---

वाच्यार्थामुळे प्रतीत होणाऱ्या व्यंग्य अर्थाचा अन्तर्भाव होतो. एखादी वस्तु पाहिली असता तत्संबद्ध दुसऱ्या वस्तूची जी आठवण होते ती व्यंजनेनेच होते असे म्हणता येईल. दुसऱ्या वस्तूचे स्मरण होताना ती वस्तु मूर्त स्वरूपात उपस्थित नसते, तर जागृत झालेले अमूर्त संस्कार या रूपात ती असते. जागृत झालेल्या अमूर्त संस्कारांचे जे ज्ञान होते ते इन्द्रियप्रत्यक्षाने होत नाही तर मानसप्रत्यक्षाने होते. यावरून हे सिद्ध होते की अमूर्त रूपाचा अर्थसुद्धा अभिव्यक्त होऊ शकतो. व्यंजनेच्या बाबतीत पुढे केला जाणारा घटप्रदीपदृष्टान्त हा एकांगी आहे. प्रकाश्य पदार्थ हा मूर्तच असला पाहिजे व तो इन्द्रियप्रत्यक्षाचा विषय असला पाहिजे असे नाही. तो अमूर्त व मानसप्रत्यक्षाचा सुद्धा विषय असू शकतो हा मुद्दा विमर्श ३, पृ. ५१० येथे महिमभट्टाने मान्य केला आहे. काही निपात (उद्गारवाचक अव्यये) क्रोध, शोक, आश्चर्य वगैरे भावना द्योतित करतात असे म्हणुन त्याने आपल्या या मताच्या समर्थनासाठी प्रदीपाच्या (म्हणजे घटप्रदीपाच्या) दृष्टान्ताचा हवाला दिला आहे. (केचित् पुनर्निपाताः क्रोधाद्भुतशोकादीन् भावान् प्रदीपवद् वक्तृगतान् द्योतयन्ति, न वाच्यगतान्।). तेव्हा प्रकाश्यप्रकाशकसंबंध (म्हणजे व्यंग्यव्यंजकसंबंध) घटादि मूर्त वस्तूंच्या बाबतीतच असू शकतो, हा महिमभट्टाचा निष्कर्ष बरोबर नाही. प्रकाश्यप्रकाशकसंबंध अमूर्त वस्तूंच्या बाबतीतसुद्धा असू शकतो हे महिमभट्टाच्या म्हणण्यावरूनच सिद्ध होते.

अभिव्यक्तीचा तिसरा प्रकार हा अनुमानाशी जुळणारा म्हणजे अनुमितिरूपच आहे.२० तो अनुमानाहून निराळा नाही असे महिमभट्टाने म्हटले आहे. अभिव्यक्तीच्या तिसऱ्या प्रकारात ध्वनीचा अन्तर्भाव होऊ शकेल, असा महिमभट्टाचा दावा आहे. पण तो ध्वनिवाद्यांना कधीही मान्य होणारा नाही. कारण अभिव्यक्तीच्या तिसऱ्या प्रकारात (म्हणजे अनुमानात) ध्वनीचा अन्तर्भाव होतो असे म्हणणे म्हणजे व्यंजनावाद सोडून अनुमितिवादाचा स्वीकार करणेच होय.

**ध्वन्यालोकातील ध्वनिकाव्याच्या लक्षणाचे खंडन**

व्यंजनाव्यापाराचे तात्त्विकदृष्टया खंडन केल्यानंतर, ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनाचा दुसरा महत्त्वाचा भाग म्हणून ध्वन्यालोक १.१३ येथे ध्वनिकाव्याचे जे लक्षण सांगितले आहे,२१ त्यातील दहा दोष दाखवून त्या लक्षणाचे खंडन महिमभट्टाने केले आहे. या दहा दोषांची यादी व्य. वि. १.२३-२४ (पृ. ११०) येथे दिली असून२२ त्यांची सविस्तर चर्चा पृ. ७ ते १०९ येथे केली आहे. या दहा दोषांचे स्वरूप पुढीलप्रमाणे—

---

२०) गो हा शब्द कोणीतरी उच्चारलेला ऐकल्यानंतर गाय या विशिष्ट चतुष्पाद पशूचे ज्ञान श्रोत्याला होणे हा तृतीय अभिव्यक्तीचा एक प्रकार म्हणून महिमभट्टाने निर्देशिला आहे. आता तृतीय अभिव्यक्ती म्हणजे अनुमितीच होय असे पृ. ८१ वर महिमभट्टाने म्हटले आहे. (तृतीयस्यास्तु यल्लक्षणं तदनुमानस्यैव संभाव्यते।). याचा अर्थ असा होतो की गो या शब्दामुळे गाय या पशूचे जे ज्ञान होते, ते अनुमितिरूपच असते. म्हणजे अभिधा या शब्दवृत्तीचा अन्तर्भाव अनुमिति या मानसवृत्तीमध्ये होतो असे मानण्याचा प्रसंग उत्पन्न होतो. पण महिमभट्टाने तर अभिधा ही स्वतंत्र शब्दवृत्ति आहे हे आपले मत व्यक्तिविवेकात अनेक ठिकाणी आग्रहपूर्वक प्रतिपादिले आहे. पहा : व्य. वि. १,२७ (पृ. १११) व २, पृ. ४६२. गौतमाच्या न्यायसूत्रामध्ये (२, १.५५) सुद्धा शब्दापासून वाच्यार्थाचे ज्ञान होणे हा अनुमितीचा प्रकार नाही असे युक्तिवादपूर्वक सिद्ध केले आहे.

२१) यत्रार्थः शब्दो वा तमर्थमुपसर्जनीकृतस्वार्थौ।
व्यङ्क्तः काव्यविशेषः स ध्वनिरिति सूरिभिःकथितः॥

२२) अर्थस्य विशिष्टत्वं, शब्दः, सविशेषणः, तदःपुंस्त्वम्।
द्विवचनवाशब्दौ च, व्यक्तिः, ध्वनिनाम, काव्यवैशिष्ट्यम्॥

(१) व (२) : शब्द आणि वाच्य अर्थ हे तथाकथित व्यंग्य अर्थाला प्रगट करताना स्वतःकडे दुय्यम स्थान घेतात. ही शब्दयोजना शास्त्रीय लक्षणाच्या दृष्टीने योग्य नाही. कारण शब्द व वाच्यार्थ हे तथाकथित व्यंग्य अर्थ प्रगट करण्याची साधने असल्याने त्यांना दुय्यम स्थान प्राप्त होते ही गोष्ट ओघानेच येते. शास्त्रीय लक्षणामध्ये या गोष्टीचा निर्देश करण्याची मुळीच आवश्यकता नाही. आता ध्वनिवाद्यांच्या मते गुणीभूतव्यंग्य काव्यामध्ये वाच्यार्थ प्रधान व व्यंग्यार्थ अप्रधान असल्यामुळे ध्वनिकाव्याचे लक्षण गुणीभूतव्यंग्य काव्यावर अतिव्याप्त होऊ नये म्हणून ध्वनिकाव्यामध्ये शब्द व वाच्यार्थ स्वतःकडे दुय्यम स्थान घेतात असे म्हटले असल्याचा दावा ध्वनिवादी करू शकेल. पण ते बरोबर नाही. कारण गुणीभूतव्यंग्य काव्यातील वाच्यार्थ हा प्रस्तुत असल्यामुळेच प्रधान असतो. तो तथाकथित व्यंग्य अर्थाच्या तुलनेने प्रधान असतो असे मुळीच नाही. प्रतीयमान अर्थ (म्हणजे तथाकथित व्यंग्यार्थ) हा वाच्यार्थाचे साध्य असल्यामुळे प्रधानच असतो; व वाच्यार्थ हा प्रस्तुत असल्याने प्रधान असतो. दोघांचे प्रधानत्व निरनिराळ्या कारणांमुळे उत्पन्न झालेले असते. शिवाय गुणीभूतव्यंग्य काव्यामध्ये तथाकथित व्यंग्य अर्थ हा वाच्यार्थाचे सौंदर्य स्वतःच्या सौंदर्याने वाढवीत असल्यामुळे वाच्यार्थाच्या तुलनेने अप्रधान असल्याचे वरवर पाहता वाटत असले तरी वाच्यार्थाचे सौंदर्य व्यंग्य अर्थाच्या स्वयंभू सौंदर्यामुळे उत्पन्न होत असल्याने व्यंग्यार्थ हाच खऱ्या अर्थाने सुंदर व प्रधान असतो असे म्हणावे लागते.

---

वचनं च कथनकर्तुः, कथिता ध्वनिलक्ष्मणीति दश दोषाः ।
ये त्वन्ये तद्भेदप्रभेदलक्षणगता न ते गणिताः ॥

हे सर्व दहा दोष अवाच्यवचन या दोषाच्या स्वरूपाचे आहेत. अवाच्यवचन या दोषाचे विवेचन महिमभट्टाने विमर्श २, पृ. ४३६–४९५ येथे केले आहे. अवाच्यवचन म्हणजे जे बोलून दाखविणे योग्य नाही ते बोलून दाखविणे. दोष क्रमांक ४ बरोबर प्रक्रमभेद हा दोषही आहे, तर दोष क्रमांक ९ बरोबर शास्त्रीय लक्षणाच्या दृष्टीने अव्याप्ति हा दोष आहे. प्रक्रमभेद या दोषाचा विचार विमर्श २, पृ. २८७–३३१ येथे केला आहे.

(३) ध्वनिकाव्यामध्ये शब्द व वाच्यार्थ दुसऱ्या अर्थाला अभिव्यक्त करतात हे विधान बरोबर नाही. कारण शब्दांच्या व वाच्यार्थांच्या ठिकाणी व्यंजकत्वसामर्थ्य कधीच नसते. शब्द हे संकेतसिद्ध अर्थाचे केवळ वाचक असतात व वाच्यार्थ हे अर्थांतरचे (म्हणजे तथाकथित व्यंग्य अर्थाचे) केवळ अनुमापक असतात.२३

(४) ध्वनिलक्षणामध्ये तम् अर्थम् असा जो द्वितीया विभक्तीचा उपयोग केला आहे (पृ. ९७) तो आक्षेपार्ह आहे. कारण ध्वन्यालोकातील १.१३ या कारिकेच्या पूर्वी कारिका १.६ मध्ये व्यंग्य अर्थाचा निर्देश प्रतीयमानं वस्तु या नपुंसकलिंगी शब्दांनी केला आहे.२४ म्हणून येथे प्रक्रमभेद हा दोष उत्पन्न झाला आहे.२५

(५) ध्वनिलक्षणामध्ये व्यङ्क्तः (अभिव्यक्त करतात) हे जे क्रियापदाचे द्विवचनी रूप वापरले आहे ते दोषास्पद आहे. कारण अर्थः शब्दो वा (अर्थ किंवा शब्द येथे वा हे विकल्पदर्शक अव्यय वापरले असल्यामुळे व्यनक्ति हे एकवचनी रूप वापरावयास पाहिजे होते (पृ. ९४).२६

---

२३) पहा : व्य. वि. १·२७, पृ. १११; २·१२७, पृ. ४६२.

२४) ध्वन्यालोक १, कारिका ४ व १० येथे सुद्धा व्यंग्य अर्थाचा निर्देश नपुंसकलिंगी शब्दांनी केला आहे.

२५) वस्तुतः ध्वन्यालोक १·११ मधील तम् अर्थम् या शब्दांचा अर्थ 'प्रतीयमानवस्तुरूपं तम् अर्थम्' असाच कारिकाकाराला अभिप्रेत आहे. महिमभट्टाने दाखविलेला (लिंग) प्रक्रमभेद हा दोष अगदी तांत्रिक स्वरूपाचा आहे. शिवाय ध्वन्यालोक १, ५, ६ व १२ मध्ये व्यंग्य अर्थाचा निर्देश पुल्लिंगी शब्दांनी केलेला आहे. विशेषतः १, १२ मध्ये व्यंग्य अर्थाचा निर्देश सो अर्थः या पुल्लिंगी शब्दांनी केलेला असल्याने १, १३ मध्ये त्याचा निर्देश तम् अर्थम् या शब्दांनी करणे अगदी स्वाभाविक आहे.

२६) हा दोष महिमभट्टाच्या पूर्वी होऊन गेलेल्या भट्टनायकाने दाखवून दिला होता, असे लोचन १, पृ. १०४ येथे अभिनवगुप्तांनी म्हटले आहे व वा हा शब्द वापरला असून सुद्धा व्यङ्क्तः हे द्विवचनी रूप वापरण्यातील औचित्य स्पष्ट केले

(६) व्यङ्क्तः हे द्विवचनी रूप वापरले असल्यामुळे वा हे विकल्पार्थक अव्यय वापरणे अयोग्य होय. त्याऐवजी च हे समुच्चयार्थक अव्यय वापरून यत्रार्थः शब्दोऽपि च अशी शब्दयोजना करणे इष्ट झाले असते.२७

(७) व्य. वि. १, पृ. ८०–८६ येथे दाखविल्याप्रमाणे शब्द व अर्थ हे व्यंजक असू शकत नसल्याने ध्वनिलक्षणात व्यङ्क्तः हे जे व्यंजनार्थक वि + अञ्ज् या धातूचे रूप वापरले आहे, ते सदोष आहे. त्याऐवजी प्रकाशयतः हे सामान्यार्थक रूप वापरावयास पाहिजे होते.

(८) ध्वनिलक्षणामध्ये व्यंग्यार्थप्रधान काव्य या अर्थी वापरलेला ध्वनि हा शब्द दोषास्पद आहे. कारण ध्वनि हा शब्द व्यंग्यार्थाशी व व्यंजना-व्यापाराशी संबद्ध आहे. काव्यातील शब्दांच्या वाच्यार्थामुळे प्रतीत होणारा तथाकथित व्यंग्यार्थ हा अनुमेय असतो, तो व्यंग्य कधीच नसतो. म्हणून अनुमेयार्थयुक्त काव्याला ध्वनिकाव्य न म्हणता काव्यानुमिति असे म्हणणेच योग्य होय.

(९) ध्वनिलक्षणामध्ये वापरलेला काव्यविशेष हा शब्द आक्षेपार्ह आहे. कारण रसरूपी भावनात्मक आशय हा काव्याचा आत्मा असतो हे ध्वन्यालोक १, कारिका ५ व ६ मध्ये ध्वनिकाराने मान्य केले आहे, याचा अर्थ असा होतो की जी वाङ्मयरचना रसात्मक असते तीच काव्य या संज्ञेला पात्र होते. रसाचा परिपोष करणे हे कोणत्याही काव्याचे प्रधान कार्य असते. तेव्हा एखाद्या काव्याला काव्यविशेष (वैशिष्टययुक्त काव्य) म्हणणे व त्याच्या

---

आहे. परंतु अभिनवगुप्तांनी केलेल्या या समर्थनाविषयी महिमभट्टाने व्य. वि. १, पृ. ९६ येथे आपली नापसंती प्रगट केली आहे. वस्तुतः वा हे अव्यय ध्वन्यालोक १·१३ येथे च ( = आणि) या अर्थी वापरले आहे असे दिसते व त्या प्रकारचा वापर संस्कृत वाङ्मयात केलेला आढळतो. उदा० पहा : कुमारसंभव २·६०.

२७) क्रमांक ६ हा दोष क्रमांक ५ या दोषाहून निराळा नाही. दोनही दोषांचा आशय एकच आहे.

तुलनेने दुसऱ्या एखाद्या काव्याला केवळ काव्य म्हणणे शक्य नाही. काव्यामध्य वैशिष्टययुक्त काव्य व केवळ काव्य अशी प्रतवारी करता येणार नाही. काव्य या संज्ञेला पात्र असणाऱ्या सर्वच रचना अटळपणे रसयुक्त असणे आवश्यक असल्याने त्या वैशिष्टययुक्तच असतात. रसयुक्त असणे हे सर्वच काव्यांचे वैशिष्टय असते. म्हणून ध्वनिलक्षणामध्ये काव्यविशेष हा शब्द वापरण्यात अवाच्यवचन हा दोष उत्पन्न झाला आहे.२८

(१०) ध्वनिलक्षणामध्ये शेवटी सूरिभिः कथितः ( विद्वानांनी म्हटले आहे) असा जो शब्दप्रयोग केला आहे त्यातील सूरिभिः (विद्वानांनी) हा शब्द अनावश्यक आहे व त्यामुळे अवाच्यवचन हा दोष उत्पन्न झाला आहे. सूरभिः हा शब्द वापरताना विद्वत्तेवर भर न देता कथनक्रियेच्या कोणत्या-तरी कर्त्याचा निर्देश करणे एवढाच उद्देश असेल, तर तो शब्द वापरण्याची मुळीच आवश्यकता नाही. कारण कोणतीही क्रिया कर्त्यामुळेच घडत असल्याने कर्त्याचा निर्देश न करता केवळ क्रियेचा निर्देश केल्याने कर्त्याचे ज्ञान आपो-आप वाचकांना होते. आता सूरभिः हा शब्द जर खास अधिकारयुक्त विद्वान लोक या अर्थी वापरला असेल तरी सुद्धा ध्वनिकाव्याचे इतके 'उत्कृष्ट' लक्षण सांगणारे खास पात्रता असलेलेच असले पाहिजेत, हे वाचकांच्या ध्यानात तावडतोब येत असल्याने सूरिभिः या शब्दाचा वापर निरर्थक ठरतो.

हे सर्व दोष टाळून काव्यानुमितीचे लक्षण महिमभट्टाने पुढीलप्रमाणे केले आहे. (व्य. वि. १, २५, पृ. १११)२९

वाच्यस्तदनुमितो वा यत्रार्थोऽर्थान्तरं प्रकाशयति ।
संबन्धतः कुतश्चित् सा काव्यानुमितिरित्युक्ता ।।

---

२८) पहा : व्य. वि. २, पृ. ४३६–४५२.

२९) महिमभट्टाने प्रथम विमर्शात जसे ध्वनिलक्षणातील दहा दोष दाखवून त्या लक्षणाचे खंडन केले आहे व सदोष ध्वनिलक्षणाऐवजी काव्यानुमितीचे निर्दोष लक्षण सांगितले आहे, तसेच द्वितीय विमर्शामध्ये पृ. ४५६–४६५ येथे ध्वन्यालोकाच्या प्रथम उद्योतातील 'काव्यस्यात्मा ध्वनिः' इत्यादी कारिकेमध्ये अनेक दोष दाखवून त्या कारिकेची निर्दोष रचना करून दाखविली आहे.

वाच्य अर्थ किंवा वाच्यार्थामुळे अनुमानाने ज्ञात होणारा (दुसरा) अर्थ जेथे निराळ्या अर्थाचा बोध, त्या दोहोंमध्ये असलेल्या कोणत्यातरी (साहचर्य) संबंधामुळे करून देतो तेथे काव्यानुमिति असते असे म्हटले जाते.

ध्वनिलक्षणातील दहा दोषांव्यतिरिक्त आणखी एका दोषाचा विचार महिमभट्टाने पृ. ८८–९३ येथे केला आहे. तो दोष म्हणजे अव्याप्ति दोष होय. ध्वनिलक्षणातील अर्थः या शब्दाचे विवरण आनन्दवर्धनाने (ध्वन्यालोक १, पृ. १०४) वाच्यार्थविशेषः (विशिष्ट प्रकारचा वाच्यार्थ) असे केले आहे त्यामुळे केवळ वाच्यार्थाच्या द्वारा ज्या काव्यात वाच्यार्थाहून निराळा (व्यंग्य) अर्थ प्रधानत्वाने अभिव्यक्त होतो, ते काव्य ध्वनिकाव्य होय असे ध्वनिकाव्याचे लक्षण निष्पन्न होते. परंतु काही वेळा काव्यामध्ये वाच्यार्थामुळे एक व्यंग्य अर्थ अभिव्यक्त झाल्यानंतर त्या व्यंग्य अर्थामुळे आणखी दुसरा व्यंग्य अर्थ प्रगट होतो व त्या दुसऱ्या व्यंग्य अर्थामुळे तिसरा व्यंग्य अर्थ प्रतीत होतो. या प्रकारच्या काव्याला काटेकोरपणाने ध्वनिकाव्य म्हणता येणार नाही, हा अव्याप्तिदोष ध्वनिलक्षणामध्ये उत्पन्न होतो. म्हणून महिमभट्टाच्या मते "यत्र वाच्योऽर्थः, तेन अभिव्यक्तो व्यङ्ग्यो अर्थो वा तम् अर्थं व्यनक्ति सः काव्य-विशेषः ध्वनिः" असे ध्वनिकाव्याचे लक्षण ध्वन्यालोकात करावयास पाहिजे होते. वाच्यार्थामुळे एक व्यंग्य अर्थ, त्या व्यंग्य अर्थामुळे दुसरा व्यंग्य अर्थ व त्या दुसऱ्या व्यंग्य अर्थामुळे तिसरा व्यंग्य अर्थ प्रतीत होतो या प्रकारची काही उदाहरणे महिमभट्टाने १, पृ. ९०–९१ येथे दिली आहेत.[३०]

महिमभट्टाच्या मते केवळ व्यंग्य अर्थच अनुमानाने प्रतीत होतो असे नसून तथाकथित लक्ष्य अर्थ सुद्धा अनुमानानेच ज्ञात होतो. 'वाहीको गौः'

---

३०) परंतु महिमभट्टाचा हा युक्तिवाद प्रत्ययकारी वाटत नाही. कारण वाच्यार्थामुळे एकामागुन दुसरा याप्रमाणे अनेक व्यंग्य अर्थ प्रगट होत असले तरी ते सर्व व्यंग्य अर्थ प्रगट होण्याचे खरे व अंतिम कारण वाच्यार्थ (व त्याचा वाचक शब्द) हेच असते. हा तथाकथित अव्याप्तिदोष टाळण्यासाठी महिमभट्टाने केलेल्या काव्यानुमितिलक्षणामध्ये 'वाच्यस्तदनुमितो वा यत्रार्थोऽर्थान्तरं प्रकाशयति' अशी शब्दयोजना केली आहे.

या वाक्यामध्ये वाहीक या मानवी व्यक्तीचा 'गौः' (बैल) या चतुष्पाद पशूशी केलेला अभेद (तादात्म्य) बाधित होतो. आता येथे वाहीक व गो यांच्या अभेदाचे निश्चित विधान तर जाणूनबुजून केले गेले आहे. त्या अभेदाचे समर्थन करण्यासाठी वाहीक ही व्यक्ती काही (म्हणजे निर्बुद्धपणा इत्यादी) बाबतीत बैलाशी एकरूप आहे (म्हणजे बैलासारखी आहे) असा निष्कर्ष अर्थापत्तीचा अवलंब करून काढावा लागतो व हा निष्कर्ष अनुमानरूपच असतो. या निष्कर्षामुळे गौः या शब्दाचा अर्थ बैलाच्या निर्बुद्धपणासारखा निर्बुद्धपणा असणारा असा होतो व मूळ वाक्याच्या वाच्यार्थातील विसंगति दूर होते. असाच प्रकार 'पीनो देवदत्तो दिवा न भुङ्क्ते' या अर्थापत्तीच्या उदाहरणातही होतो. येथे देवदत्ताचे पीनत्व (शरीर जाडजूड असणे) हे दिवसा न जेवण्याशी विसंगत आहे. विसंगति दूर करण्यासाठी 'तो रात्री जेवतो' अशी कल्पना अर्थापत्तीचा अवलंब करून करावी लागते. नैयायिकांच्या मते अर्थापत्ती म्हणजे अनुमानच होय. 'वाहीकः गौः' या उदाहरणाप्रमाणेच 'माणवकः अग्निः', 'बटुः सिंहः', 'गङ्गायां घोषः', 'कुन्ताः प्रविशन्ति' इत्यादी लक्षणेच्या सर्व उदाहरणांमध्ये लक्ष्य अर्थ अनुमान या अर्थ-व्यापारामुळेच ज्ञात होतो, लक्षणानामक शब्दव्यापारामुळे नाही.[३१]

ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनाचा तिसरा महत्त्वाचा भाग म्हणजे ध्वन्यालोकामध्ये ध्वनिकाव्याचे जे अविवक्षितवाच्य व विवक्षितान्यपरवाच्य या नावाचे दोन मुख्य प्रकार व त्यांचे जे उपप्रकार सांगितले आहेत, त्यांचे खंडन होय. अविवक्षितवाच्यध्वनीचे (म्हणजे लक्षणामूलध्वनीचे) अत्यन्ततिरस्कृतवाच्य

---

३१) व्य. वि. १, पृ. ११८ : तस्माद्योऽयं वाहीकादौ गवादिसाधर्म्यावगमः स तत्त्वारोपान्यथानुपपत्तिपरिकल्पितोऽनुमानस्यैव विषयः । न लक्षणाव्यापारस्य, इति स्थितम् ।

गोत्वारोपेण वाहीके तत्साम्यमनुमीयते ।
को ह्यतस्मिन्नतत्तुल्ये तत्त्वं व्यापारयेद् बुधः ॥

पहा : विमर्श ३, पृ. ४७३ येथे केलेले 'सुवर्णपुष्पां पृथिवीम्' इत्यादी श्लोकातील लक्षणेचे व लक्षणामूलध्वनीचे खंडन.

व अर्थान्तरसंक्रमितवाच्य आणि विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचे संलक्ष्यक्रम व असंलक्ष्यक्रम असे पोटभेद ध्वन्यालोकात उदाहरणांसह सांगितले आहेत. अत्यन्ततिरस्कृतवाच्य व अर्थान्तरसंक्रमितवाच्य हे अविवक्षितवाच्यध्वनीचे दोन पोटभेद लक्षणेमध्येच अन्तर्भूत होत असल्याने आणि लक्षणा ही अनुमानामध्ये अन्तर्भूत होत असल्याने, अविवक्षितवाच्यध्वनीच्या या दोन पोटभेदांचा अन्तर्भाव अनुमानामध्येच होतो. विवक्षितान्यपरवाच्यध्वनीच्या संलक्ष्यक्रम या पोटभेदाखाली येणारे वस्तुध्वनि व अलंकारध्वनि हे उपप्रकार व विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या असंलक्ष्यक्रम या पोटभेदाखाली येणारे रसादिध्वनि हे सर्व ध्वनिप्रकार अनुमानामध्येच अन्तर्भूत होतात हे महिमभट्टाने प्रथम विमर्शात व इतरत्र सविस्तरपणे दाखविले आहे.[३२] विवक्षितान्यपरवाच्यध्वनीचा शब्दशक्तिमूलध्वनि या नावाचा जो प्रकार आहे, त्यामध्ये दुसरा अर्थच प्रतीत होत नसल्याने तो दुसरा अर्थ व्यंजनेने प्रतीत होण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही.[३३]

प्रथम विमर्शाच्या शेवटच्या भागात[३४] अविवक्षितवाच्यध्वनि व विवक्षितान्यपरवाच्यध्वनि या दोन संज्ञांमधील दोष तर्ककर्कश पद्धतीने महिमभट्टाने स्पष्ट केले आहेत व असे सिद्ध केले आहे की ध्वनिकाव्याच्या दोन मुख्य प्रकारांच्या या संज्ञा ध्वनिकाव्याचे केवळ सामान्य स्वरूप प्रगट करणाऱ्या आहेत. ध्वनिकाव्याच्या सामान्यरूपाव्यतिरिक्त कोणतीही अवान्तर वैशिष्टये सांगत नसल्याने त्या संज्ञा ध्वनिकाव्याच्या दोन मुख्य प्रकारांच्या संज्ञा या दृष्टीने योग्य नाहीत. आणखी एक अडचण अशी आहे की विवक्षितान्यपरवाच्य या संज्ञेचा नक्की अर्थ काय ते समजणे कठीण आहे.[३५] विवक्षित या शब्दाचा अर्थ जर प्रधान असा असेल, तर प्रधानवाच्य अर्थ अन्यपर म्हणजे अप्रधान कसा असू शकेल ? वाच्य अर्थाचे विवक्षितत्व व अन्यपरत्व यांमध्ये विरोध असल्याने

३२) व्य. वि. पृ. ५७, १७४, १७८, ४७३, ५०५; पृ. ५९–७५, ४७७.

३३) व्य. वि. पृ. १७८, ४७८–४७९.

३४) व्य. वि. पृ. १७१.

३५) व्य. वि. पृ. १७२.

विवक्षितान्यपरवाच्य ही संज्ञा विरोध या दोषाने दूषित आहे. शिवाय विवक्षितान्यपरवाच्य हा ध्वनीचा एक प्रकार असल्याने व ध्वनिकाव्याच्या सामान्यलक्षणामध्ये वाच्यार्थाचे अन्यपरत्व उपसर्जनीकृतस्वार्थौ या विशेषणाने आधीच सांगितलेले असल्याने, अन्यपरत्व या सामान्यलक्षणातील धर्माचा ध्वनिकाव्याच्या एका प्रकाराला दिलेल्या संज्ञेमध्ये पुनर्निर्देश का केला आहे व तो पुनर्निर्देश दुसऱ्या प्रकाराला दिलेल्या संज्ञेमध्ये (म्हणजे अविवक्षितवाच्य या संज्ञेमध्ये) का केला नाही हे समजत नाही. पुनरुक्तीचा दोष पतकरून अन्यपरत्व या धर्माचा निर्देश करावयाचा असेल तर तो दोनही संज्ञांच्या बाबतीत का केला नाही? पुनरुक्तीचा दोष टाळावयाचा असेल तर अन्यपरत्व या धर्माचा निर्देश कोठेही न करणे योग्य झाले असते.

प्रथम विमर्श पृ. १३३–१४१ येथे मीमांसकांच्या अभिधावादाचे व तात्पर्यवादाचे आणि पृ. १४२–१४४ येथे कुन्तकाच्या वक्रोक्तिसिद्धान्ताचे खंडन महिमभट्टाने केले आहे. संपूर्ण वाक्यातून प्रतीत होणारा जो एकमुखी व एकसंध तात्पर्यार्थ, तो अर्थापत्तीच्या (म्हणजे अनुमानाच्या) मुळे प्रतीत होतो. तो प्रतीत होण्यासाठी तात्पर्य या नावाचा खास स्वतंत्र शब्दव्यापार मानण्याची मुळीच आवश्यकता नाही. कुन्तकाने प्रतिपादिलेल्या वक्रोक्तिसिद्धान्तामध्ये वक्रोक्तीचे जे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत ते सर्व ध्वनीचेच (म्हणजे व्यंजनेचेच) प्रकार आहेत व काव्यातील वक्रोक्तीमुळे प्रतीत होणारा वैचित्र्य-पूर्ण अर्थ हा व्यंग्य अर्थच आहे. यावरून असे सिद्ध होते की वक्रोक्तिसिद्धान्त ध्वनिसिद्धान्ताहून निराळा नाही व म्हणून वक्रोक्तिसिद्धान्ताचे निराळे खंडन करण्याची आवश्यकता नाही. ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनाने वक्रोक्तिसिद्धान्ताचे खंडन झाल्यासारखेच आहे.

# ३

# व्यक्तिविवेक

## ग्रंथाशयाचे विवरण – द्वितीय विमर्श

व्यक्तिविवेकाच्या द्वितीय विमर्शामध्ये काव्यातील पाच (किंवा सहा) प्रमुख व व्यापक दोषांचा विचार महिमभट्टाने प्रथम केला असून त्यानंतर ध्वन्यालोकातील प्रथमोद्योतामधील प्रथम कारिकेमध्ये हे सर्व दोष कसे आढळतात हे स्पष्ट करून त्या कारिकेची निर्दोष रचना करून दाखविली आहे.१ काव्यदोषांचे विवेचन करताना ध्वन्यालोक कारिका १.१ मधील दोष दाखविणे एवढाच महिमभट्टाचा उद्देश नसून, काव्यामधील दोष शक्य तितके टाळणे इष्ट असल्याने, त्यांचे स्वरूप स्पष्ट करून वर्तमानकालीन व भविष्यकालीन होतकरू कवींना मार्गदर्शन करणे हाही उद्देश महिमभट्टाच्या मनात होता.२

---

१) पृ. ४५६.
रुय्यक, पृ. १७९ : ध्वनिलक्षणं दूषयित्वा ध्वनिशास्त्रगतं 'काव्यस्यात्मा ध्वनिः' इति ग्रन्थान्तरं दूषयितुं सामान्येन तावत् काव्यगतम् अनौचित्योल्लासरूपं दूषणप्रपञ्चम् उपपादयितुम् आह 'इह खलु' इत्यादिना ।

२) २, १२६ (पृ. ४६२) :
इदमद्यतनानां च भाविनां चानुशासनम् ।
लेशतः कृतमस्माभिः कविवर्मारुरुक्षताम् ॥

काव्यदोषांची विस्तृत चर्चा जरी महिमभट्टाने विमर्श २ मध्ये केली असली, तरी विमर्श १, पृ. १५६ व १५९ येथे काव्यदोषांसंबंधी काही सामान्य विचार प्रगट केले आहेत.३ महिमभट्टाच्या मते काव्यातील औचित्याचा भंग म्हणजेच काव्यदोष. औचित्याचा भंग झाल्याने काव्याच्या रसरूपी आत्म्याला अपाय होतो व त्यामुळेच काव्यातील सर्व प्रकारचे दोष उत्पन्न होतात.४ काव्यगुणांचा ज्याप्रमाणे काव्याचा आत्मा असणाऱ्या रसाशी जिव्हाळयाचा संबंध असतो, त्याचप्रमाणे काव्यदोषांचाही असतो. रस हे काव्याचे प्राणतत्त्व आहे हे आनंदवर्धनाने भरताला अनुसरून प्रतिपादिलेले मत महिमभट्टाला मान्य आहे.५ रसाच्या दृष्टीने औचित्याचा भंग म्हणजेच अनौचित्य. हे अनौचित्य काव्याच्या बहिरंगाला म्हणजे शब्दांना आणि अंतरंगाला म्हणजे अर्थाला

---

३) पृ. १५६ : शब्ददोषाणाम् 'अनौचित्योपगमात्, तस्य च रसभङ्गहेतुत्वात् । यथाहुः – अनौचित्यादृते नान्यद् रसभङ्गस्य कारणम् । प्रसिद्धौचित्यबन्धस्तु रसस्योपनिषत् परा ॥ (ध्वन्यालोक, ३, पृ. ३३०); पृ. १५९ :

ततश्चार्थासामञ्जस्यादनौचित्यं प्रसज्यते ॥ ९० ॥

बहिरङ्गान्तरङ्गत्वभेदात् तद् द्विविधं मतम् ।
तत्र शब्दैकविषयं बहिरङ्गं प्रचक्षते ॥ ९१ ॥

द्वितीयमर्थविषयं तत्त्वाद्यैरेव दर्शितम् ।
तत्स्वरूपमतोऽस्माभिरिह नातिप्रतन्यते ॥ ९२ ॥

पारम्पर्येण साक्षाच्च तदेतत् प्रतिपद्यते ।
कवेरजागरूकस्य रसभङ्गनिमित्तताम् ॥ ९३ ॥

यत्त्वेतच्छब्दविषयं बहुधा परिदृश्यते ।
तस्य प्रक्रमभेदाद्या दोषाः पञ्चैव योनयः ॥ ९४ ॥

तेषां संक्षेपतोऽस्माभिः स्वरूपमभिधास्यते ।
यस्तु प्रपञ्चः पञ्चानां स्वयं तमवधारयेत् ॥ ९५ ॥

४) मम्मट, काव्यप्रकाश,७ : मुख्यार्थहतिर्दोषो रसस्तु मुख्यः । विश्वनाथ, साहित्यदर्पण १, १८ दोषास्तस्यापकर्षकाः ( म्हणजे– काव्यात्मनः रसस्य अपकर्षकाः । ).

५) व्य. वि. १, २६ : काव्यस्यात्मनि संज्ञिनि रसादिरूपे न कस्यचिद् विमतिः ।

ग्रासणारे, असे दोन प्रकारचे असते.६ यांपैकी अर्थाला ग्रासणाऱ्या अनौचित्याचा विचार पूर्वी होऊन गेलेल्या लेखकांनी केलेला असल्यामुळे महिमभट्टाने अर्थविषयक अनौचित्याचा (म्हणजे अर्थविषयक दोषांचा) विचार व्यक्तिविवेकामध्ये केलेला नाही. शब्दविषयक अनौचित्याचा विचार पूर्वाचार्यांनी आपल्या ग्रंथांत केला नव्हता असे नाही. पण शब्दविषयक अनौचित्याचा व त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या दोषांचा विचार महिमभट्टाने त्यांचे पाच (किंवा सहा) गटांमध्ये वर्गीकरण करून जसा केला आहे तसा पूर्वाचार्यांनी केला नव्हता. महिमभट्टाने जरी या पाच (किंवा सहा) बहिरंगदोषांना शब्ददोष म्हटले असले, तरी ते केवळ शब्ददोष नसून शब्दांतून प्रगट होणाऱ्या वाच्यार्थांनाही ग्रासणारे असतात. अन्तरंग दोष (अर्थदोष) काव्याच्या रसरूपी आत्म्याची साक्षात् (तावडतोब) हानी करतात, तर बहिरंगदोष (शब्ददोष) काव्याच्या रसरूपी आत्म्याची परंपरेने (म्हणजे दूरान्वयाने किंवा थोड्या विलंबाने) हानी करतात.७ अर्थविषयक (=अंतरंग) दोषांमध्ये विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यांचे रसपरिपोषाच्या दृष्टीने अयोग्य रीतीने चित्रण केल्याने उत्पन्न होणाऱ्या दोषांचा मुख्यतः अन्तर्भाव होतो. या अर्थदोषांचा (म्हणजे मुख्यतः रसदोषांचा) आपल्या ग्रंथांत विचार केला आहे असे म्हणताना महिमभट्टाच्या दृष्टीसमोर ध्वन्यालोककार आनंदवर्धन व काव्यलंकारकार रुद्रट हे दोन लेखक होते असे वाटते. कारण ध्वन्यालोक ३, पृ. ३१८–३४४ व पृ. ३६१–३८९ (काशी संस्करण, बालप्रियाटीकेसह, १९४०) येथे रसविषयक दोषांचा बऱ्याच विस्ताराने विचार केला आहे. तसेच काव्यलंकार, ११, १२–१४ येथे विरस या रसदोषाचा रुद्रटाने थोडक्यात विचार केला आहे.८

---

६) व्य. वि. पृ. १८२ : एतस्य (काव्यदोषस्य) च विवक्षितरसादिप्रतीतिविघ्नविधायित्वं सामान्यलक्षणम्। अन्तरङ्गबहिरङ्गभावश्च अनयोः (अर्थविषयकशब्दविषयकदोषयोः) साक्षात् पारम्पर्येण च रसभङ्गहेतुत्वात्।

७) पहा : टीप ६.

८) भोजाने सरस्वतीकण्ठाभरण १, ५० येथे विरस या रसदोषाचा विचार रुद्रटाला अनुसरून संक्षेपाने केला आहे. शृङ्गारप्रकाश, प्रकाश १० मध्येही त्याने या

बहिरंगदोषांचे (म्हणजे शब्ददोषांचे) महिमभट्टाने पाच प्रकार सांगितले आहेत, ते असे :- (१) विधेयाविमर्श,[९] (२) प्रक्रमभेद, (३) क्रमभेद, (४) पौनरुक्त्य (= पुनरुक्ति), (५) वाच्यावचन. या पाच दोषांव्यतिरिक्त अवाच्यवचन[१०] या दोषाचाही महिमभट्टाने विस्तारपूर्वक विचार केला आहे. विमर्श २, पृ. ४३६ येथे महिमभट्टाने म्हटले आहे[११] की अवाच्यवचन या दोषाचा अन्तर्भाव वाच्यावचन या दोषामध्ये होऊ शकतो. कारण या दोनही दोषांचे स्वरूप विवक्षित अर्थाचा विपर्यय करणे, म्हणजे इष्ट अर्थाच्या विरुद्ध, इष्ट अर्थाला सोडून किंवा इष्ट अर्थाशी विसंगत बोलणे असे आहे. जे बोलून दाखविणे इष्ट व आवश्यक असते ते बोलून न दाखविणे, किंवा जे बोलून न दाखविणे इष्ट व आवश्यक असते ते बोलून दाखविणे असे अनुक्रमे या दोन दोषांचे स्वरूप असल्यामुळे इष्ट वस्तूचा विपर्यय हे या दोन दोषांचे स्वरूप आहे व म्हणून वाच्यावचन या दोषाची दुसरी बाजू या नात्याने महिमभट्टाने अवाच्यवचन या दोषाचा विचार केला आहे.

महिमभट्टाने चर्चिलेल्या या पाच व्यापक दोषांची बीजे प्राचीन व्याकरणशास्त्रीय ग्रंथात सापडतात असे रुय्यकाने द्वितीय विमर्शावरील टीकेच्या

---

दोषाची चर्चा केली आहे. तसेच रुद्रभट्टानेही शृङ्गारतिलक ३, २०–२२ व ३, ४६ येथे या दोषाचा विचार केला आहे.

९) विधेयाविमर्श या दोषाला मम्मटादि लेखकांनी अविमृष्टविधेयांश असे नाव दिले आहे.

१०) भरताने नाट्यशास्त्र १७, ८८ येथे अर्थान्तर या नावाच्या दोषाचा निर्देश केला असून त्याचे स्वरूप अवर्ण्यवर्णन या शब्दाने १७, ८९ येथे केले आहे. (अवर्ण्यं वर्ण्यते यत्र तदर्थान्तरमिष्यते). महिमभट्टाने याच दोषाला अवाच्यवचन असे नाव दिलेले दिसते. विद्याधराने एकावलीच्या सहाव्या उन्मेषामध्ये पाच काव्यदोषांचे जे विवेचन केले आहे, ते व्यक्तिविवेकातील विवेचनाला अनुसरूनच केले आहे. परंतु त्याने क्रमभेद या दोषाची दखल घेतलेली दिसत नाही.

११) अनेन च वाच्यावचनेन सामर्थ्याद् अवाच्यवचनमपि संगृहीतं वेदितव्यम्। तस्यापीष्टार्थविपर्ययात्मकत्वात्।

प्रारंभी पृ. १८० वर म्हटले आहे. रुय्यक म्हणतो की हे पाच दोष महिमभट्टाने आपल्या स्वैर कल्पनेतून प्रगट केलेले आहेत असे समजून त्यांचे महत्त्व वाचकांनी कमी मानू नये. विधेयाविमर्श हा दोष पाणिनीला सुद्धा ज्ञात होता हे 'षष्ठ्याः आक्रोशे (अलुक्)' (पाणिनि ६, ३, २१) या सूत्रावरून स्पष्ट होते. याचप्रमाणे प्रक्रमभेद, क्रमभेद, पौनरुक्त्य, वाच्यावचन व अवाच्यवचन या दोषांची मुळे कात्यायनाचे वार्तिक व पतञ्जलीचे महाभाष्य या ग्रंथांमध्ये सापडतात. विधेयाविमर्श दोष पाणिनीला माहीत होता हे महिमभट्टाने स्वतःच पृ. २५५ व २७४ येथे मान्य केले आहे. पौनरुक्त्य दोषाच्या विवेचनावरील टीकेमध्ये पृ. ३३३ वर रुय्यकाने म्हटले आहे की पौनरुक्त्य दोषाच्या शब्दपौनरुक्त्य व अर्थपौनरुक्त्य या दोन प्रकारांचा निर्देश अक्षपादाने (= गौतमाने) 'शब्दार्थयोः पुनर्वचनं पुनरुक्तम्, अन्यत्रानुवादात् (न्यायसूत्र ५, २, १४) या सूत्रामध्ये केला आहे.

महिमभट्टाने चर्चिलेला विधेयाविमर्श हा काव्यदोष भरतादि प्राचीन लेखकांपैकी कोणीही निर्देशिलेला नाही. परंतु विधेयाविमर्श हा दोष अनौचित्याचा (किंवा औचित्यभंगाचा) एक प्रकार असल्याने ध्वन्यालोक ३, पृ. ३३० वर निर्देशिलेल्या अनौचित्यामध्ये त्याचा अन्तर्भाव करणे शक्य आहे. सर्वच काव्यदोष अनौचित्यामुळे उत्पन्न होतात हे महिमभट्टानेही मान्य केले आहे.[१२]

**विधेयाविमर्शदोष** (पृ. १८४–२८७)

प्रत्येक वाक्यामध्ये उद्देश्य व विधेय असेल जे दोन भाग असतात, त्यांपैकी विधेय हा भागच मुख्य असतो. उद्देश्य हा भाग आधीच ज्ञात असल्यामुळे त्याला महत्त्व किंवा प्राधान्य नसते. आधीच ज्ञात असलेल्या उद्देश्याच्या बाबतीत पूर्वी अज्ञात अशी काहीतरी नवीन माहिती विधेय या भागात सांगितलेली असते.[१३] म्हणून कोणत्याही वाक्यामध्ये उद्देश्यापेक्षा विधेयाला अधिक

---

१२) पहा : टीप ३.

१३) पहा : काव्यप्रकाश, ५, पृष्ठ २२६ : भूतभव्यसमुच्चारणे भूतं भव्यायोपदिश्यते । येथे भूत म्हणजे आधीच सिद्ध किंवा ज्ञात असलेली वस्तु व भव्य म्हणजे सिद्ध

प्राधान्य असते. वाक्यातील उद्देश्याचा निर्देश हा पाया असतो व त्या पायावर विधेयाची इमारत उभारलेली असते. उद्देश्य व विधेय यांच्या या स्वाभाविक आणि तर्कसंगत क्रमामध्ये जर उलटापालट झाली तर उद्देश्याला प्राधान्य व विधेयाला गौणत्व प्राप्त होते, असे झाले की विधेयाविमर्श हा दोष उत्पन्न होतो.[१४] त्याचप्रमाणे दोन शब्दांचा समास केला असता त्या दोन शब्दांच्या वक्त्याला अभिप्रेत असलेल्या गौणत्वाची व प्राधान्याची काही वेळा उलटापालट होते.[१५] म्हणून दोन किंवा अधिक शब्दांचा समास करताना त्यांच्या अर्थांच्या गौणत्वाची व प्राधान्याची उलटापालट होणार नाही याविषयी अत्यंत दक्षता पाळावी लागते. तशी दक्षता न पाळता समास केल्यास विधेयाविमर्श (म्हणजे विधेयाच्या न्याय्य प्राधान्याचा लोप) हा दोष उत्पन्न होतो. समासांमध्ये हा धोका संभवत असल्यामुळे महिमभट्टाने प्रायः समासशून्य असलेल्या वैदर्भी शैलीची प्रशंसा केली आहे.[१६] बोलणाऱ्या व्यक्तीला इष्ट असलेल्या अर्थांच्या गौणत्वप्रधानत्वांची समासांमध्ये उलटापालट होते ही गोष्ट पाणिनीला सुद्धा मान्य होती व म्हणूनच त्याने शब्दांचे समास करण्याच्या संदर्भात 'समर्थः पदविधिः' असे सूत्र (अष्टाध्यायी २, १, १) रचले आहे. 'ज्या शब्दांचे अर्थ एकमेकांशी संबद्ध आहेत अशा शब्दांचाच समास करावा' एवढाच या सूत्राचा अर्थ नसून, 'ज्या शब्दांचा समास केला असता त्यांच्या अर्थांच्या गौणत्वप्रधानत्वांचा विपर्यास होत नाही अशा शब्दांचाच समास

---

नसलेली, पण साध्य असलेली वस्तू. वाक्यातील उद्देश्य हे सिद्ध असते, तर विधेय साध्य असते. सिद्ध वस्तू ही साध्य वस्तूचे साधन किंवा उपाय असल्याने साध्य वस्तूचे महत्त्व सिद्ध वस्तूपेक्षा एका विशिष्ट दृष्टिकोनातून अधिक असते.

१४) व्य. वि. २·९४, पृ. ४३२ : अनुवाद्यमनुक्त्वैव न विधेयमुदीरयेत् । न ह्यलब्धास्पदं किंचित् कुत्रचित् प्रतितिष्ठति ॥

१५) पहा : एकावली ६·१ व त्यावरील वृत्ति, पृ. १५१–१५२.

१६) व्य. वि. २, १४–१६ : विनोत्कर्षापकर्षाभ्यां स्वदन्तेऽर्था न जातुचित् । · · · तौ विधेयानुवाद्यत्वविवक्षैकनिबन्धनौ । सा समासेऽस्तमायातीत्यसकृत्प्रतिपादितम् ॥ अत एव च वैदर्भी रीतिरेकैव शस्यते । यतः समाससंस्पर्शस्तत्र नैवोपपद्यते ॥

करावा' असाही अर्थ पाणिनीला अभिप्रेत आहे.१७ तेव्हा विधेयाविमर्श या दोषाचा निर्देश जरी प्राचीन लेखकांनी केलेला नसला, तरी पाणिनीला त्या दोषाची जाणीव होती. तसेच आनंदवर्धनाने अनौचित्य (= औचित्यभंग) हे रसहानीचे एकमेव कारण आहे असे जेव्हा म्हटले, तेव्हा अनौचित्याच्या व्यापक क्षेत्रामध्ये त्याने विधेयाविमर्श या दोषाचा अन्तर्भाव केला होता, हे उघड आहे.

विधेयाविमर्श या दोषाचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने 'संरम्भः करिकीट...' इत्यादी श्लोक उद्धृत केला आहे. हा श्लोक कुन्तकाने वक्रोक्तिजीवित १.९ या कारिकेवरील वृत्तीमध्ये शब्द व अर्थ यांच्यामधील कमालीच्या सुसंवादाचे (साहित्याचे, सहकार्याचे) आदर्श उदाहरण म्हणून उद्धृत केला आहे.१८ हा श्लोक उद्धृत करण्यामध्ये कुन्तकाचा उद्देश असाच आहे की त्यामध्ये कोणताही काव्यदोष नाही हे वाचकांच्या ध्यानात यावे. परंतु महिमभट्टाने विस्तृत चर्चा करून असे दाखविले आहे की या श्लोकामध्ये असंरब्धवान्, योऽसौ व अम्बिकाकेसरी या तीन ठिकाणी विधेयाविमर्शदोष आहे. असंरब्धवान् याच्या जागी नोद्युक्तवान् (न व उद्युक्तवान् असे दोन सुटे शब्द) व अम्बिकाकेसरी याच्या जागी गौर्याः हरिः असा समासविरहित शब्दप्रयोग केल्यास असंरब्धवान् व अम्बिकाकेसरी या सामासिक शब्दांमुळे उत्पन्न झालेला विधेयाविमर्श दोष नाहीसा होईल. तसेच योऽसौ येथे केवळ यः (जो) हे संबंधी सर्वनाम वापरल्याने व त्याला अनुरूप असणारे सः हे

---

१७) व्य. वि. २, पृ. २७४ : न चायमर्थः स्वमनीषिकयैव अस्माभिरुपकल्पितः, किं तर्हि आचार्यस्य (पाणिनेः) अपि अभिमत एव । यदयं समासविधौ समर्थग्रहणं कृतवान् । केवलं तदभिप्रायमजानद्भिः व्याख्यातृभिः सापेक्षतादिदोषान्तर-व्यावृत्तिपरतया एव तद् व्याख्यातम् । न पुनरेतद्व्यावृत्तिपरतयापीति तदभि-प्रायमेव अस्माभिः प्रकाशयद्भिः तस्य इह अर्थत्वम् अपि प्रतिपादितम् । न तु अपूर्वं किंचित् । महिमभट्टाचे म्हणणे असे की : समासकरणे घटकपदयोः गौण-प्रधानभावस्य अविपर्यस्तत्वम् अपि समर्थत्वम् इति पाणिनेः अभिप्रेतम् ।

१८) संरम्भः करिकीटमेघशकलोद्देशेन सिंहस्य यः
सर्वस्यैव स जातिमात्रनियतो हेवाकलेशः किल ।
इत्याशाद्विरदक्षयाम्बुदघटाबन्धेऽप्यसंरब्धवान्
योऽसौ कुत्र चमत्कृतेरतिशयं यात्वम्बिकाकेसरी ॥

दर्शक सर्वनाम न वापरल्याने उत्पन्न झालेला विधेयाविमर्श दोष श्लोकाच्या शेवटी सः हे दर्शक सर्वनाम वापरल्यास दूर केला जाईल.१९ असंरब्धवान् या नञ् तत्पुरुष समासात नञ् (= नास्ति) या विधेयाला गौणत्व प्राप्त झाले आहे. असंरब्धवान् या सामासिक पदाचा अर्थ क्षोभाच्या अभावाने युक्त असा होतो. पण कवीला "प्रक्षुब्ध न होणारा किंवा क्षोभ न पावणारा असा अर्थ अभिप्रेत आहे. या अभिप्रेत अर्थामधील 'न' चे प्राधान्य असंरब्धवान् या समासामध्ये नाहीसे होते. परन्तु समास न करता 'न उद्युक्तवान्' असे म्हटले की 'न' चे प्राधान्य अबाधित रहाते. अम्बिकाकेसरी या षष्ठीतत्पुरुष समासात अम्बिका या शब्दाच्या पार्वती या अर्थाला गौणत्व प्राप्त होते अम्बिकाकेसरी याचा अर्थ ' पार्वतीसिंह ' असा होतो, पण कवीला 'पार्वतीचा सिंह' हा अर्थ अभिप्रेत आहे. या अभिप्रेत अर्थामधील पार्वतीचा या स्वतंत्र शब्दाने दाखविलेले पार्वतीचे महत्त्व अम्बिकाकेसरी असा समास केल्याने नाहीसे होते. परंतु समास न करता गौर्याः हरिः (गौरीचा म्हणजे पार्वतीचा सिंह) असे म्हटले की गौरीचे प्राधान्य अबाधित रहाते. 'योऽसौ अम्बिकाकेसरी कुत्र चमत्कृतेः अतिशयं यातु' या वाक्यात केवळ यः (जो) हे संबंधी सर्वनाम वापरले आहे. त्याला अनुरूप असणारे सः (तो) हे दर्शक सर्वनाम न वापरल्याने विधेय कोटीतील सः या दर्शक सर्वनामाचा निर्देश केला गेला नसल्याने एकूण विधेयाच्या प्राधान्याला धक्का पोहोचला आहे. म्हणून येथे वाक्यगत विधेयाविमर्श दोष उत्पन्न झाला आहे. वाक्यगत विधेयाविमर्शदोष वाक्यामध्ये विधेयाचा किंवा विधेयाच्या एका अंशाचा मुळीच निर्देश न केल्याने अथवा उद्देश्याच्या आधी विधेयाचा निर्देश केल्याने उत्पन्न होतो. तर पदगत (= समासगत) विधेयाविमर्श दोष समास केल्याने विधेयाला गौणत्व प्राप्त झाल्यास उत्पन्न होतो.

---

१९) कुन्तकाने उद्धृत केलेल्या श्लोकामधील विविध विधेयाविमर्श दोष दूर करण्यासाठी त्या श्लोकाच्या उत्तरार्धाची फेररचना महिमभट्टाने पृ. २८२ येथे पुढीलप्रमाणे केली आहे :

इत्याशाद्विरदक्षयाम्बुदघटाबन्धेऽपि नोद्युक्तवान् ।
योऽसौ कुत्र चमत्कृतेरतिशयं गौर्या हरिर्यातु सः ॥

या दोनही प्रकारच्या विधेयाविमर्श दोषाची महिमभट्टाने विस्तृत, मूलगामी व व्याकरण आणि मीमांसा या शास्त्रांच्या आधारे चर्चा केली आहे, व आपल्या प्रतिपादनाच्या समर्थनासाठी संस्कृत साहित्यातील अनेक उदाहरणे देऊन विधेयाविमर्शदोष टाळण्यासाठी त्या उदाहरणांतील शब्दयोजनेमध्ये आवश्यक सुधारणा करून दाखविल्या आहेत.

संस्कृत साहित्यशास्त्रावरील ग्रंथांमध्ये महिमभट्टाच्या व्यक्तिविवेका-व्यतिरिक्त हेमचन्द्राच्या काव्यानुशासनात, विश्वनाथाच्या साहित्यदर्पणात व विद्याधराच्या एकावलीत विधेयाविमर्श दोषाची चर्चा केलेली आढळते. हेमचन्द्र व विद्याधर या लेखकांना या दोषाची चर्चा करताना महिमभट्टापासून प्रेरणा मिळाली हे स्पष्ट आहे. हेमचन्द्राने केलेले या दोषाचे विवरण व्यक्तिविवेका-वर संपूर्णपणे आधारलेले आहे. मम्मटाच्या बाबतीत मात्र या प्रकारचे निश्चित विधान करता येत नाही.[२०]

**प्रक्रमभेद दोष** (पृ. २८७–३२३)

प्रक्रमभेद या काव्यदोषाला प्रक्रमभङ्ग किंवा भग्नप्रक्रम असेही म्हणतात. मम्मटाने भग्नप्रक्रम हे नाव वापरले आहे, तर विद्याधराने प्रक्रमभङ्ग हे नाव वापरले आहे.

कोणत्याही वाक्यामध्ये उपक्रम (पूर्वभाग) व उपसंहार (उत्तरभाग) असे दोन भाग असतात. उपक्रमातील एखादा विचार (अर्थ) व उपसंहारातील

---

२०) पहा : वर पृ. ११ व १२, पृ. ११ वरील क्र. २६ ची तळटीप
या विधेयाविमर्शदोषाचा निर्देश महिमभट्टाने पुढे पृ. ४३०–४३२ येथे वाच्या-वचन दोषाच्या संदर्भात केला आहे. (अन्तरश्लोक २·९४–९५ व उद्देश्य-विधेयभावाला काही ठिकाणी रूप्यरूपकभावाचे (किंवा विशेष्यविशेषणभावाचे) स्वरूप प्राप्त झालेले दिसते, असे म्हटले आहे. विधेयाविमर्श दोषाचा अन्तर्भाव वाच्यावचन या दोषामध्ये होऊ शकतो, कारण वाक्यातील विधेयाचा निर्देश ज्या स्थानी व ज्या प्रकारे करणे इष्ट व आवश्यक असते, त्या स्थानी व त्याप्रकारे त्याचा निर्देश न करणे म्हणजे वाच्यावचन दोषच होय.

एखादा विचार (अर्थ) जर एकरूप असतील तर त्या एकरूप विचारांचे वाचक शब्दही एकरूपच असणे वाक्याचा अर्थ चटकन ध्यानात येण्याच्या दृष्टीने इष्ट व अवश्य असते. विचारांमध्ये एकरूपता असूनही शब्दांमध्ये भिन्नरूपता असेल तर वाक्याचा अर्थ ध्यानात येण्यास बिलंब लागतो व प्रक्रमभेद हा दोष उत्पन्न होतो.२१

प्राचीन लेखकांपैकी भामह, दण्डिन् व वामन यांनी अपक्रम या नावाचा जो दोष विवेचिला आहे,२२ त्याहून प्रक्रमभेद या दोषाचे क्षेत्र व्यापक आहे. प्रक्रमभेद दोषाचे अनंत प्रकार आहेत असे म्हणून व त्यांपैकी १४ प्रकारांचा निर्देश करून महिमभट्टाने त्यांच्याविषयी सोदाहरण चर्चा केली आहे. या १४ प्रकारांपैकी क्रमप्रक्रमभेद या एका प्रकाराचाच भामह, दण्डिन् व वामन यांनी अपक्रम या नावाने निर्देश केला आहे. महिमभट्टाच्या पूर्वी होऊन गेलेल्या कोणत्याही लेखकाने प्रक्रमभेद या दोषाची इतकी सांगोपांग व विस्तृत चर्चा केलेली नाही. मम्मट, हेमचन्द्र, विश्वनाथ व विद्याधर यांनी आपल्या ग्रंथांतील काव्यदोष प्रकरणांत भग्नप्रक्रम या दोषाचे केलेले विवेचन व व्यक्तिविवेकातील या दोषाचे विवेचन यांमध्ये पुष्कळ साम्य आहे.

या दोषाची स्थूलमानाने कल्पना येण्यासाठी पुढील तीन उदाहरणे नमुना म्हणून उल्लेखनीय आहेत.

(१) **प्रकृतिप्रक्रमभेद** : उदेति सविता ताम्रो रक्त एवास्तमेति च। संपत्तौ च विपत्तौ च महतामेकरूपता ।। येथे प्रथमार्धातील वाक्याच्या उपक्रमामध्ये ताम्र हा शब्द वापरला आहे व उपसंहारामध्ये रक्त हा शब्द वापरला

---

२१) पहा : व्य. वि. २, पृ. २८७ : प्रक्रमभेदोऽपि अनौचित्यमेव। स हि यथा प्रक्रमम् एकरसप्रवृत्तायाः प्रतिपत्तृप्रतीतेः उत्खात इव परिस्खलनखेददायी रसभङ्गाय पर्यवस्यति। सर्वत्रैव शब्दार्थव्यवहारे विद्वद्भिरपि लौकिकक्रमोऽनुसर्तव्यः। लोकश्च मा भूद् रसास्वादप्रतीतेः परिम्लानता इति यथाप्रक्रममेव एनम् (=शब्दार्थव्यवहारम्) आद्रियते।

२२) भामह, काव्यालंकार ४·२०–२१; दण्डिन्, काव्यादर्श ३·१४४–१४५; वामन, काव्यालंकारसूत्र २·२, २२.

आहे. त्यामुळे प्रकृतिप्रक्रमभेद दोष उत्पन्न झाला आहे. उपक्रमामध्ये रक्त या शब्दाचा वापर केल्यास किंवा उपसंहारामध्ये ताम्र या शब्दाचा उपयोग केल्यास हा दोष नाहीसा होईल.

(२) **विभक्तिप्रक्रमभेद :** कृतवानसि विप्रियं न मे प्रतिकूलं च न ते मया कृतम्। (कुमारसंभव, ४.७). येथे वाक्याच्या उपक्रमात कृतवान् हा प्रथमा विभक्तीतील शब्द वापरला आहे, तर उपसंहारात मया हा तृतीया विभक्तीतील शब्द वापरला आहे. म्हणून हे विभक्तिप्रक्रमभेदाचें उदाहरण आहे. 'नच तेऽहं कृतवत्यसंमतम्' अशी दुसऱ्या चरणात शब्दयोजना केल्यास बिभक्तिप्रक्रमभेद दूर होईल.

(३) **क्रमप्रक्रमभेद :** तव कुसुमशरत्वं शीतरश्मित्वमिन्दोर्द्वयमिदमयथार्थं दृश्यते मद्विधेषु। विसृजति हिमगर्भैरग्निमिन्दुर्मयूखैस्त्वमपि मदनबाणान् वज्रसारीकरोषि॥ (अभिज्ञानशाकुन्तल ३.३). येथे संपूर्ण श्लोकरूपी महावाक्याच्या पूर्वार्धात प्रथम मदनाचा व नंतर चन्द्राचा निर्देश केला आहे. पण उत्तरार्धामध्ये प्रथम चन्द्राचा निर्देश व नंतर मदनाचा निर्देश केला आहे. मदन व चन्द्र यांच्या पूर्वार्धातील क्रमाचा भंग उत्तरार्धात झाल्याने हे क्रमप्रक्रमभेदाचे उदाहरण आहे.

प्रक्रमभेद या दोषाच्या संबंधात असा प्रश्न उत्पन्न होतो की हा दोष टाळावयाचा म्हणजे वाक्याच्या उपक्रम व उपसंहार या भागांत एखाद्या अर्थाचे एकरूपत्व असल्यास शब्दाचेही एकरूपत्व असले पाहिजे. पण या परिस्थितीत शब्दपुनरुक्ति (पौनरुक्त्य) हा दोष उत्पन्न होतो. यावर महिमभट्टाचे उत्तर असे की वाक्यामध्ये उपक्रम व उपसंहार असे दोन भाग नसताना एखाद्या अर्थाचे व शब्दाचे एकरूपत्व असेल तरच पुनरुक्ति हा दोष उत्पन्न होतो. पण वाक्यामध्ये उपक्रम व उपसंहार असे दोन भाग असतील तर त्या दोन भागांमध्ये एखाद्या अर्थाचे व शब्दाचे एकरूपत्व असले तरी पुनरुक्ति हा दोष उत्पन्न होत नाही. उलट त्या परिस्थितीत शब्दाचे व अर्थाचे एकरूपत्व इष्ट व आवश्यक ठरते.२३

---

२३) व्य. वि. २, पृ. २९०; काव्यप्रकाश ७, पृ. ३६७; एकावली ६, पृ. १६८.

**क्रमभेददोष** (पृ. ३२३–३३३)

क्रमभेद या दोषाचे सर्वनामक्रमभेद व अव्ययक्रमभेद असे दोन भाग पाडून महिमभट्टाने त्याचा विचार केला आहे. क्रम म्हणजे सर्वनामे व अव्यये यांच्या बाबतीतले स्थानाचे औचित्य व क्रमभेद म्हणजे या औचित्याचा भंग. सर्वनामाच्या स्थानाचे औचित्य म्हणजे प्रथम नाम वापरून एखाद्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा निर्देश केल्यानंतरच पुनरुक्ति टाळण्यासाठी नामाऐवजी इदम्, अदस्, एतद् व तद् यांपैकी कोणत्यातरी सर्वनामाचा उपयोग करणे. परंतु वाक्यात जर प्रथम केवळ सर्वनाम वापरून एखाद्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा निर्देश केलेला असेल व त्यानंतर काही अंतराने त्या वस्तूचे किंवा व्यक्तीचे वाचक नाम वापरले असेल, तर सर्वनामक्रमभेद हा दोष उत्पन्न होतो.[२४] इव, इति, पुनर्, एवम्, इत्थम्, एव वगैरे अव्ययांचा वाक्यातील ज्या शब्दांशी अर्थदृष्टचा निकट संबंध असतो त्यांच्या नंतर लगेच ती अव्यये वापरणे इष्ट असते. कारण तसे केल्याने ती अव्यये लगेच पूर्वी असलेल्या शब्दांनी दाखविलेल्या वस्तूंच्या वा व्यक्तींच्या ठिकाणी वैशिष्टय उत्पन्न करू शकतात. पण त्या अव्ययांचा त्यांच्याशी अर्थदृष्टचा निकट संबंध नसलेल्या शब्दांनंतर वापर केला तर अव्ययक्रमभेद हा दोष उत्पन्न होतो. अशा ठिकाणी वक्त्याला इष्ट असलेला अर्थ प्रगट होण्यात विघ्न उत्पन्न होते व अर्थाचे नीट ज्ञान होण्यासाठी अयोग्य ठिकाणी वापरलेले अव्यय उचलून योग्य ठिकाणी ठेवावे लागते.[२५]

सर्वनामक्रमभेदाचे उदाहरण–रघुवंश १६.३३ : तीर्थे तदीये गजसेतुबन्धात् प्रतीपगामुत्तरतोऽस्य गङ्गाम्। येथे तद् या सर्वनामापासून साधलेला तदीय

---

२४) व्य. वि. २·३२, पृ. ३२६ : परामृश्यमनुक्त्वैव परामर्शोऽस्य यस्तदा। स दोषः, वक्ष्यमाणार्थसंवित्तावक्षमो हि सः ॥

२५) व्य. वि. २·३३–३६, पृ. ३३१ : उक्तिस्वरूपावच्छेदफलो यत्रेतिरिष्यते। न तत्र तस्मात् प्राक् किंचिद् उक्तेरन्यत् पदं वदेत् ॥ उपाधिभावात् स्वां शक्तिं स पूर्वत्रादधाति हि। न च स्वरूपावच्छेदः पदस्यान्यस्य संमतः ॥ इतिनैवेतरेषाम-प्यव्ययानां गतिः समा। ज्ञेयेत्थमेवमादीनां तज्जातीयार्थयोगिनाम्। यतस्ते चादय इव श्रूयन्ते यदनन्तरम्। तदर्थमेवावच्छिन्द्युरासमञ्जस्यमन्यथा ॥

हा शब्द प्रथम वापरून गङ्गा हे नाम नंतर वापरले आहे. 'गजसेतुबन्धात् प्रतीपगां गङ्गां तदीये तीर्थे उत्तरतः अस्य (कुशस्य)२६ असा क्रम असावयास पाहिजे होता. दर्शक सर्वनाम व संबंधी सर्वनाम यांच्या लगेच पूर्वी किंवा लगेच नंतर नाम वापरण्याचा प्रघात संस्कृत भाषेमध्ये रूढ आहे व तो निर्दोष मानला जातो. परंतु नामाच्या नंतर दुसरा एखादा शब्द वापरून त्यानंतर दर्शक किंवा संबंधी सर्वनाम वापरणे दोषास्पद ठरते. उदा० विक्रमोर्वशीय ४.१ : 'नवजलधरः संनद्धोऽयं न दृप्तनिशाचरः'. 'अयं नवजलधरः संनद्धः' किंवा 'नवजलधरोऽयं संनद्धः' असे म्हणणे योग्य झाले असते.

अव्ययक्रमभेदाचे उदाहरण–कुमारसंभव, ५.७१; द्वयं गतं संप्रति शोचनीयतां समागमप्रार्थनया कपालिनः। कला च सा कान्तिमती कलावतः त्वमस्य लोकस्य च नेत्रकौमुदी ।। येथे चवथ्या चरणामध्ये च हे अव्यय त्वं नंतर न वापरता लोकस्य या शब्दानंतर वापरल्यामुळे अव्ययक्रमभेद दोष उत्पन्न झाला आहे.

संस्कृत भाषेमधील वृत्तबद्ध ललित व शास्त्रीय वाङमयामध्ये हा क्रमभेद दोष प्राचुर्याने आढळतो व तो वृत्ताच्या बन्धनामुळे उत्पन्न झालेला असतो. अशा ठिकाणी टीकाकार क्रमभेद दोषाचे अस्तित्व 'अयं शब्दः भिन्नक्रमः द्रष्टव्यः' यासारखा शेरा मारून मान्य करतात. परंतु ललित वाङमयामध्ये कवीच्या प्रतिभासामर्थ्यामुळे तो झाकला जातो व त्याची जाणीव सहृदय वाचकांना होत नाही,२७ हे महिमभट्टाने पृ. ३१६ येथे प्रक्रमभेददोषाच्या संदर्भात मान्य केले आहे.

---

२६) याचा अर्थ : हत्तींचा बांध तयार केल्यामुळे उलट दिशेने वाहू लागलेल्या गंगेला तिच्या उताराच्या ( म्हणजे सापेक्षतया कमी पाणी असलेल्या ) जागी तो ( कुश ) ओलांडत असताना.

२७) तुलनार्थ पहा : ध्वन्यालोक ३, पृ. ३१६ : अव्युत्पत्तिकृतो दोषः शक्त्या संव्रियते कवेः। यस्त्वशक्तिकृतस्तस्य झटित्येवावभासते॥ विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद, पौनरुक्त्य व वाच्यावचन (आणि अवाच्यवचन) हे सर्वच दोष वृत्तबद्ध वाङ्मयामध्ये पुष्कळ वेळा वृत्ताच्या बंधनामुळे उत्पन्न झालेले असतात. त्यांना टाळणे

क्रमभेद या दोषाला मम्मट व हेमचन्द्र यांनी अक्रम हे नाव दिले आहे, तर त्याच्या काही विशिष्ट प्रकारांचा अन्तर्भाव अस्थानस्थपद या दोषामध्ये केला आहे.

विश्वनाथाने साहित्यदर्पणाच्या सातव्या परिच्छेदात क्रमभेद या दोषाचा निर्देश केलेला नाही. साहित्यदर्पण ७·९ मध्ये त्यानी ज्या दुष्क्रम नामक दोषाचा निर्देश केला आहे, तो महिमभट्टाच्या क्रमभेद दोषाहून थोडा निराळा असला तरी त्याचा अन्तर्भाव क्रमभेद दोषामध्ये करणे शक्य आहे.

**पौनरुक्त्य दोष** (पृ. ३३३–३८७)

भरत, भामह, दण्डिन् व वामन यांनी या दोषाला एकार्थ हे नाव दिले आहे. भोजाने (सरस्वतीकण्ठाभरण १.२२) पुनरुक्तिमत् असे नाव दिले आहे. मम्मटाने व विश्वनाथाने कथितपदत्व हे नाव वाक्यविषयक प्रकाराच्या व पुनरुक्त हे नाव अर्थविषयक प्रकाराच्या बाबतीत वापरले आहे, आणि या दोषाच्या काही विशिष्ट प्रकारांचा अन्तर्भाव अधिकपदत्व या दोषामध्ये केला आहे. हेमचन्द्राने 'उक्त' हे नाव पौनरुक्त्याच्या पदविषयक प्रकाराला व पुनरुक्त हे नाव अर्थविषयक प्रकाराला दिले आहे.

पौनरुक्त्य दोष शब्दपौनरुक्त्य व अर्थपौनरुक्त्य असा दोन प्रकारचा नसून शब्दपौनरुक्त्य व अर्थपौनरुक्त्य मिळून एकच दोष होतो. अर्थाचे पौनरुक्त्य असले की पुष्कळ वेळा शब्दाचे पौनरुक्त्य ओघानेच उत्पन्न होते. परंतु (१) एकच अर्थ (विचार) जर पुनः पुनः प्रगट करावयाचा असेल तर प्रत्येक वेळी एकच शब्द न वापरता निरनिराळे शब्द वापरून तो अर्थ प्रगट करणे हे दोषास्पद ठरत नाही. उलट तसे करणे पौनरुक्त्य दोष टाळण्यासाठी अवश्य असते. (२) एकाच वाक्याच्या उद्देश्य व विधेय या भागांमध्ये एकच अर्थ प्रगट करावयाचा असेल, तर त्या दोनही भागांमध्ये एकच शब्द वापरणे

---

वृत्ताच्या बंधनामुळे अशक्य असते. वृत्ताची बंधने ओलांडण्याच्या असामर्थ्याला अभिनवगुप्तांनी अशक्ति असे म्हटले आहे. 'अशक्तिर्वृत्तपरिपूरणाद्यसामर्थ्यम्' (लोचन, पृ. २८५–२८६).

इष्ट व अवश्य असल्याने पौनरुक्त्य दोष उत्पन्न होत नाही.२८ (३) दोन शब्दांचे नादात्मक बाह्य स्वरूप एकच असून त्यांचे अर्थ निराळे असतील तर अशा शब्दांचा वापर केल्याने पौनरुक्त्य दोष उत्पन्न होत नाही. उदा०

हसति हसति स्वामिन्युच्चै रुदत्यपि रोदिति
द्रविणकणिकाक्रीतं यन्त्रं प्रनृत्यति नृत्यति ।

येथे हसति हसति व (प्र) नृत्यति नृत्यति हे दोन दोन शब्द वरवर पाहता एकरूप असले, तरी त्यांचे अर्थ निराळे आहेत. हसति (स्वामिनि) (सेवकः) हसति, नृत्यति (स्वामिनि) (सेवकः) प्रनृत्यति (मालक मोठ्याने हसला की सेवकाला हसावे लागते व मालक आनंदाने नाचू लागला की सेवकाला नाचावे लागते) असा अर्थ येथे अभिप्रेत आहे. शब्द व अर्थ या दोहोंची पुनरुक्ति असेल तरच पौनरुक्त्य दोष उत्पन्न होतो. याला अपवाद एकच आहे. व तो म्हणजे लाटानुप्रासाचा. या अनुप्रास प्रकारामध्ये शब्द व अर्थ या दोहोंची पुनरुक्ति असूनही पुनरुक्त शब्दांचे तात्पर्य (अंतिम अर्थ) निरनिराळे असल्यामुळे पौनरुक्त्य दोष उत्पन्न होत नाही.२९ उलट ती पुनरुक्ति काव्याचा अलंकार ठरते. वर निर्देशिलेल्या चार परिस्थितींच्या पैकी कोणतीही परिस्थिती नसल्यास शब्द व अर्थ या दोहोंची पुनरुक्ती दोषास्पद होय.

पौनरुक्त्य दोषाच्या अनेक प्रकारांपैकी केवळ काही प्रकारांचा विचार नमुन्यादाखल महिमभट्टाने केला आहे. पुनरुक्त शब्द व पुनरुक्त अर्थ हे केरकचऱ्याप्रमाणे त्याज्य असतात. त्यांची गणती पूर्णपणे करणे शक्य नाही असे महिमभट्टाने म्हटले आहे.३०

---

२८) पहा : वर पृ. ४८-४९

२९) पहा : साहित्यदर्पण १०·७ : शब्दार्थयोः पौनरुक्त्यं भेदे तात्पर्यमात्रतः। लाटानुप्रास इत्युक्तः। उदाहरणः स्मेरराजीवनयने नयने किं निमीलिते। पश्य निर्जितकन्दर्पं कन्दर्पवशगं प्रियम् ॥ तात्पर्य या शब्दाचे विवरण महिमभट्टाने पुढीलप्रमाणे केले आहे (व्य. वि. पृ. ३३५ : स्वार्थमभिदधत एव हि शब्दस्य अर्थान्तरप्रतीतिप्रावण्यं तात्पर्यमुच्यते ।

३०) व्य. वि. २·६९, पृ. ३८७ : पुनरुक्तिप्रकाराणामिति दिङ्मात्रमीरितम्। विवेक्तुं को हि कार्त्स्न्येन शक्नोत्यवकरोत्करम् ॥ पृ. ३७७ वर महिमभट्टाने पुनरुक्त अर्थ

पौनरुक्त्याच्या अनेक प्रकारांचा समावेश महिमभट्टाने पुढील पाच गटांमध्ये केला आहे : (१) प्रकृतिपौनरुक्त्य, (२) प्रत्ययपौनरुक्त्य, (३) प्रकृतिप्रत्ययपौनरुक्त्य, (४) पदपौनरुक्त्य, (५) वाक्यपौनरुक्त्य.३१ प्रकृति (मूळ शब्द) व प्रत्यय हे पदाचेच दोन भाग असल्याने पहिल्या तीन गटांचा पद या चवथ्या गटामध्ये अन्तर्भाव होऊ शकतो व मग पदपौनरुक्त्य आणि वाक्यपौनरुक्त्य हे दोनच प्रकार उरतात व त्यांमध्ये पौनरुक्त्यदोषाच्या सर्व प्रकारांचा समावेश करता येतो. परंतु तपशीलवार शास्त्रीय विवेचनाच्या दृष्टीने महिमभट्टाने पौनरुक्त्याचे पाच मुख्य प्रकार व त्यांचे प्रत्येकी अनेक उपप्रकार सांगून त्या सर्वांची सोदाहरण चर्चा केली आहे.

या पाच व्यापक प्रकारांचे विवेचन करण्यापूर्वी नामाची पुनरुक्ती टाळण्यासाठी सर्वनामाचा उपयोग न करता नामाचाच पुनः वापर केल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या पौनरुक्त्य दोषाचा महिमभट्टाने स्वतंत्रपणे पृ. ३३४-३३५ येथे विचार केला आहे. या दोषांचे स्वरूप नामाची पुनरुक्ती असेच आहे. मग ते नाम एखाद्या समासाचा घटक अवयव म्हणून वापरलेले असो किंवा स्वतंत्रपणे वापरलेले असो. या दोषाचे उदाहरण : 'कमलमनम्भसि कमले च कुवलये तानि कनकलतिकायाम् ।' येथे कमले या सप्तम्यन्त पदाऐवजी तस्मिन् हे सर्वनाम वापरणे योग्य झाले असते. याच दोषाचा पृ. ३८७ वर वाच्यावचन दोषामध्ये, व पृ. ४४६ वर अवाच्यवचन या दोषामध्ये अन्तर्भाव करण्यात आला आहे.

पौनरुक्त्य दोषाच्या पाच प्रकारांची प्रत्येकी एक याप्रमाणे उदाहरणे पुढे दिली आहेत.

---

व पुनरुक्त शब्द हे अवकरप्राय म्हणजे केरकचऱ्याप्रमाणे असून केवळ वृत्तपूरणासाठी त्यांचा उपयोग होतो, वाक्यार्थाच्या दृष्टीने ते निरुपयोगी असतात असे म्हटले आहे.

३१) व्य. वि. २, पृ. ३४१; २-४९, पृ. २८१ : प्रकृतिप्रत्ययार्थोऽस्य पदवाक्यार्थ एव च । विषयो बहुधा ज्ञेयः स क्रमेणोपदिश्यते ॥

(१) **प्रकृतिपौनरुक्त्य** : 'अश्वीयसंहतिभिरुद्धतमुद्धराभिर्भूरेणुजालमखिलं दिवमाततान।' (बेफाम घोडदळांनी वर उडविलेल्या अमाप धुळीने संपूर्ण आकाश व्यापले). येथे अश्व या शब्दाला समूह या अर्थी ईय हा तद्धित प्रत्यय लावून अश्वीय हा शब्द तयार करण्यात आला आहे. अश्वीय म्हणजे घोड्यांचा समूह. नंतर अश्वीय हीच संहति (म्हणजे समुदाय) या अर्थी अश्वीयसंहति हा कर्मधारय समास केला आहे. अश्वीयसंहति या सामासिक शब्दामध्ये आधीच अश्वसमूहवाचक असलेल्या अश्वीय या शब्दाची संहति या समूहवाचक शब्दामुळे पुनरुक्ती झाली आहे. अश्वसंहतिभिः किंवा अश्वीयैः असे म्हटल्यास प्रकृतिपौनरुक्त्य दोष दूर होईल.

परंतु अश्वीय या शब्दातील ईय हा प्रत्यय समूहवाचकच आहे असे मानण्याचे कारण नाही. तो प्रत्यक्ष संबंधसामान्यवाचक आहे असे मानणे शक्य आहे व तसे मानल्यास 'अश्वानाम् इयम् अश्वीया' (म्हणजे अश्वसंबद्ध) हा अर्थ दाखविणाऱ्या अश्वीय या शब्दाचा संहति या शब्दाशी कर्मधारय समास झाला आहे असे म्हणणे शक्य आहे व मग प्रकृतिपौनरुक्त्य दोष उत्पन्न होणार नाही. फार तर ईय हा तद्धित प्रत्यय निरर्थक आहे असे म्हणता येईल.३२ कारण अश्वसंहति असे म्हणून जो अर्थ प्रगट झाला असता, तोच अर्थ अश्वीयसंहति या शब्दाने प्रगट होतो. अश्वसंहति हा शब्द वापरण्यात लाघव (सुटसुटीतपणा, सोपेपणा) हा गुण आहे, तर अश्वीयसंहति हा शब्द वापरण्यात गौरव (अवजडपणा, बोजडपणा) हा दोष आहे. अश्वीयसंहति हे प्रकृतिपौनरुक्त्याचे उदाहरण मानण्यापेक्षा पृ. ३३४ वरील 'जक्षुर्बिसान् धृतविकासिबिसप्रसूनाः' (शिशुपालवध, ५·२८) हे वाक्य किंवा पृ. ३८७ वरील 'कमलमनम्भसि कमले च कुवलये' हे वाक्य प्रकृतिपौनरुक्त्याचे उदाहरण मानणे उचित होईल.

(२) **प्रत्ययपौनरुक्त्य** : मेघदूत १·११ येथे 'बिसकिसलयच्छेदपाथेयवन्तः (राजहंसाः)' असा शब्दप्रयोग केलेला आहे. त्यामध्ये बिसकिसलयच्छेदपाथेय

---

३२) व्य. वि. २·५२, पृ. ३८९ : यस्मिन् यत्तद्धितोत्पत्तिरर्थः, तेनैव जातुचित्। न तदन्तः समस्येत तद्धितव्यर्थताभयात्॥

हा कर्मधारय समास (बिसकिसलयच्छेदाः एव पाथेयम्) असून त्यानंतर वत् हा तद्धितप्रत्यय जोडला आहे. परंतु बिसकिसलयच्छेदपाथेयाः असा बहुव्रीहि समास (बिसकिसलयाः पाथेयं येषां ते) केल्यास जो अर्थ प्रगट झाला असता, त्याची पुनरुक्ति वत् हा तद्धित प्रत्यय कर्मधारय समासाला जोडल्याने झाली आहे. बहुव्रीहि समास करण्यात प्रयत्नलाघव हा गुण आहे, तर कर्मधारय समास मानून त्याला वत् हा तद्धित प्रत्यय लावून बहुव्रीहि समासाचाच अर्थ प्रगट करण्यात प्रयत्नगौरव हा दोष आहे.३३

(३) **प्रकृतिप्रत्ययपौनरुक्त्य** : शिशुपालवध ५.१४ येथे "छायामपास्य महतीमपि वर्तमानामागामिनीं जगृहिरे जनतास्तरूणाम्।" येथे जन या शब्दाच्या मनुष्यसमूह या अर्थाची पुनरुक्ती जनता या जनसमूहवाचक शब्दामुळे झाली असल्याने प्रकृतिपौनरुक्त्य दोष व जनताः यामधील प्रथमा बहुवचनाच्या अस् या प्रत्ययामुळे समूह या अर्थाची पुनरुक्ती झाली असल्यामुळे प्रत्यय पौनरुक्त्य दोष उत्पन्न झाला आहे. 'जनस्तरूणां छायां जग्राह' असे म्हणावयास पाहिजे होते.

परंतु 'ग्रामजनबन्धुसहायेभ्यस्तल्' या सूत्राने (अष्टाध्यायी, ४.३.७) जन या शब्दाच्या बाबतीत समूह या अर्थी 'ता' प्रत्यय लावावा असे सांगताना जन या शब्दाचा 'मनुष्यसमूह' हा अर्थ पाणिनीला अभिप्रेत नसून केवळ 'मनुष्य' हा अर्थ त्याला अभिप्रेत असला पाहिजे असे वाटते. 'अयं जनः' (हा मनुष्य किंवा मी) यासारख्या प्रयोगांमध्ये जन या शब्दाचा जनसमूह असा अर्थ नसून मनुष्य हा अर्थ आहे. तेव्हा प्रस्तुत श्लोकार्धात जनता या शब्दाच्या (मनुष्य-) समूह या अर्थाची बहुवचनी अस् या प्रत्ययामुळे पुनरुक्ती झालेली असल्याने हे प्रत्ययपौनरुक्त्याचे उदाहरण होऊ शकेल, एकाच वेळी प्रकृति व प्रत्यय या दोहोंच्या पौनरुक्त्याचे नाही. त्यासाठी दुसरे योग्य उदाहरण शोधावे लागेल.

---

३३) व्य. वि. पृ. ३४२ : यदाहु : कर्मधारयमत्वर्थीयाभ्यां बहुव्रीहिः लघुत्वात् प्रयत्नस्य। २.५१, पृ. ३८२ : विहितस्य बहुव्रीहेः, कर्मधारयशङ्कया। शब्दस्य मत्वर्थीयादेर्व्यक्तैव पुनरुक्तता ॥

(४) **पदपौनरुक्त्य** : या दोषाचे महिमभट्टाने बरेच उपप्रकार सांगून व त्यांची सुमारे तीस उदाहरणे देऊन त्याचे विवेचन केले आहे. या विवेचनामध्ये त्याने अनेक शास्त्रीय वादांना स्पर्श केला आहे.[३४] पदपौनरुक्त्याच्या अनेक उदाहरणांपैकी नमुन्यादाखल पुढील दोन उदाहरणे लक्षणीय आहेत.

(अ) 'दलत्कन्दलभाग्भूमिः' (पृ. ३४४). येथे दलत्कन्दला असा बहुव्रीहि समास न वापरता, दलत्कन्दल हा कर्मधारय समास मानून, त्यानंतर भाग् ( = धारण करणारी, युक्त, सहित) या कृदन्त प्रथमान्त पदाचा वापर केल्याने पदपौनरुक्त्य दोष उत्पन्न झाला आहे. हे उदाहरण काही प्रमाणात 'बिसकिसलयच्छेदपाथेयवन्तः' या प्रत्ययपौनरुक्त्याच्या उदाहरणासारखेच आहे. दोहोंमध्ये भेद एवढाच की येथे भाग् या प्रथमान्त पदामुळे पौनरुक्त्य झाले आहे, तर तेथे वत् या तद्धितप्रत्ययामुळे पौनरुक्त्य झाले आहे.

(आ) दण्डीने काव्यादर्श २.४३ येथे वाक्यार्थोपमेचे एकेवपदा व अनेकेवपदा असे दोन प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकी पहिला प्रकार (काव्यादर्श, २.४४) महिमभट्टाला मान्य आहे. पण दुसरा प्रकार (काव्यादर्श, २.४५) त्याने पदपौनरुक्त्यदोषामुळे दोषास्पद ठरविला आहे.

> दिने दिने सा परिवर्धमाना लब्धोदया चान्द्रमसीव लेखा ।
> पुपोष लावण्यमयान् विशेषान्, ज्योत्स्नान्तराणीव कलान्तराणि ।।

(कुमारसंभव, १.२५). हा श्लोक पदपौनरुक्त्याचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने उद्धृत केला आहे. यासारख्या उदाहरणांमध्ये इव या औपम्यवाचक पदाचा एकदाच वापर केल्याने उपमालंकार सिद्ध होत असताना ते पद अनेकदा वापरल्यामुळे महिमभट्टाच्या मते पदपौनरुक्त्यदोष उत्पन्न झाला आहे.

(५) **वाक्यपौनरुक्त्य** : एखाद्या श्लोकामध्ये प्रथम एका वाक्यात एक आशय अन्वयपद्धतीने (म्हणजे भावमुखाने) किंवा व्यतिरेकपद्धतीने (म्हणजे अभावमुखाने) प्रगट केल्यानंतर तोच आशय दुसऱ्या वाक्यात अनुक्रमे

---

३४) पहा : टीप ३१, पृ. ५४–५५.

व्यतिरेकपद्धतीने किंवा अन्वयपद्धतीने प्रगट केलेला असेल तर प्रथम वाक्यातील आशयाची द्वितीयवाक्यात पुनरुक्ती होऊन पौनरुक्त्य दोष उत्पन्न होतो. कारण त्या दोन वाक्यांची वरवर दिसणारी रूपे भिन्न असली तरी त्यांचा आशय एकच असतो. या दोषाचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने किरातार्जुनीय २.३० हा श्लोक उद्धृत केला आहे.

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।
वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥

(अविचाराने वागू नये कारण अविचार आपत्तींचे कारण आहे. विचारपूर्वक वागणाऱ्या मनुष्याकडे गुणावर लुब्ध होणारी संपत्ती आपण होऊन धाव घेते). येथे प्रथमार्धात जो आशय व्यतिरेकपद्धतीने प्रगट केला आहे, तोच द्वितीयार्धामध्ये अन्वयपद्धतीने प्रगट केला आहे.

पौनरुक्त्य दोषाच्या पाच प्रकारांपैकी पहिले चार प्रकार प्रायः कवीचे हात वृत्तांच्या नियमांनी बांधले गेल्यामुळे उत्पन्न होतात हे सहज ध्यानात येण्यासारखे आहे. हाच न्याय विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद व वाच्यावचन (आणि अवाच्यवचन) या दोषांच्या बाबतीत लागू पडतो.३५

**वाच्यावचनदोष** (पृ० ३८७–४३६)

जो आशय वाच्य असतो म्हणजे विशिष्ट प्रकाराने बोलून दाखविणे इष्ट असते, तो अर्थ त्या प्रकाराने बोलून न दाखविणे हे वाच्यावचन दोषाचे स्वरूप आहे.३६ आता जेथे इष्ट व आवश्यक विचार बोलून दाखविलेला नसतो तेथे उलट अनिष्ट व अनावश्यक विचार बोलून दाखविलेला असल्याने अवाच्य-वचन हा दोष सुद्धा अटळपणे असतो. म्हणून वाच्यावचन दोषात अवाच्यवचन दोषाचा अन्तर्भाव होतो.३७ वाच्यावचन व अवाच्यवचन हे दोन स्वतंत्र दोष

---

३५) पहा : टीप २७, पृ. ५२–५३.

३६) पहा : विद्याधर, एकावली ६.५ : यद् वाच्यस्यावचनं वाच्यावचनं तदुच्यते चतुरैः ।

नाहीत, तर ते एकाच नाण्याच्या दोन बाजूंसारखे असून एकमेकांना पूरक आहेत. वाच्यावचन दोषामध्ये वाच्य (म्हणजे वक्त्याला इष्ट) अर्थ बोलून दाखविण्याच्या वक्त्याच्या इच्छेविरुद्ध व्यवहार असतो, तर अवाच्यवचन दोषामध्ये अवाच्य अर्थ बोलून दाखविण्याच्या वक्त्याच्या इच्छेविरुद्ध व्यवहार असतो. म्हणजे या दोन दोषांमध्ये अनुक्रमे इष्टार्थ–विवक्षा व अनिष्टार्थ–अविवक्षा यांच्या विरुद्ध व्यवहार असतो.३८ म्हणूनच महिमभट्टाने अवाच्यवचन या दोषाचे विवेचन पृ. ४३६–४५६ येथे स्वतंत्रपणे केले आहे.

वाच्यावचन दोषाचे ९ प्रकार महिमभट्टाने उदाहरणांसह सांगून त्यांचे विवेचन केले आहे.

(१) प्रक्रमभेद हा दोष टाळण्यासाठी ज्या प्रकारची शब्दयोजना इष्ट व आवश्यक असते त्या प्रकारची शब्दयोजना न करणे. उदा० विक्रमोर्वशीय ४.१ : नवजलधरः ...... कनकनिकषस्निग्धा विद्युत्, प्रिया न ममोर्वशी ।। येथे पहिल्या तीन ओळींमध्ये इदम् या दर्शक सर्वनामाची अयम्, इदम् व अयम् ही रूपे ज्याप्रमाणे वापरली आहेत त्याचप्रमाणे चवथ्या ओळीत इयम् हे रूप वापरणे इष्ट असताना ते वापरले नाही व विद्युत् हा शब्द दर्शकसर्वनामविरहित वापरला म्हणून वाच्यावचन दोष उत्पन्न झाला आहे.

(२) वाक्यामध्ये प्रथम नाम वापरल्यानंतर त्याची पुनरुक्ती टाळण्यासाठी सर्वनाम वापरणे इष्ट असताना ते न वापरणे व पुनः नामच वापरणे. उदा० 'कमलमनम्भसि कमले च कुवलये तानि कनकलतिकायाम् ।' येथे कमले हे सप्तम्यन्त नाम न वापरता तस्मिन् हे सर्वनाम वापरणे योग्य झाले असते. परंतु तसे केले नाही (व कमले असे म्हटले) म्हणून वाच्यावचन दोष.३९

---

३७) व्य. वि. पृ. ४३६ : अनेन च वाच्यावचनेन सामर्थ्याद् अवाच्यवचनमपि संगृहीतं वेदितव्यम् । तस्यापि इष्टार्थविपर्ययात्मकत्वात् ।

३८, ३९) वाच्यावचन व अवाच्यवचन या दोन दोषांचे स्वरूप अतिशय व्यापक व सर्वसमावेशक आहे. विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद व पौनरुक्त्य या चारही दोषांचा अन्तर्भाव वाच्यावचन या दोषामध्ये होऊ शकतो. कारण या चारही

(३) एखादा शब्द विशेष्य व विशेषण म्हणून दोनदा वापरणे इष्ट असताना तो एकदाच वापरणे. उदा० कुमारसंभव, ५.७१ : 'द्वयं गतं संप्रति शोचनीयतां समागमप्रार्थनया कपालिनः।' येथे कपालिनः हा एकच शब्द शंकर (विशेष) व कवट्यांची माळ धारण कारणारा (विशेषण) या दोनही अर्थी एकदाच वापरला आहे. 'द्वयं गतं संप्रति तस्य शोच्यतां समागमप्रार्थनया कपालिनः।' असे म्हणणे इष्ट झाले असते. कारण तस्य या सर्वनामाने शंकर या विशेष्याचा स्वतंत्रपणे निर्देश होऊन कपालिनः या शब्दाने 'कवट्यांची माळ धारण करणारा' हे शंकराचे वैशिष्ट्य उठावदारपणे प्रगट झाले असते. कपालिनः या एकाच शब्दाचा वापर विशेष्य व विशेषण या दोनही अर्थी केल्याने वाच्यावचन दोष उत्पन्न झाला आहे.

(४) एका अलंकाराच्या न्याय्य क्षेत्रावर दुसऱ्या अलंकाराने आक्रमण न करणे इष्ट असताना दुसऱ्या अलंकाराने पहिल्या अलंकाराच्या क्षेत्रावर आक्रमण करणे. जसे समासोक्ति हा अलंकार साधण्याचा कवीचा उद्देश असताना व त्यादृष्टीने शब्दयोजना केल्यानंतर उपमेने, रूपकाने किंवा उत्प्रेक्षेने समासोक्तीच्या क्षेत्रावर आक्रमण करणे, किंवा रूपक हा अलंकार कवीला इष्ट असताना उपमेने रूपकाच्या क्षेत्रावर आक्रमण करणे. उदाहरणार्थ कुमारसंभव, ८.६३ : अङ्गुलीभिरिव केशसंचयं संनिगृह्य तिमिरं मरीचिभिः। कुड्मलीकृतसरोजलोचनं चुम्बतीव रजनीमुखं शशी॥ येथे चतुर्थ चरणातील रजनीमुखं शशी (चुम्बति) या शब्दांवरून स्पष्टपणे असे दिसते की समासोक्ती अलंकार साधणे हा कवीचा उद्देश आहे. परंतु समासोक्तीच्या न्याय्य क्षेत्रावर प्रथमार्धातील 'मरीचिभिः अङ्गुलीभिः इव' या उपमेने व चतुर्थ चरणातील 'चुम्बतीव'

---

दोषांमध्ये जो आशय ज्या प्रकारे प्रगट करणे इष्ट व आवश्यक असते (वाच्य), तो आशय त्या प्रकारे प्रगट केलेला नसतो (अवचन). एवढेच नव्हे तर या चार दोषांमध्ये जो आशय ज्या प्रकारे प्रगट करणे इष्ट नसते (अवाच्य), तो आशय त्या प्रकारे प्रगट केलेला असतो (वचन). इतर साहित्यशास्त्रकारांनी ज्या काव्यदोषांची चर्चा आपल्या ग्रंथांमध्ये केली आहे, त्या सर्वांचा अन्तर्भाव वाच्यावचन व अवाच्यवचन या दोन दोषांमध्ये होतो.

या उत्प्रेक्षेने आक्रमण केले आहे.[४०] प्रथमचरणातील 'अङ्गुलीभिरिव केश-संचयम्' हे शब्द गाळल्यास (म्हणजे संपूर्ण प्रथमचरण गाळल्यास) व चतुर्थ चरणामध्ये 'एष चुम्बति निशामुखं शशी' अशी शब्दयोजना केल्यास उपमा व उत्प्रेक्षा यांनी समासोक्तीवर केलेले आक्रमण दूर होऊन समासोक्ती अलंकाराचे क्षेत्र आक्रमणरहित झाल्याने वाच्यावचन दोष नाहीसा होईल. समासोक्तीच्या क्षेत्रावर इतर अलंकारांनी आक्रमण करणे दोषास्पद आहे असे म्हणण्यात महिमभट्टाचा हा अभिप्राय आहे की समासोक्तीपेक्षा रूपक, उपमा व उत्प्रेक्षा या अलंकारांमध्ये प्रयत्नगौरव हा दोष आहे, तर समासोक्तीमध्ये त्या तीन अलंकारांपेक्षा प्रयत्नलाघव हा गुण आहे. तसेच रूपकापेक्षा उपमेमध्ये प्रयत्नगौरव हा दोष आहे, तर रूपकामध्ये उपमेपेक्षा प्रयत्नलाघव हा गुण आहे. ज्या अलंकारांमध्ये प्रयत्नलाघव हा गुण असतो ते अलंकार प्रयत्नगौरव हा दोष असलेल्या अलंकारांपेक्षा अधिक स्वीकार्य व इष्ट ठरतात. म्हणून प्रयत्न-लाघव असलेल्या अलंकाराच्या क्षेत्रावर प्रयत्नगौरवयुक्त अलंकाराने आक्रमण केल्यास वाच्यावचन दोष उत्पन्न होतो. अशी महिमभट्टाची विचारसरणी आहे. हा लाघवगौरवाचा मुद्दा महिमभट्टाने २.७३, पृ. ३९५ येथे उपस्थित केला आहे व तोच मुद्दा ३५२ वर पौनरुक्त दोषाच्या पदपौनरुक्त्य या प्रकाराची चर्चा

---

४०) एका अलंकाराच्या क्षेत्रावर दुसऱ्या अलंकाराने आक्रमण म्हणजे वाच्यावचन दोष होय, असे जे महिमभट्टाने म्हटले आहे, त्या बाबतीत असेही म्हणणे शक्य आहे की अशा ठिकाणी एका अलंकाराचा आरंभ केला असताना दुसऱ्या अलंकाराला वाव देणे हा कवीच्या इच्छेचा प्रश्न आहे. रघुवंश १४·५४ व कुमारसंभव ३·२५ येथेसुद्धा समासोक्ती या अलंकाराने आरंभ करून उपमा-लंकाराने शेवट केला आहे. त्यामध्ये दोषास्पद काहीच नसून, तो कविप्रतिभेच्या स्वैर विलासाचा आविष्कार आहे असेच म्हटले पाहिजे. एकदेशविवर्ति उपमा व एकदेशविवर्ति रूपक या अलंकारांप्रमाणे प्रस्तुत स्थळी एकदेशविवर्ति समासोक्ती आहे असे म्हणता येईल. ध्वन्यालोक २·१८ येथे अलंकारांच्या बाबतीत कवीला योग्य वाटेल त्या वेळी तो हाती घेतलेल्या अलंकाराचा त्याग करून दुसऱ्या एखाद्या अलंकाराला आरंभ करू शकतो (काले च ग्रहणत्यागौ) असे म्हटले आहे. तोच न्याय प्रस्तुत ठिकाणी लागू पडतो असे वाटते.

करताना त्याच्या मनात असावा असे वाटते. परंतु काव्याच्या क्षेत्रात लाघव-गौरवांच्या दृष्टिकोनाला महत्त्व देणे योग्य नाही. महिमभट्टाने उपस्थित केलेल्या या दृष्टिकोनाचे रुय्यकाने आपल्या टीकेमध्ये (पृ. ३५२-३५३) परखडपणे खंडन केले आहे. त्याचा आशय असा की काव्य म्हणजे काही एखाद्या शास्त्रावरील सूत्रग्रंथ नव्हे, की ज्यामध्ये लाघव साधण्यासाठी धडपड करणे इष्ट व आवश्यक असते. उलट काव्यामध्ये विच्छित्तिवैचित्र्याला म्हणजे उक्तिवैचित्र्याला अतिशय महत्त्व असते व उक्तिवैचित्र्य प्रयत्नगौरवाबाचून उत्पन्न होणे प्रायः अशक्यच असते. पाणिनीने सुद्धा अष्टाध्यायीमध्ये काही सूत्रांत लाघवाकडे दुर्लक्ष करून गौरवाचा अवलंब केला आहे. उदा० विकल्पाचे विधान करताना पाणिनीने अनेकदा वा हा एकाक्षरी शब्द न वापरता विभाषा व अन्यतरस्याम् हे त्र्यक्षरी व पंचाक्षरी शब्द वापरले आहेत. काव्यामध्ये जर सर्वत्र लाघवाचा अवलंब करावयाचा असेल, तर कोणताही अलंकार वापरणे शक्य होणार नाही. कारण सर्व अलंकार उक्तिवैचित्र्यावर किंवा वक्रोक्तीवर आधारित असतात व त्यामुळे त्यात शब्दगौरव व अर्थगौरव अटळ असतात.

श्लेष हा अलंकार कवीला इष्ट असताना त्याच्या न्याय्य क्षेत्रावर उपमेने किंवा रूपकाने अतिक्रमण करणे हा सुद्धा वाच्यावचन दोष होय. उदा० बाणभट्टाच्या हर्षचरितातील पुढील वाक्य४१ : 'भैरवाचार्यस्तु दूरादेव दृष्ट्वा राजानं शशिनमिव जलनिधिः उच्चचाल ।' येथे राजानम् हा शब्द श्लेषाने शशिनम् हा अर्थ प्रगट करण्यास पूर्णपणे समर्थ असताना शशिनम् इव या उपमेने श्लेषाच्या क्षेत्रावर अतिक्रमण केले आहे. "भैरवाचार्यस्तु दूरादेव दृष्ट्वा राजानं जलनिधिरिव उच्चचाल" अशी शब्दयोजना केल्यास श्लेषा-वरील उपमेचे आक्रमण दूर झाल्यामुळे व जलनिधिरिव ही उपमा श्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञान होण्यास उपयोगी पडत असल्यामुळे श्लेषाचा वापर निर्दोष ठरतो. श्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञान होण्यास उपयुक्त असणारी जलनिधिरिव ही उपमा न वापरल्यामुळे वाच्यावचन दोष उत्पन्न झाला आहे व श्लेषावर

४१) उच्छ्वास २, पृ. १०५, निर्णयसागर संस्करण, १९३७.

अतिक्रमण करणारी शशिनम् इव ही उपमा वापरल्यामुळे अवाच्यवचन दोष उत्पन्न झाला आहे. कोणताही अलंकार दुसऱ्या अलंकारामुळे आक्रमण न झालेल्या स्थितीत प्रगट करणे इष्ट असताना दुसऱ्या अलंकारामुळे आक्रमण झालेल्या अवस्थेत प्रगट करणे म्हणजे वाच्यावचन दोषच होय. हाच न्याय समासोक्ती व रूपक या अलंकारांप्रमाणे श्लेष या अलंकाराच्या बाबतीतही लागू पडतो. श्लेषाच्या बाबतीत त्याच्या अस्तित्वाचे ज्ञापक वाक्यात समाविष्ट करणे इष्ट असताना ते समाविष्ट न केल्याने वाच्यावचन दोष उत्पन्न होतो. या दृष्टीने पाहता 'भैरवाचार्यस्तु दूरादेव' इत्यादी वाक्यात श्लेषावर उपमेने आक्रमण करणे व श्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञापक समाविष्ट केलेले नसणे या दोन प्रकारांनी वाच्यावचन दोष उत्पन्न झाला आहे.

पृ. ३९९–४२६ येथे महिमभट्टाने श्लेष या अलंकारासंबंधी व त्याच्या योग्य वापरासंबंधी चर्चा केली आहे.[४२] श्लेष अलंकार हा शब्दश्लेष व अर्थश्लेष असा दोन प्रकारचा असतो. महिमभट्टाच्या पूर्वी भामहाने (काव्यालंकार, ३·१७), रुद्रटाने (काव्यालंकार, ४·४ व १०) आणि उद्भटाने (काव्यालंकारसारसंग्रह, ४·९–१०) श्लेष अलंकाराचा विचार करताना शब्दश्लेष व अर्थश्लेष या दोन श्लेषप्रकारांचा निर्देश करून त्यांचे स्वरूप स्पष्ट केले आहे. महिमभट्टाच्या मते शब्दश्लेषामध्ये दोन वस्तूंमधील सादृश्य केवळ नादात्मक शब्दांमुळे (शब्दमात्रेण, ३·८१, पृ. ३९९) निष्पन्न झालेले असते. त्या दोन वस्तूंमध्ये वस्तुतः सादृश्य नसते. जेथे एक शब्द किंवा शब्दसमूह दोन निरनिराळ्या वस्तूंना निरनिराळ्या अर्थांनी अचूकपणे व पूर्णपणे (अन्यूनातिरिक्तेन) लागू पडतो व केवळ त्या शब्दामुळे किंवा शब्दसमूहामुळे त्या दोन वस्तूंमधील सादृश्य प्रगट केले जाते, म्हणजे जेथे दोन वस्तूंमधील सादृश्य अर्थनिष्ठ नसून शब्दनिष्ठ असते, तेथे शब्दश्लेष अलंकार असतो.[४३]

---

४२) श्लेषासंबंधी आणखी काही विचार महिमभट्टाने तृतीय विमर्श, पृ. ४७८–४७९ येथे 'दत्तानन्दाः प्रजानाम्' इत्यादी श्लोकातील शब्दशक्तिमूल ध्वनीच्या संदर्भात प्रगट केले आहेत.

४३) व्य. वि. ३·८१, पृ. ३९९ : यत्रान्यूनातिरिक्तेन सादृश्यं वस्तुनोर्द्वयोः। शब्दमात्रेण कथ्येत स शब्दश्लेष इष्यते ॥

उदा० काव्यादर्श, २·२९ : बालेवोद्यानमालेयं सालकाननशोभिनी। ४४ (ही उद्यानांची मालिका तरुण स्त्रीप्रमाणे आहे. कारण उद्यानांची मालिका साल वृक्षांच्या समूहांमुळे (साल-कानन) सुंदर दिसते. तर तरुण स्त्री केशकलापानें युक्त मुखामुळे (सालक आनन) सुंदर दिसते. शब्दश्लेष केवळ धर्मीच्या बाब-तीत किंवा केवळ धर्माच्या बाबतीत असतो, म्हणजे केवळ धर्मीला किंवा केवळ धर्माला व्यापणारा असतो. श्लेष जर एकाच वेळी धर्मी व धर्म यांना व्याप-णारा असेल किंवा एकच शब्द श्लेषामुळे धर्मिवाचक व धर्मवाचक असेल तर तो दोषास्पद ठरतो. पहिल्या प्रकाराचे उदाहरण ध्वन्यालोक उद्योत २, पृ. २३५ येथे उद्धृत केलेले 'येन ध्वस्तमनोभवेन बलिजित्कायः पुरास्त्रीकृतः..... पायात् स स्वयमन्धकक्षयकरस्त्वां सर्वदो माधवः।' हे होय. येथे धर्मवाचक शब्द (विशेषणे) व धर्मिवाचक शब्द (विशेष्ये) हे दोनही श्लेषयुक्त म्हणजे द्व्यर्थी आहेत, म्हणून येथे श्लेषाचा वापर दोषास्पद आहे. दुसऱ्या प्रकाराचे उदाहरण 'अनवरतनयनसालिल सिच्यमानः तरुरिव विपल्लवोऽपि सहस्रधा प्ररोहति।' [अखंडपणे वाहून नेलेल्या पाण्याने शिपडला जाणारा पल्लवहीन सुद्धा (विपल्लवोऽपि) वृक्ष ज्याप्रमाणे हजारो अंकुरांनी वाढत जातो, त्याच-प्रमाणे अखंडपणे वाहणाऱ्या अश्रुजलाने शिपडले जाणारे क्षुल्लक दुःख सुद्धा (विपल्लवोऽपि) हजारो मार्गांनी वाढत जाते.] येथे विपल्लव हा शब्द श्लेषाने 'क्षुल्लक किंवा अल्प दुःख' (उपमेय) व 'पल्लवहीन' (वृक्ष या उपमानाचा धर्म) या दोन अर्थांनी वापरला असल्याने श्लेषाचा वापर दोषास्पद झाला आहे. 'अनवरतनयनसलिलसिच्यमानो विपल्लवोऽपि, विपल्लवोऽपि तरुरिव सहस्रधा प्ररोहति' असे म्हणणे योग्य होय.

शब्दश्लेष एकाच वेळी धर्मी व धर्म यांना व्यापणारा असणे जसे इष्ट नाही, तसेच तो वाक्यातील कर्ता, कर्म व क्रियापद या मुख्य घटकांना व्यापणारा असणे इष्ट नाही. कारण वाक्यामध्ये हे तीन महत्त्वाचे घटक

४४) या श्लोकाचा प्रथमार्ध असा : प्रफुल्लपुष्पाभरणा राजते विलसद्वयाः।

असल्याने ते जर शब्दश्लेषाच्या खोड्यात अडकून पडले तर त्यांच्या स्वरूपाचा अपहार होतो म्हणजे त्यांचे स्वरूप स्पष्टपणे ध्यानांत येत नाही.[४५]

जेथे जेथे शब्दश्लेष असतो तेथे तेथे वरवर पाहता जरी एकच शब्द दोन अर्थांचा बोधक म्हणून वापरलेला असला तरी दोन निरनिराळ्या अर्थांचा बोध होण्याच्या दृष्टीने त्या शब्दाची आवृत्ती म्हणजे पुनरुच्चार करणे अवश्य असते. शब्दाची आवृत्ती करावयास लागणे हा शब्दश्लेषाचा अटळ परिणाम असतो. आता कोणत्याही वाक्यामध्ये शब्दश्लेष व त्याचा अटळ परिणाम म्हणून शब्दाची आवृत्ती वक्त्याला अभिप्रेत आहे हे दाखविणारी कोणती तरी खूण (किंवा गमक) वाक्यामध्ये अवश्य असली पाहिजे. तशी खूण वाक्यामध्ये नसेल तर वक्त्याला शब्दश्लेष अभिप्रेत असला तरी त्या शब्दश्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञान वाचकांना होऊ शकत नाही. म्हणून जेथे जेथे कवीला शब्दश्लेष अभिप्रेत असतो तेथे तेथे त्याचे अस्तित्व दाखविणाऱ्या खुणेचा समावेश कवीने वाक्यामध्ये करणे अवश्य असते. शब्दश्लेषाच्या अस्तित्वाची खूण दोन प्रकारची असू शकते : (१) यथा, इव, व किंवा वा यासारखे औपम्यवाचक अव्यय, किंवा तुल्य, सदृश, सम, समान यासारखे औपम्यवाचक विशेषण; (२) रूपक, तुल्ययोगिता, समासोक्ति यासारखा सादृश्यमूलक अर्थालंकार.[४६] शब्दश्लेषाच्या अस्तित्वाच्या गमक कारणाचा समावेश कवीने

---

४५) व्य. वि. २.८२, पृ. ३९९ : स शब्दैः कर्तृकर्मादिप्रधानार्थविनाकृतैः । निबद्धो धार्मिधर्माथैर्द्विविधः परिकीर्तितः ॥ पृ. ४१९ : किं चात्र शब्दश्लेषे कर्तृकर्मादिप्रधानार्थपदोपनिबन्धेन शब्दसादृश्यमुपकल्पनीयं प्रधानस्वरूपापहारप्रसङ्गात् ।

४६) व्य. वि. २.८६–८९, पृ. ४०४ :
शब्दे स्वसिद्धमेकत्वं प्रत्यर्थं तस्य भेदतः ।
सादृश्यविप्रलब्धस्तु लोकस्तत्त्वमवस्यति ॥८६॥
नैतावतावगन्तव्या तस्यानेकार्थवृत्तिता ।
न चानिबन्धना युक्ता शब्दस्यार्थान्तरे गतिः ।
तच्चानेकविधं प्रोक्तमव्ययानव्ययात्मकम् ॥ ८८ ॥
तस्मादर्थान्तरव्यक्तिहेतौ कस्मिंश्चनासति ।
यः श्लेषबन्धनिर्बन्धः क्लेशायैव कवेरसौ ॥ ८९ ॥

वाक्यामध्ये करणे इष्ट व अवश्य असताना त्याचा समावेश न करणे हा वाच्यावचन दोष होय.

महिमभट्टाने केवळ शब्दश्लेषाचा विस्ताराने विचार केला आहे. अर्थश्लेष हा प्रसिद्ध असल्याने त्याचा विचार करण्याची आवश्यकता नाही असे त्याने म्हटले आहे.४७ परंतु पृ. ४२५ वर त्याने अर्थश्लेषाच्या अयोग्य व दोषास्पद वापराचे जे उदाहरण (दत्तानन्दाः प्रजानाम् इत्यादी) दिले आहे, ते शुद्ध अर्थश्लेषाचे नसून त्यात शब्दश्लेष व अर्थश्लेष यांचे मिश्रण आहे. परंतु त्या उदाहरणातील शब्दश्लेष हा अभङ्ग शब्दश्लेष असल्याने महिमभट्टाने त्या अभंगशब्दश्लेषाला अर्थश्लेष मानून संपूर्ण श्लोक अर्थश्लेषाचे उदाहरण म्हणून उद्धृत केला आहे. यावरून असे दिसते की महिमभट्टाच्या मते अर्थश्लेष म्हणजे अभङ्गश्लेष व शब्दश्लेष म्हणजे सभङ्गश्लेष होय. अर्थात् मम्मट व विश्वनाथ ज्या श्लेषप्रकाराला अर्थश्लेष मानतात तो सुद्धा महिमभट्टाच्या मते अभङ्गश्लेषच होय, कारण त्या अर्थश्लेषामधील शब्द अभंगच असतात. या मताचा पुरस्कार उद्भटाने व रुय्यकाने केला आहे.४८ परंतु या महत्त्वाच्या मुद्याची महिमभट्टाने कोठेही स्पष्टपणे चर्चा केलेली नाही. उलट अर्थश्लेष हा प्रसिद्ध असल्याने तपशीलात जाऊन त्याचा विचार करण्याचे त्याने टाळले आहे.

शब्दश्लेषाच्या योग्य वापराच्या दृष्टीने महिमभट्टाने सांगितलेल्या तीन नियमांपैकी तिसऱ्या नियमाचा (म्हणजे श्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञापक चिन्ह वाक्यामध्ये समाविष्ट केलेले असले पाहिजे. या नियमाचा) अर्थ असा होतो की महिमभट्टाच्या मते श्लेष हा स्वतंत्र व प्रधान अलंकार म्हणून कोठेही असणे शक्य नाही. तो नेहमीच उपमा, रूपक इत्यादी दुसऱ्या कोणत्या

---

४७) व्य. वि. २·८३, पृ. ४०० : इत्थं समासतो ज्ञेयं शब्दश्लेषस्य लक्षणम् । अपरस्तु प्रसिद्धत्वादिहास्माभिर्न लक्षितः ॥

४८) पहा : काव्यालंकारसारसंग्रह ४·१०; अलंकारसर्वस्व, पृ. १२३ (काव्यमाला संस्करण, मुंबई, १९३०).

तरी अलंकाराचा सहायक किंवा उपकारक या नात्यानेच असू शकतो,[४९] व ज्या अलंकाराचा सहायक म्हणून श्लेष वापरलेला असतो तोच अलंकार श्लेषाच्या अस्तित्वाचा ज्ञापक असतो. परंतु दण्डिन्, आनन्दवर्धन, मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथ वगैरे ग्रंथकार असे मानतात की श्लेष हा प्रायः दुसऱ्या अलंकाराला सहायक म्हणून आढळत असला तरी काही वेळा तो स्वतंत्र व प्रधान अलंकार या नात्यानेही वापरलेला दृष्टीस पडतो.[५०] याबाबतीत महिमभट्टाचे मत असे आहे की श्लेष हा अलंकार स्वतंत्रपणे व प्रधान म्हणून काव्यात वापरला गेल्यास त्याच्या अस्तित्वाची बोधक खूण दुसऱ्या एखाद्या उपकृत अलंकाराच्या रूपाने उपलब्ध होत नसल्याने, तो श्लेषाचा सदोष वापर ठरतो.

श्लेष या अलंकाराचे वाच्यावचन व अवाच्यवचन या दोषांच्या दृष्टिकोनातून दुसऱ्या कोणत्याही लेखकाने इतके मूलग्राही व तपशीलवार विवेचन केलेले आढळत नाही. तसेच श्लेषाच्या निर्दोष वापरासाठी पाळावयाच्या नियमांचाही इतका सूक्ष्म विचार इतरत्र केलेला दिसून येत नाही. तेव्हा व्यक्तिविवेक या ग्रंथाचे हे एक खास वैशिष्ट्यच मानावे लागेल.

(५) उपमेतील उपमान व उपमेय यांच्यामधील केवळ सामान्य, व्यापक सादृश्याचा मोघमपणे निर्देश करणे इष्ट असताना एखाद्या विशिष्ट धर्मामुळे उत्पन्न होणाऱ्या सादृश्याचा निर्देश उपमानसमासाच्या द्वारा 'उपमानानि सामान्यवचनैः' (अष्टाध्यायी, २.१.५५) या सूत्रानुसार करणे हा वाच्यावचन दोष होय. उदा० शिशुपालवध ९.१८ 'पतिते पतङ्गमृगराजि' इत्यादी श्लोक.

---

४९) काव्यादर्श, १·३६३ : श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् । भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम् ॥ काव्यालंकारसारसंग्रह, ४·१० : अलंकारान्तरगतां प्रतिभां जनयत् पदैः (श्लिष्टम् = श्लेषः) । रसगङ्गाधर, पृ. ५२५ : अयं चालंकारः प्रायेणालंकारान्तरस्य विषयम् अभिनिविशते ।

५०) रसगङ्गाधर, पृ. ५३६ : अयं चोपमेव स्वतन्त्रोऽपि तत्र तत्र सकलालंकारानुग्राहकतया स्थितः सरस्वत्या नवं नवं सौभाग्यमावहन् नानाविधेषु लक्ष्येषु सहृदयैर्विभावनीयः ।

येथे नागयूथमलिनानि या उपमानसमासाच्या द्वारा हत्तींचे कळप व अंधकार-पुंज यांमधील मलिनत्व या धर्मामुळे उत्पन्न होणाऱ्या सादृश्याचा निर्देश केला आहे. परंतु हत्तींचे कळप व अंधकारपुंज यांच्यामधील मलिनत्व या साधारण-धर्माला येथे महत्त्व नसून त्या दोघांच्या ठिकाणी असणाऱ्या वध्यत्व किंवा विनाश्यत्व या धर्माला महत्त्व आहे. 'नागयूथमलिनानि तमांसि' असे न म्हणता 'नागयूथसदृशानि तमांसि' असे म्हणणे योग्य होय. असा बदल केल्यास वध्यत्व किंवा विनाश्यत्व या विशिष्ट धर्मामुळे हत्तींचा कळप व अंधकारपुंज यांच्यामध्ये सादृश्य असल्याचे ध्यानात येते. सिंहामुळे जसा हत्तींच्या कळपाचा निःपात (विनाश) होतो, तसाच सूर्यामुळे अंधकारपुंजांचा निःपात होतो हे हत्तींचा कळप व अंधकारपुंज यांच्यामधील सादृश्याचे स्वरूप आहे. अंधकार-पुंज काळ्या रंगाचे असतात हे सर्वांना ज्ञात असल्यामुळे अंधकाराच्या बाबतीत मलिनत्व या धर्माचा आवर्जून निर्देश करणे समर्थनीय नाही.

(६) वाक्यातील उद्देश्य नेहमी प्रथम व विधेय त्याच्यानंतर असणे हा त्यांच्यामधील क्रम इष्ट असताना विधेयाचा निर्देश प्रथम करणे व त्यानंतर उद्देश्याचा निर्देश करणे हा वाच्यावचन दोष होय. उदा० 'लक्ष्मीः दुहिता, जामाता हरिः, गृहिणी गङ्गा' इत्यादी पद्यामध्ये 'हरिः जामाता, गङ्गा गृहिणी' असा क्रम योग्य होय. वाच्यावचन दोषाचा हा प्रकार म्हणजे विधेयाविमर्श दोषच होय.[५१]

(७) दूरान्वय : ज्या दोन शब्दांच्या अर्थामध्ये निकट संबंध असतो ते शब्द एकमेकांजवळ, दुसऱ्या कोणत्याही शब्दाच्या व्यवधानावाचून वापरणे इष्ट असताना त्यांच्यामध्ये इतर शब्द वापरून त्यांना एकमेकांपासून अलग करणे म्हणजे वाच्यावचन दोष होय. हा दोष क्रमभेददोषासारखाच आहे. एखाद्या शब्दाचे वाक्यातील योग्य स्थान अर्थदृष्ट्या दुसऱ्या एखाद्या शब्दाच्या लगेच पूर्वी किंवा लगेच नंतर असताना, तो शब्द तेथे न वापरता निराळ्याच अयोग्य स्थानी वापरणे म्हणजे क्रमभेददोष होय. महिमभट्टाने क्रमभेदाचे

---

५१) व्य. वि. २·९४, पृ. ४३२ : पहा : वर पृ. ४५, टीप १४.

सर्वनामक्रमभेद व अव्ययक्रमभेद असे दोनच प्रकार सांगितले आहेत. पदक्रमभेद हा प्रकार त्याने सांगितलेला नाही. प्रस्तुत दूरान्वयदोष हा पदक्रमभेद दोषच होय.

(८) अनन्वय : ज्या दोन शब्दांच्या अर्थांमध्ये कोणताही निकट संबंध नसतो व काहीतरी संबंध मोठ्या कष्टाने दाखवावा लागतो, त्या शब्दांमध्ये अनन्वय हा दोष उत्पन्न होतो. उदा० रघुवंश ९.६४ : 'निर्घातोग्रैः कुञ्जलीनान् जिघांसुः' इत्यादी श्लोक. यातील राजशब्दे या शब्दाचा मृगाणाम् या शब्दाशी तर्कसंगत संबंध दाखविणे अशक्य आहे. म्हणून 'राजभावे मृगाणाम्' अशी सुधारणा करणे इष्ट आहे.

(९) एखाद्या शब्दाच्या अर्थाच्या ठिकाणी वाक्यातील क्रियेचे कर्तृत्व असल्यामुळे, तो शब्द प्रथमा विभक्तीत वापरणे इष्ट असताना, सहभाव (साहचर्य) हा अर्थ असलेल्या तृतीया विभक्तीत तो शब्द वापरून त्याच्या अर्थाला गौणत्व देणे म्हणजे वाच्यावचन दोष होय. उदा० शिशुपालवध १.६६ : 'तपेन वर्षाः' इत्यादी श्लोक. येथे 'वर्षाभिः तपः' असे म्हणणे योग्य झाले असते.

(१०) एखाद्या शब्दाचे बहुवचन अर्थाच्या दृष्टीने वापरणे इष्ट असताना, किंवा बहुवचनाचा अर्थ प्रगट करण्यासाठी एकवचनातील शब्दाला सर्व, सकल यासारखे विशेषण जोडणे इष्ट असताना, त्या शब्दाचे एकवचनी रूप वापरणे म्हणजे वाच्यावचन दोष होय. उदा० किरातार्जुनीय २.२१ : 'प्रकृतिः खलु सा महीयसः सहते नान्यसमुन्नतिं यया।' येथे 'प्रकृतिः खलु सा महीयसां न सहन्तेऽन्यसमुन्नतिं यया' असे म्हणणे योग्य झाले असते. 'जातौ एकवचनम्' या न्यायानुसार एकवचनाचा वापर बहुवचनाच्या अर्थाने संस्कृतमध्ये अनेकदा केला जातो हे जरी खरे असले तरी महिमभट्टाच्या मते, 'जातौ एकवचनम्' या न्यायाचा आधार घेऊन एकवचनाचे समर्थन करावे लागणे याचा अर्थ एकवचनाचा अर्थ दोषास्पद आहे व 'स्थितस्य गतिश्चिन्तनीया' या न्यायाने एकवचनाचे समर्थन केले जाते, असाच होतो.

**अवाच्यवचनदोष** (पृ. ४३९–४५६)

जे बोलून दाखविणे इष्ट नाही, ते बोलून दाखविणे म्हणजे अवाच्यवचन होय. वाच्यावचन व अवाच्यवचन हे दोन दोष नेहमी एकाच ठिकाणी असलेले आढळतात. वाच्यावचनामध्ये अवाच्यवचनाचा अन्तर्भाव होतो, कारण जेथे वाच्याचे अवचन असते तेथे त्याचा अनिवार्य परिणाम म्हणून अवाच्याचे वचनही असते. म्हणून हे दोन दोष एकमेकाना पूरक आहेत.[५२]

अवाच्यवचन दोषाची सुमारे पंचवीस उदाहरणे देऊन महिमभट्टाने त्यांची चर्चा केली आहे. त्यांपैकी काही लक्षणीय उदाहरणे पुढे दिली आहेत.

(१) एकमेकाचे पर्याय असणारे (म्हणजे समानार्थक) दोन शब्द वापरून एकाच वस्तूला उपमेय व उपमान बनविणे, यामध्ये अवाच्यवचन दोष उत्पन्न होतो.[५३] उदा० रघुवंश, १४·८ : सरित्समुद्रान् सरसीश्च गत्वा रक्षः कपीन्द्रैरुपपादितानि। तस्यापतन् मूर्ध्नि जलानि जिष्णोर्विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः ॥ येथे जलानि व आपः हे दोन एकार्थक शब्द वापरून एकाच वस्तूला उपमेय व उपमान बनविले आहे. महिमभट्टाच्या मते 'विन्ध्यस्य मेघप्रभवानि यद्वत्' असे न म्हणता 'विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः' असे म्हणण्यात वाच्यावचन व अवाच्यवचन असा दुहेरी दोष उत्पन्न झाला आहे. जलानि हा एकच शब्द प्रथम प्रत्यक्षपणे उपमेय म्हणून व नंतर अध्याहृत रूपात उपमान म्हणून वापरला तरी त्यात पुनरुक्तीचा दोष नाही, कारण सरित्समुद्रादिजल व मेघप्रभव जल हे एकमेकाहून भिन्न पदार्थ आहेत.[५४]

---

५२) पहा : वर पृ. ५९-६०.

५३) व्य. वि. २·१०१, पृ. ४३६ : पर्यायमात्रभिन्नस्य यदेकस्यैव वस्तुनः। उपमानोपमेयत्वम् अवाच्यवचनं च तत् ॥

५४) परंतु हाच युक्तिवाद वापरून प्रस्तुत श्लोकातील विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः या पाठाचे समर्थन करणे शक्य आहे. सरित्समुद्रादिजलानि व मेघप्रभवा आपः हे एकमेकांपासून अत्यंत भिन्न असल्यामुळे त्यांच्यामध्ये उपमेय-उपमानसंबंध प्रतीत होण्यात काही अडचण नाही. जलानि हा एकच शब्द उपमेय म्हणून प्रत्यक्षपणे व उपमान म्हणून अध्याहृत स्वरूपात वापरला असता, ती दोनही

(२) उपमेय व उपमान यांचे अभेदाने रूपक करताना केवळ उपमानाचाच निर्देश करणे इष्ट असताना उपमानापासून उत्पन्न झालेल्या वस्तूचाही निर्देश उपमानाबरोबर करणे म्हणजे अवाच्यवचन दोष होय. उदा० तप्ते महाविरहवह्निशिखावलीभिः आपाण्डुरस्तनतटे हृदये प्रियायाः। (विरहाग्नीच्या भयंकर ज्वालांनी प्रियेच्या फिकट वक्षःस्थळाखालील हृदयाला चटके बसत असताना). येथे विरहाग्नितप्ते एवढेच म्हणणे योग्य असताना विरहाग्निशिखावलीभिः तप्ते असे म्हटल्यामुळे अवाच्यवचन दोष उत्पन्न झाला आहे.[५५]

(३) एखादी वस्तू किंवा व्यक्ती व तिचा वाचक शब्द या दोहोंना लागू पडेल असे एकच श्लिष्ट विशेषण वापरणे शास्त्रदृष्टया उचित असले तरी काव्यामध्ये त्यामुळे अवाच्यवचन दोष उत्पन्न होतो. उदा० दृढतरनिबद्धमुष्टेः कोशनिषण्णस्य सहजमलिनस्य। कृपणस्य कृपाणस्य च केवलमाकारतो भेदः॥ येथे पहिल्या ओळीत तीन श्लिष्ट विशेषणे कृपण (कंजूष मनुष्य) व कृपाण (खड्ग) यांच्या मधील सादृश्य दाखवितात, तर केवलम् आकारतो भेदः हे दुसऱ्या ओळीतील श्लिष्ट विशेषण त्या दोहोंमधील निराळेपणा दाखविते. आकार या शब्दाचे दोन अर्थ आहेत : (१) कृपाण या शब्दातील आ हा स्वर, व (२) खड्ग आणि कंजूष मनुष्य यांचे आकार म्हणजे मूर्त रूपे. शास्त्रदृष्टया प्रत्येक शब्द स्वतःचे नादमय रूप व त्याच्याशी संकेताने संबद्ध असलेली वस्तू किंवा व्यक्ती, अशा दोन अर्थांचा बोध करून देतो. हे सैद्धान्तिक दृष्टया ठीक आहे. पण भाषिक व्यवहारात कोणताही शब्द केवळ संकेतित अर्थाचा वाचक असतो, स्वतःच्या नादमय रूपाचा बोधक नसतो. कृपण व कृपाण यांमध्ये केवळ आकृतीचा निराळेपणा आहे ही गोष्ट काव्यामध्ये आवर्जून निर्देश करण्याइतकी महत्त्वाची नाही, कारण ती सुप्रसिद्ध आहे. कृपण व कृपाण यांमध्ये केवळ आ या स्वरामुळे निराळेपणा आहे, हे विधान कृपण व

---

जले अत्यंत भिन्न असल्यामुळे त्यांच्यामधील उपमेय-उपमानसंबंधाला जर बाध येत नाही, तर जलानि व आपः हे दोन निरनिराळे शब्द वापरले असता उपमेय-उपमानसंबंधाला बाध का यावा हे समजत नाही.

५५) व्य. वि. २·१०२ (पृ. ४३८) : उपचारसहैकैव रूपकस्येष्यते क्रिया। यथानलस्य दाहादिःन कार्यादिरसंभवात्।

कृपाण या शब्दांना लागू पडणारे आहे. खड्ग व कंजूष मनुष्य या पदार्थांना लागू पडणारे नाही. दुसऱ्या ओळीतील विधान हे केवळ हरिदासी कोटिबाजपणाचे उदाहरण असल्यामुळे ते अवाच्य म्हणजे अयोग्य किंवा अनुचित आहे. पहिल्या ओळीतील श्लिष्ट विशेषणांचा उपयोग करून त्यांच्या मध्ये सादृश्य आहे असे म्हणणे योग्य झाले असते.[५६] तसे न करता कवीने आकार या शब्दावरील श्लेषाचा बालिशपणा केल्याने येथे वाच्यावचन व अवाच्यवचन हे दोष उत्पन्न झाले आहेत.[५७]

(४) दोन शब्दांचा समास करून तयार केलेली संज्ञा एखाद्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा निर्देश करताना समासाच्या रूपाने न वापरता त्या सामासिक संज्ञेची तिच्या दोन घटक शब्दांच्या रूपाने फोड करून, त्या दोन शब्दांपैकी पहिला शब्द पूर्वावयव असणारी वस्तू किंवा व्यक्ती असे म्हणून त्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा निर्देश करणे म्हणजे अवाच्यवचन दोष होय. उदा० शिशुपालवध १·४२ येथे हिरण्यकशिपु या दानवाला हिरण्यपूर्व कशिपु असे म्हटले आहे. रघुवंश ८·२९ येथे दशरथाला दशपूर्व रथ म्हटले आहे. मेघदूत १·४५ येथे देवगिरि पर्वताला देवपूर्व गिरि म्हटले आहे. हिरण्यपूर्व कशिपु, दशपूर्व रथ व देवपूर्व गिरि हे शब्दप्रयोग हिरण्यकशिपु, दशरथ व देवगिरि या संज्ञांचे बोधक आहेत, त्या व्यक्तीचे किंवा वस्तूचे बोधक नाहीत. म्हणून या प्रकारचे शब्दप्रयोग करण्यात अवाच्यवचन व वाच्यावचन हे दोष उत्पन्न होतात.[५८]

---

५६) म्हणजे महिमभट्टाच्या मते कवीने दुसऱ्या ओळीमध्ये पुढीलप्रमाणे शब्दयोजना केली असती तर अवाच्यवचन दोषाचा परिहार झाला असता - कृपणस्य कृपाणस्य च सादृश्यं विस्मयाय लोकस्य ।

५७) महिमभट्टाने उपस्थित केलेला मुद्दा एका दृष्टीने योग्य आहे. संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणी केवळ शब्दच्छल करून कोट्या केलेल्या असतात व अशा ठिकाणी नादमय शब्द व त्याचा अर्थ यांमध्ये निराळेपणा असूनही त्यांच्यामध्ये अभेद आहे असे मानून त्या कोट्याचे समर्थन केले जाते.

५८) मल्लिनाथ या टीकाकाराच्या मते या प्रकारचे शब्दप्रयोग दोषास्पद असून त्यांचे समर्थन कसे तरी लक्षणेचा अवलंब करून करावे लागते. संज्ञावाचक शब्द

(५) तर्कशास्त्रीय अनुमितीच्या प्रयोगात प्रतिज्ञा व निगमन या दोन अंशांमध्ये पुनरुक्ती असली तरी रूढ शास्त्रीय पद्धतीनुसार त्या दोनही अंशांचा निर्देश करणे अवश्य असते. पण काव्यानुमानात यांपैकी कोणत्या तरी एकाच अंशाचा निर्देश करणे योग्य असताना दोनही अंशांचा निर्देश करणे हा अवाच्यवचन दोष होय.

(६) समासोक्ती अलंकारामध्ये प्रस्तुत उपमेयाच्या वर्णनामुळे अप्रस्तुत उपमानाचे ज्ञान व्यंजनेने होते असे ध्वनिवादी मानतात. परंतु अप्रस्तुत उपमानाचे ज्ञान अनुमानाने होते असे महिमभट्ट मानतो. उपमानाचे ज्ञान व्यंजनेने होवो किंवा अनुमानाने होवो, उपमानाचा निर्देश त्याच्या वाचक शब्दाने करणे अनिष्ट असते. असे असूनही समासोक्तीमध्ये उपमानाचा निर्देश वाचक शब्दाने म्हणजे अवाच्यवचन दोष होय. याच दोषाचा निर्देश महिमभट्टाने पृ. ३५८ वर पौनरुक्त्य दोषाच्या संदर्भात व पृ. ३९१ वर वाच्यावचन दोषाच्या संदर्भात केलेला आहे.[५९]

(७) अप्रस्तुतप्रशंसा अलंकारामध्ये अप्रस्तुत उपमानाच्या वर्णनामुळे प्रस्तुत उपमेयाचे ज्ञान वरीलप्रमाणेच होत असल्यामुळे प्रस्तुत उपमेयाचा निर्देश तद्वाचक शब्दाने करणे अयोग्य असते. असे असूनही अप्रस्तुतप्रशंसेमध्ये प्रस्तुत उपमानाचा निर्देश वाचक शब्दाने करणे म्हणजे अवाच्यवचन दोष होय.[६०]

(८) हेतूत्प्रेक्षेमध्ये एखाद्या क्रियेच्या कविकल्पित कारणाची उत्प्रेक्षा केलेली असते. तसेच फलोत्प्रेक्षेमध्ये एखाद्या क्रियेच्या कविकल्पित परिणामाची

---

संज्ञिवाचक शब्दाच्या ऐवजी वापरणे म्हणजे लक्षणाच होय; असे मल्लिनाथाने म्हटले आहे. पहा : मेघदूत १·४५, शिशुपालवध १·४२ व ३·५९ यांवरील मल्लिनाथाची टीका. महिमभट्टाप्रमाणे मल्लिनाथानेसुद्धा ही सर्व अवाच्यवचन दोषाची उदाहरणे मानली आहेत.

५९) पहा : काव्यप्रकाश, उल्लास १०, अलंकारदोषचर्चा, पृ. ७८६, भांडारकर संशोधनमंदिर प्रकाशन.

६०) पहा : काव्यप्रकाश, उल्लास १०, अलंकारदोषचर्चा, पृ. ७८७-७८८.

उत्प्रेक्षा केलेली असते. अशा ठिकाणी उत्प्रेक्षावाचक इव हे अव्यय महिमभट्टाच्या मते मुख्य क्रियेच्या वाचक शब्दानंतर लगेच वापरणे इष्ट असूनही ते अव्यय कारणवाचक किंवा परिणामवाचक शब्दानंतर वापरले तर अवाच्यवचन दोष उत्पन्न होतो.६१

(९) काव्यामध्ये जे शब्द कवीने वापरावयाचे असतात, ते सार्थ व साभिप्राय असले पाहिजेत. वर्ण्य वस्तूचे स्वरूप जसे आहे तसे वर्णन करणे म्हणजे काव्य नव्हे. काव्यामध्ये कविप्रतिभेचा विलास पदोपदी अनुभवाला आला पाहिजे. वर्ण्य वस्तूच्या लोकप्रसिद्ध बाह्य स्वरूपाचा अनुवाद करणारे शब्द वापरणे म्हणजे अवाच्यवचन दोष होय. सर्वपरिचित बाह्य स्वरूपाचा अनुवाद करणारे शब्द म्हणजे केवळ फेस किंवा फुलोरा होय. ते शब्द अर्थघन नसतात व त्यांची योजना केवळ वृत्तपूरणासाठी केलेली असते.६२ याच दोषाला इतर लेखकांनी अपुष्टार्थता दोष असे नाव दिले आहे. याचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने पुढील पद्य उद्धृत केले आहे (पृ. ४५२) : उत्फुल्लकमलकेसरपरागगौरद्युते मम हि गौरि। अभिवाञ्छितं प्रसिध्यतु भगवति युष्मत्प्रसादेन ॥६३ महिमभट्टाच्या मते या पद्यातील उत्फुल्ल, केसर व गौर हे

---

६१) परंतु जगन्नाथ पंडिताच्या मते (रसगंगाधर, पृ. ४०; काव्यमाला संस्करण, १९३९) इव हा उत्प्रेक्षावाचक शब्द मुख्य क्रियावचक शब्दानंतर न वापरता कारणवाचक किंवा फलवाचक शब्दानंतर वापरणे योग्य होय. रघुवंश १३·२३ मध्ये विश्लेषदुःखादिव बद्धमौनम् अशी हेतूत्प्रेक्षा आहे व इव हे अव्यय विश्लेषदुःखात् या हेतुवाचक शब्दानंतर लगेच वापरले आहे. जगन्नाथाच्या मते हे योग्यच आहे. पण महिमभट्टाच्या मते विश्लेषदुःखाद् बद्धमौनम् इव अशी शब्दयोजना योग्य झाली असती. कारण विश्लेषदुःखादिव बद्धमौनम् या शब्दयोजनेमध्ये अवाच्यवचन दोष आहे. महिमभट्टाच्या मतानुसार असलेला हा अवाच्यवचन दोष म्हणजे क्रमभेद दोषच होय. पहा : विमर्श २, पृ. ३२९ व पृ. ३३१, संग्रहश्लोक ३५.

६२) व्य. वि. २·१११-११२ (पृ.४५१) : यत् स्वरूपानुवादैकफलं फल्गु विशेषणम्। अप्रत्यक्षायमाणार्थं स्मृतमप्रतिभोद्भवम्॥ तदवाच्यमिति ज्ञेयं, वचनं तस्य दूषणम्। तद् वृत्तपूरणायैव न कवित्वाय कल्पते ॥

६३) नागानन्द, १·१३.

शब्द केवळ वृत्तपूरणासाठी वापरले असल्याने अवाच्यवचन दोष उत्पन्न झाला आहे. केवळ कमलपरागद्युते असे म्हणणे योग्य झाले असते.

अवाच्यवचन दोषाच्या संदर्भात महिमभट्टाने स्वभावोक्ती अलंकाराच्या स्वरूपाची चर्चा केली आहे. स्वभावोक्ती म्हणजे काही विशिष्ट प्रकारच्या वर्ण्य विषयांच्या स्वरूपाचे किंवा अवस्थेचे यथातथ्याने केलेले वर्णन असल्याने स्वभावोक्तीमध्ये वर्ण्य वस्तूच्या किंवा व्यक्तीच्या लोकपरिचित स्वरूपाचा केवळ अनुवाद केलेला असतो. स्वभावोक्तीमध्ये कवीच्या कल्पनाविलासाला मुळीच वाव नसतो. आधीपासूनच वाचकाना ज्ञात असलेले वस्तुस्वरूप किंवा व्यक्तिस्वरूप हे खरे पाहता अवाच्य (वर्णन करण्यास अयोग्य) असते व त्या स्वरूपाच्या किंवा अवस्थेच्या कविकृत वर्णनामध्ये पौनरुक्त्य व अवाच्यवचन हे दोन दोष अटळपणे उत्पन्न होतात. दण्डी वगैरे प्राचीन लेखकांनी स्वभावोक्ती हा काव्याचा एक महत्त्वाचा अलंकार मानला असला[६४] तरी तो पौनरुक्त्य व अवाच्यवचन या दोषांमुळे काव्याचे भूषण नसून दूषणच आहे.[६५] या अडचणीचे निराकरण महिमभट्टाने पुढीलप्रमाणे केले आहे.

वस्तूचा किंवा व्यक्तीचा स्वभाव दोन प्रकारचा असतो : (१) सामान्य लोकांना सहजगत्या प्रतीत होणारा बरवरचा स्थूल स्वभाव व (२) केवळ कवींनाच प्रतिभासामर्थ्यामुळे प्रतीत होणारा अनन्यसाधारण वैशिष्ट्यांनी युक्त असलेला सूक्ष्म, गूढ स्वभाव. यांपैकी केवळ दुसऱ्या प्रकारच्या स्वभावाचे वर्णन यथातथ्याने करणे म्हणजे स्वभावोक्ती अलंकार होय. कवीची प्रतिभा म्हणजे त्याचे ज्ञाननेत्र असून, इतर लोकांना वस्तूंची व व्यक्तींची जी सूक्ष्म वैशिष्ट्ये चर्मचक्षूंनी दिसत नाहीत त्यांचा वेध आपल्या प्रतिभानेत्राने घेऊन त्यांचे वर्णन कवी यथातथ्याने करीत असल्यामुळे स्वभावोक्ती अलंकारामध्ये

---

६४) पहा : काव्यादर्श, २·८ : नानावस्थं पदार्थानां रूपं साक्षाद् विवृण्वती । स्वभावोक्तिश्च जातिश्चेत्याद्या सालंकृतिर्यथा ॥ २·१३ : जातिक्रियागुणद्रव्य-स्वभावाख्यानमीदृशम् । शास्त्रेष्वस्यैव साम्राज्यं काव्येष्वप्येतदीप्सितम् ॥

६५) व्य. वि. २·११३ (पृ. ४५२) : कथं तर्हि स्वभावोक्तेरलंकारत्वमिष्यते । न हि स्वभावमात्रोक्तौ विशेषः कश्चनानयोः ॥

पौनरुक्त्य व अवाच्यवचन हे दोष उत्पन्न होऊ शकत नाहीत.६६ कविप्रतिभेच्या तात्त्विक स्वरूपासंबंधी विचार आपण तत्त्वोक्तिकोश या शास्त्रीय ग्रंथामध्ये केला आहे असे महिमभट्टाने २·११९ (पृ. ४५३) येथे म्हटले आहे.६७ महिमभट्टाचा हा ग्रंथ उपलब्ध नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय.

सहा काव्यदोषांचा तपशीलवार विचार केल्यानंतर महिमभट्टाने असे म्हटले आहे की हे दोष महाकवींच्या काव्यांत व इतर लेखकांनी लिहिलेल्या वृत्तबद्ध शास्त्रीय ग्रंथांमध्ये सुद्धा आढळतात.६८ निरनिराळ्या काव्यदोषांची चर्चा करताना महिमभट्टाने कालिदास, भारवि, माघ, रत्नाकर वगैरे महाकवींच्या काव्यातील अनेक दोषस्थळे दाखवून शक्य तेथे ते दोष टाळण्याच्या दृष्टीने शब्दयोजनेमध्ये सुधारणा सुचविल्या आहेत. शास्त्रीय वृत्तबद्ध ग्रंथ सुद्धा या दोषांपासून मुक्त नसतात हे दाखविण्यासाठी महिमभट्टाने ध्वन्यालोकाच्या

---

६६) व्य. वि. २·११४–११६ (पृ. ४५२):
उच्यते वस्तुनस्तावद् द्वैविध्यमिह विद्यते ।
तत्रैकमस्य सामान्यं यद् विकल्पैकगोचरः ॥
स एव सर्व शब्दानां विषयः परिकीर्तितः ।
अत एवाभिधेयं ते सामान्यं बोधयन्त्यलम् ॥
विशिष्टमस्य यद्रूपं तत्प्रत्यक्षस्य गोचरः ।
स एव सत्कविगिरां गोचरः प्रतिभाजुषाम् ॥

६७) इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिरुपपादितम् ।
शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्य इति नेह प्रपञ्चितम् ॥
पहा : वर पृ. ८-९.

६८) महाकवींच्या काव्यातील दोष दाखविण्याचा प्रसंग एखाद्यावर येणे ही एक अप्रिय, दुर्दैवी गोष्ट आहे. पण विद्यार्थ्यांच्या आग्रहामुळे व होतकरू कवींच्या मार्गदर्शनासाठी तसे करणे अवश्य आहे असे महिमभट्टाने २·१ व २·१२६ येथे म्हटले आहे :
छात्राभ्यर्थनया ततोऽद्य सहसैवोत्सृज्य मार्ग सतां
पौरोभाग्यमभाग्यभाजनजनासेव्यं मयाङ्गीकृतम् ॥ २·१
इदमद्यतनानां च भाविनां चानुशासनम् ।
लेशतः कृतमस्माभिः कविवर्त्मारुरुक्षताम् ॥ २·१२६

प्रथम उद्योतातील पहिल्या कारिकेचे परीक्षण करून तीमध्ये क्रमभेद, पौनरुक्त्य, वाच्यावचन, प्रक्रमभेद, अवाच्यवचन वगैरे दोष दाखवून ते टाळण्यासाठी त्या कारिकेची फेररचना केली आहे. ध्वन्यालोकाच्या प्रथम कारिकेतील दोषांची चर्चा ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनाचा एक भाग म्हणूनच महिमभट्टाने केली आहे. प्रथम विमर्शामध्ये ध्वन्यालोक १.१३ या कारिकेमध्ये ज्याप्रमाणे दहा दोष महिमभट्टाने दाखविले आहेत, त्याचप्रमाणे द्वितीय विमर्शामध्ये ध्वन्यालोक १.१ या कारिकेमध्ये दहा दोष दाखविले आहेत. महिमभट्टाने ध्वन्यालोक १.१ या कारिकेची जी यथाशक्य निर्दोष फेररचना वरील दोष टाळण्यासाठी केली आहे, तिच्यामध्येसुद्धा प्रक्रमभेद, पौनरुक्त्य, वाच्यावचन व अवाच्यवचन हे चार दोष दाखविणे शक्य आहे.[६९]

---

स्वतःच्या पद्यरचनेमध्येसुद्धा काही दोष असण्याची शक्यता महिमभट्टाने नाकारलेली नाही. पहा : व्य. वि. २.२ :

स्वकृतिष्वयन्त्रितः कथमनुशिष्यादन्यमिति न वाच्यम् ।
वारयति भिषगपथ्यादन्यान् स्वयमाचरन्नपि तत् ॥

आनंदवर्धनाने सुद्धा महाकवींच्या काव्यांमध्ये अनेक दोष असतात असे ध्वन्यालोक उद्योत २, पृ. २३३ येथे म्हटले आहे. परंतु विशिष्ट कवींच्या काव्यातील दोषयुक्त उदाहरणे देऊन त्यांची चर्चा करण्याचे त्याने प्रायः टाळले आहे. काव्यातील संभाव्य रसविषयक दोष व ते टाळण्याचे उपाय यासंबंधी केवळ सामान्य चर्चा त्याने केली आहे.

६९) दुसऱ्या ओळीमध्ये तस्याभावं जगदुरपरे यानंतर भक्तिरित्येवमन्ये असे म्हटल्याने प्रक्रमभेद दोष उत्पन्न झाला आहे. भाक्तमाहुस्तमन्ये असे म्हणणे योग्य झाले असते. दुसऱ्या ओळीमध्ये इत्येवम् येथे इति व एवम् ही दोन समानार्थक अव्यये वापरल्यामुळे पौनरुक्त्य दोष उत्पन्न झाला आहे. या ओळीतील प्रक्रमभेद व पौनरुक्त्य या दोषांमुळे वाच्यावचन व अवाच्यवचन हे आणखी दोन दोष उत्पन्न झाले आहेत.

# ४

# व्यक्तिविवेक

## ग्रंथाशयाचे विवरण–तृतीय विमर्श

ध्वनिसिद्धान्ताचे खंडन करण्यासाठी व्यक्तिविवेकाच्या प्रथम विमर्शामध्ये महिमभट्टाने व्यंजनावृत्तीचे सैद्धान्तिक दृष्टया खंडन करून ध्वनिलक्षणातील व ध्वनिकाव्याच्या मुख्य प्रकारांच्या आणि उपप्रकारांच्या संज्ञातील दोष दाखवून त्यांचे खंडन केले. द्वितीय विमर्शामध्ये काव्यातील पाच (किंवा सहा) शब्ददोषांची सविस्तर व सोदाहरण चर्चा करून ध्वन्यालोकाच्या प्रथम उद्योतातील प्रथम कारिकेमध्ये एकूण दहा दोष दाखवून त्या कारिकेतील विचारसरणीचे खंडन केले. आता तृतीय विमर्शामध्ये ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनातील एक महत्त्वाचा भाग या दृष्टीने ध्वन्यालोक या ग्रंथात ध्वनीच्या निरनिराळ्या प्रकारांची जी उदाहरणे दिली आहेत त्यांपैकी काही उदाहरणांची चर्चा करून त्यांमधील तथाकथित व्यंग्य अर्थ अनुमानानेच कसा ध्यानात येतो हे सविस्तरपणे दाखविले आहे. म्हणून व्यक्तिविवेकाचा तृतीय विमर्श हा ध्वनिसिद्धान्ताच्या खंडनाचा प्रायोगिक भाग आहे असे म्हणता येईल.[१]

---

१) पहा : व्य. वि. ३, पृ. ४६३ : तदेवं ध्वनिलक्षणस्य तद्भेदानां चानुमानेऽन्तर्भावमुपपाद्य, तदुदाहरणानां यथायोगं क्रमेण असौ (= अनुमानेऽन्तर्भावः) उपदर्श्यते ।

प्रथम विमर्शामध्ये महिमभट्टाने भाषिक व्यवहारात शब्द व त्यांचे अर्थ यांच्या ठिकाणी व्यंजकत्व या नावाचे सामर्थ्य असू शकत नाही, तर शब्दांच्या ठिकाणी केवळ वाचकत्व सामर्थ्य व अर्थांच्या ठिकाणी केवळ अनुमापकत्व सामर्थ्य (लिङ्गता) असते हे सैद्धान्तिक दृष्टीने दाखवून दिले आहे.२ तसेच अनुमापकत्व हे अर्थांच्या ठिकाणी असणारे सामर्थ्य इतके व्यापक आहे की त्यामध्ये तथाकथित लक्षणा, तात्पर्य व व्यंजकत्व या सामर्थ्यांचा अन्तर्भाव होतो हेही स्पष्ट केले आहे.३ त्याचप्रमाणे महिमभट्टाने हेही स्पष्टपणे दाखविले आहे की मानसिक सुस्थिति व आरोग्य धारण करणारा प्रत्येक मनुष्य आपले सर्व व्यवहार बुद्धीच्या प्रेरणेनुसार करत असल्यामुळे त्याच्या विचारात, बोलण्यात व आचरणात तर्काशी सुसंगतपणा आढळून येतो, म्हणजे त्याचे विचार, उद्‌गार व आचार तर्कशास्त्रानुसारी असतात. त्याने उच्चारलेल्या प्रत्येक वाक्यातील अंगभूत घटक विचार व त्याने केलेल्या प्रत्येक कृतीमध्ये घटकरूपाने असलेले क्रियाकण हे सर्व एकमेकांशी कार्यकारणसंबंधाने सांधलेले असतात.४ एवढेच नव्हे तर वाच्यार्थरूप विचारांचे श्रोत्यांना आकलन झाल्या-नंतर काही वेळाने श्रोत्यांच्या ध्यानात येणारे इतर सूक्ष्म, प्रच्छन्न व गूढ आशय सुद्धा एकमेकांशी व वाच्यार्थरूप विचारांशी कार्यकारणसंबंधाने बांधले गेलेले असतात. या कार्यकारणसंबंधालाच तर्कशास्त्रात साध्यसाधनसंबंध (किंवा अनुमेयअनुमापकसंबंध, किंवा लिङ्गिलिङ्गसंबंध) म्हणतात. कोणत्याही वाक्यामुळे प्रथम ध्यानात येणारा वाच्यार्थ व नंतर काही वेळाने ध्यानात येणारा प्रच्छन्न, गूढ अर्थ यांमध्ये कार्यकारणसंबंध व ज्ञाप्यज्ञापकसंबंध असल्याने प्रच्छन्न अर्थ हा अनुमानरूप बौद्धिक प्रक्रियेमुळेच ध्यानात येतो, तथाकथित व्यंजनारूप शब्दसामर्थ्यामुळे नाही, असा महिमभट्टाचा अनुमान व्यंजना यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन आहे. या सैद्धान्तिक दृष्टिकोनाच्या पार्श्वभूमीवर तृतीय विमर्शामध्ये महिमभट्टाने ध्वन्यालोकातील रसध्वनि, वस्तुध्वनि व अलंकारध्वनि या तीन ध्वनिप्रकारांच्या सुमारे पन्नास उदाहरणांचे परीक्षण करून त्यांपैकी

---

२) पहा : वर पृ. २५–३०.
३) पहा : वर पृ. ३६–३७, ३९.
४) पहा : वर पृ. २३–२४.

बहुसंख्य उदाहरणे अनुमानाच्या आकृतिबंधात बसवून दाखविली आहेत. काही उदाहरणे[५] मात्र अशी आहेत की त्यांमध्ये वाच्यार्थाव्यतिरिक्त दुसरा कोणताही सूक्ष्म, गूढ अर्थ प्रतीत होत नाही. अशी उदाहरणे अनुमानाच्या साच्यात बसवून दाखविण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. या उदाहरणांपैकी बऱ्याच उदाहरणांच्या बाबतीत महिमभट्टाने त्यांचा संदर्भ सांगून त्यांमधील वरवर प्रतीत होणारा वाच्यार्थ व मागाहून ध्यानात येणारा सूक्ष्म, गूढ अर्थ स्पष्ट केले आहेत. या उदाहरणांना अनुमानाच्या साच्यात बसविताना त्या त्या उदाहरणामध्ये कवीला किंवा कविनिर्मित पात्राला अभिप्रेत असलेले प्रच्छन्नार्थ-रूप साध्य (म्हणजे सिद्ध करावयाची गोष्ट) व ते सिद्ध करण्यासाठी वापरलेले वाच्यार्थरूप साधन (हेतु) या दोन महत्त्वाच्या अनुमानअंगांचाच निर्देश महिमभट्टाने केला आहे. इतर अनुमानअंगांची (म्हणजे व्याप्ति, दृष्टान्त, उपनय व निगमन या अंगांची) पूर्ती वाचकांना करता येण्यासारखी असल्याने त्यांचा निर्देश महिमभट्टाने केलेला नाही.

### (अ) रसध्वनि

ध्वनीच्या तीन मुख्य प्रकारांपैकी रसध्वनि या प्रकाराच्या एकाच उदाहरणाचे परीक्षण महिमभट्टाने केले आहे.[६] कुमारसंभव या महाकाव्याच्या तृतीय सर्गामध्ये कालिदासाने पुढील प्रसंग वर्णिला आहे.[७] हिमालयातील तपोवनामध्ये पार्वती नेहमीप्रमाणे शंकराची सेवा करण्यासाठी त्याच्या जवळ गेली असताना मदनाने शंकरावर संमोहन नावाचा बाण सोडल्याने शंकराच्या मनामध्ये चलबिचल उत्पन्न होऊन पार्वतीविषयी प्रणयभावना उदित झाली. शृङ्गाररसध्वनीचे उदाहरण म्हणून आनन्दवर्धनाने या प्रसंगाचा निर्देश ध्वन्यालोकात केला आहे.[८] या प्रसंगाच्या वर्णनामध्ये शंकराच्या बाबतीत जे

---

५) उदाहरणार्थ पहा : पृ. ४६९ (अत्ता एत्थ णिमज्जइ इ० पद्यावरील चर्चा); पृ. ४७८ (उन्नतः प्रोल्लसद्धारः इ० श्लोकावरील चर्चा); पृ. ४९३ (लावण्यकान्ति-परिपूरित इ० श्लोकावरील चर्चा).

६) पृ. ४७७.

७) कुमारसंभव ३.५२ पासून पुढे.

८) ध्वन्यालोक २, पृ. २४८-२४९.

विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव व सात्त्विकभाव कालिदासाने चित्रित केले आहेत, त्यांमुळे शंकराच्या मनात पार्वतीविषयी उदित झालेला रति-भाव (प्रणयभावना) व्यंजनावृत्तीने वाचकांच्या ध्यानात येते व नंतर त्या रतिभावाचा शृंगाररसाच्या रूपाने त्यांना आनंदमय अनुभव येतो, असे आनंदवर्धनाचे मत आहे. परंतु महिमभट्टाच्या मते प्रस्तुत ठिकाणी कालि-दासाने जे विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव व सात्त्विकभाव चित्रित केले आहेत, त्यांमुळे शंकराच्या मनात पार्वतीविषयी रतिभाव जागृत झाल्याचे ज्ञान वाचकांना अनुमानानेच होते, व्यंजनेने नाही.[९] अग्नीचे कार्य असणाऱ्या धूम या हेतूमुळे ज्याप्रमाणे अग्नीच्या अस्तित्वाचे ज्ञान अनुमानाने होते, त्याच-प्रमाणे रत्यादिभावांचे कार्य असणाऱ्या अनुभाव, व्यभिचारिभाव व सात्त्विक-भाव यांचे काव्यवाचनाने होणारे ज्ञान या हेतूमुळे रत्यादिभाव नायकादिकांच्या मनात उदित झाल्याचे ज्ञान वाचकांना अनुमानानेच होते.

## (आ) वस्तुध्वनि

तथाकथित लक्षणामूल ध्वनीतील (म्हणजे अविवक्षितवाच्य ध्वनीच्या अत्यन्ततिरस्कृतवाच्य व अर्थान्तरसंक्रमितवाच्य या उपप्रकारातील) लक्षणा-प्रयोजनरूप अर्थ व्यंजनावृत्तीमुळे ध्यानात येतो हा मुद्दा आनन्दवर्धनाने ध्वन्यालोकात उद्योत १ व ३ मध्ये अभिनिवेशपूर्वक प्रतिपादिला आहे.[१०] जेथे अविवक्षितवाच्यध्वनि (प्रयोजनलक्षणामूल ध्वनि) असतो तेथे तेथे लक्षणेचे प्रयोजन म्हणून वस्तुरूप अर्थ व्यंजनेने सुचविला जातो व ज्या

---

९) पृ. ४७७ : यापि विभावादिभ्यो रसादीनां प्रतीतिः सा अनुमाने एव अन्तर्भाव-मर्हतीति। विभानुभावव्यभिचारिप्रतीतिः हि रसादिप्रतीतेः साधनमिष्यते। ते हि रत्यादीनां भावानां कारणकार्यसहकारीभूताःताननुमापयन्तः एव रसादीन् निष्पादयन्ति। त एव हि प्रतीयमानाः आस्वादपदवीं गताः सन्तः रसा इत्युच्यन्ते, इति अवश्यंभावी प्रतीतिक्रमः। केवलम् आशुभावितया असौ न लक्ष्यते यतोऽयम् अद्यापि (? अत्रापि) अभिव्यक्तिक्रमः इत्युक्तम्। (पहा : व्य. वि. पृ. ५९). पृ. ५०० : तथाविधशब्दसंदर्भाभिहितस्य (अनुभावादेः), रत्यादेः च तार्णपार्णयोः इव धूमाग्न्योः कार्यकारणभावेन अवस्थानात्।

१०) ध्वन्यालोक १, १४–१८, पृ. १४१–१५२; ३, पृ. ४२३–४३६.

शब्दावर लक्षणा असते तो शब्द त्या वस्तुरूप प्रयोजनाचा व्यंजक असतो असा आनन्दवर्धनाचा सिद्धान्त आहे. परंतु महिमभट्टाच्या मते लक्षणेतील प्रयोजन अनुमानाने ध्यानात येते. प्रयोजनमूलक लक्षणेचा आश्रय असणाऱ्या शब्दाचा वाच्यार्थ लक्षणेच्या प्रयोजनाचा गमक किंवा बोधक असतो व प्रयोजन त्या वाच्यार्थाचे गम्य किंवा बोध्य असते. लक्षणेचा आश्रय असणाऱ्या शब्दाचा बाधित होण्यारा वाच्यार्थ व लक्षणेचे प्रयोजन यांमधील गम्यगमकभाव हा व्यंग्यव्यंजकभाव नसून अनुमानप्रक्रियेतील लिङ्गिलिङ्गभाव आहे. लक्षणेचा आश्रय असणाऱ्या शब्दाचा वाच्यार्थ हा अनुमानप्रक्रियेतील लिङ्ग किंवा हेतु (किंवा साधन) असून लक्षणेमुळे प्रतीत होणारे प्रयोजन हे अनुमानप्रक्रियेतील लिङ्गिन् किंवा साध्य असते. म्हणून अविवक्षितवाच्य ध्वनीची (म्हणजे प्रयोजनलक्षणामूलक ध्वनीची) सर्व उदाहरणे ही व्यंग्यव्यंजकसंबंधाची उदाहरणे नसून अनुमेय-अनुमापकसंबंधाची उदाहरणे होत. सुवर्णपुष्पां पृथिवीम् इ०, स्निग्धश्यामलकान्ति इ०, निःश्वासान्ध इवादर्शः इ०, तदा जायन्ते गुणाः इ० व गगनं च मत्तमेघम् इ०, या ध्वन्यालोकात उद्धृत केलेल्या प्रयोजनलक्षणामूलध्वनीच्या पाच उदाहरणांचा महिमभट्टाने विचार करून ती सर्व काव्यानुमितीची उदाहरणे आहेत असे दाखविले आहे.[११] उदाहरणार्थ ध्वन्यालोक उद्योत १, पृ. १३७ येथे सुवर्णपुष्पां पृथिवीम् इत्यादी श्लोक (महाभारत, उद्योगपर्व, ३५, ७४) लक्षणामूलध्वनीचे उदाहरण म्हणून उद्धृत केला आहे. या श्लोकामध्ये सुवर्णपुष्पां पृथिवीम् व चिन्वन्ति या शब्दांवर लक्षणा आहे; व त्या लक्षणेमुळे शूर, विद्वान आणि सेवाधर्मनिपुण लोकांना विपुल संपत्ती प्राप्त होते हा अर्थ लक्षणेचे प्रयोजन म्हणून सुचविला गेला आहे असे ध्वनिवाद्यांचे म्हणणे आहे. परंतु महिमभट्टाच्या मते शूर, विद्वान व स्वामिनिष्ठ सेवक यांना या जगात विपुल संपत्ती प्राप्त होते हे या श्लोकातील साध्य (म्हणजे सिद्ध करावयाचा मुद्दा) असून, शूर, विद्वान व स्वामिनिष्ठ सेवक पृथ्वीवर सोन्याची फुले वेचतात हा बाधित होणारा वाच्यार्थ श्लोकातील साध्य गोष्ट सिद्ध करण्याचे साधन आहे. प्रयोजनमूलक, लक्षणेच्या प्रत्येक उदाहरणामध्ये त्या लक्षणेचे प्रयोजन अनुमानानेच वाचकांच्या

---

११) व्य. वि. ३, पृ. ४७३–४७७.

ध्यानात येते हा मुद्दा महिमभट्टाने प्रथम विमर्श, पृ. ११८ व ११९ येथे यापूर्वीच स्पष्ट केला आहे. प्रयोजनमूलक लक्षणेतील प्रयोजन अनुमानाने ज्ञात होते एवढेच नसून कोणत्याही लक्षणेतील तथाकथित लक्ष्य अर्थसुद्धा अनुमानानेच ज्ञात होतो हे मत महिमभट्टाने प्रथम विमर्शात लक्षणावृत्तीचे खंडन करताना प्रगट केले आहे.१२ कोणत्याही लक्षणेमध्ये बाधित होणारा वाच्यार्थ हा अनुमानाचे साधन असतो व वाच्यार्थ बाधित झाल्यामुळे स्वीकारला जाणारा दुसरा (म्हणजे लक्ष्य) अर्थ हा अनुमानाचे साध्य असतो अशी महिमभट्टाची विचारसरणी आहे.

ध्वन्यालोकाच्या प्रथम उद्योतामध्ये उद्धृत केलेल्या अर्थशक्तिमूल वस्तुध्वनीच्या अनेक उदाहरणांच्या बाबतीत त्या उदाहरणांतील तथाकथित व्यङ्ग्य वस्तुरूप अर्थ अनुमानानेच वाचकांच्या ध्यानात येतो (व्यंजनेने नाही) हे महिमभट्टाने तृतीय विमर्शामध्ये स्पष्ट केले आहे. या उदाहरणांपैकी 'भ्रम धार्मिक विश्रब्धः' इत्यादी उदाहरणाच्या बाबतीत महिमभट्टाने अनुमानाचा प्रयोग पुढीलप्रमाणे केला आहे. त्यावरून अर्थशक्तिमूल वस्तुध्वनीच्या इतर उदाहरणांच्या बाबतीत केलेल्या अनुमानाच्या प्रयोगाची कल्पना करता येईल.

एक तरुणी आपल्या प्रियकराला भेटण्यासाठी गोदावरी नदीच्या तीरावर नेहमी येत असे. देवाच्या पूजेकरिता फुले तोडण्यासाठी त्या तीरावर एक धार्मिक वृत्तीचा मनुष्यही रोज येत असे व त्यामुळे त्या तरुणीच्या व तिच्या प्रियकराच्या एकान्तामध्ये विघ्न उत्पन्न होत असे. नदीच्या तीरावर संचार करत असताना तेथे भटकण्याची सवय असलेल्या एका कुत्र्याची भीती त्या मनुष्याला वाटते, हे त्या तरुणीला माहीत होते. त्या मनुष्याने नदीच्या तीरावर येऊ नये असे त्या तरुणीला वाटे. परंतु "तू येथे येत जाऊ नकोस" असे त्याला स्पष्टपणे न सांगता, ती तरुणी त्याला म्हणाली, "हे धार्मिका, आतापर्यंत ज्या कुत्र्याचे भय तुला वाटत होते, त्या कुत्र्याला गोदावरी नदीच्या तीरावरील घनदाट जाळीमध्ये राहणाऱ्या एका भयंकर, क्रूर सिंहाने नुकतेच ठार मारले

१२) पहा : वर पृ. ३६-३७.

आहे. तेव्हां आता तू येथे निर्धास्तपणे हिंडू फिरू शकशील." हा या पद्याचा वाच्यार्थ असून तो विधिरूप (म्हणजे भावरूप) आहे. परंतु याच पद्यातून दुसरा असा अर्थ प्रगट होतो की, "हे धार्मिका, तू येथे येत जाऊ नकोस. कारण तू पूर्वी ज्या कुत्र्याला भीत होतास तो कुत्रा जरी आता मरण पावला आहे, तरी त्या कुत्र्याला मारणारा एक भयंकर सिंह आता स्वैरपणे येथे संचार करीत असल्याने तुझ्या जीविताला पूर्वीपेक्षा अधिक मोठा धोका उत्पन्न झाला आहे." हा दुसरा अर्थ निषेधरूप (म्हणजे अभावरूप) आहे. आनन्दवर्धनाच्या मते हा निषेधरूप दुसरा अर्थ विधिरूप पहिल्या अर्थातून व्यञ्जनेमुळे प्रगट होतो, म्हणून हे अर्थशक्तिमूल वस्तुध्वनीचे उदाहरण आहे. परंतु महिमभट्टाच्या मते या पद्यातून प्रतीत होणारा निषेधरूप दुसरा अर्थ (अर्थान्तर) हा साध्य किंवा अनुमेय असून, विधिरूप पहिला अर्थ (वाच्यार्थ) हा त्या दुसऱ्या अर्थाचे ज्ञान होण्याचे साधन आहे. भारतीय तर्कशास्त्राला अनुसरून प्रस्तुत पद्यातील अनुमानाचा आकृतिबंध पुढीलप्रमाणे होईल :–

(१) धार्मिकाने गोदावरीतीरावर संचार करू नये (साध्याची प्रतिज्ञा).

(२) कारण गोदावरीतीरावर एक भयंकर, क्रूर सिंह स्वैरपणे संचार करीत आहे (साधन किंवा हेतु).

(३) जेथे जेथे सिंहासारखा क्रूर रानटी पशू स्वैर संचार करतो, तेथे तेथे धार्मिकासारख्या सत्त्वशील मनुष्याने संचार न करणे बरे (व्याप्ति).

(४) गोदावरीतीरावर सध्या एक सिंह स्वैर संचार करत आहे (उपनय).

(५) म्हणून धार्मिकाने गोदावरीतीरावर हिंडू नये (निगमन किंवा निष्कर्ष).

प्रस्तुत पद्यातील भ्रमणविधी हा वाच्यार्थसुद्धा अनुमानाने सिद्ध होणारा आहे. या अनुमानाचा तर्कशास्त्रीय आकृतिबंध पुढे दाखविल्याप्रमाणे होईल :–

(१) धार्मिकाने गोदावरीतीरावर निर्भयपणे संचार करावा (साध्याची प्रतिज्ञा).

(२) कारण ज्या कुत्र्याचे भय धार्मिकाला वाटत असे तो कुत्रा आता (सिंहामुळे) मृत झाला आहे (साधन किंवा हेतु).

(३) जेथे जेथे भयाचे कारण नाहीसे झालेले असते तेथे तेथे निर्भयपणे संचार करणे शक्य असते (व्याप्ति).

(४) गोदावरीतीरावरील कुत्रा हे भीतीचे कारण नाहीसे झाले आहे (उपनय).

(५) म्हणून गोदावरीतीरावर धार्मिकाने आता निर्भय संचार करावा (निगमन किंवा निष्कर्ष).

वाक्याच्या वाच्यार्थाच्या पातळीवर अनुमानप्रक्रिया नेहमीच चालू असते, हे ध्वनिवाद्यांना सुद्धा मान्य आहे, यात शंका नाही. वाक्यातून जो दुसरा (अर्थान्तर) प्रतीत होतो तो मात्र व्यञ्जनावृत्तीमुळे प्रगट होतो असा ध्वनिवाद्यांचा सिद्धान्त आहे, तर वाच्यार्थानंतर प्रतीत होणारा दुसरा अर्थ हा वाच्यार्थरूप साधनामुळे अनुमानाने ज्ञात होतो असा नैयायिकांचा व महिमभट्टाचा सिद्धान्त आहे.

**(इ) अलंकारध्वनि :** ध्वन्यालोकामध्ये उद्धृत केलेल्या अलंकारध्वनींच्या उदाहरणांपैकी १४ उदाहरणांचे परीक्षण महिमभट्टाने तृतीय विमर्शात करून त्यांमधील ९ उदाहरणात तथाकथित व्यंग्य अलंकार हा अनुमानानेच ज्ञात होतो व्यंजनेने नाही हे स्पष्ट केले आहे. ध्वन्यालोकातून उद्धृत केलेल्या १४ अलंकारध्वनींच्या उदाहरणांपैकी ५ उदाहरणे [ (१) पृ. ४७८ : उन्नतः प्रोल्लसद्धारः इ०, (२) पृ. ४७८ : दत्तानन्दाः प्रजानाम् इ०, (३) पृ. ४९५ : दैवायत्ते फले इ०, (४) रम्या इति प्राप्त इ०, (५) पृ. ५०६ : प्रवृत्तेऽस्मिन् महाप्रलये इ० ] शब्दशक्तिमूल अलंकारध्वनींची आहेत. शब्दशक्तिमूलध्वनि असूच शकत नाही अशी महिमभट्टाची भूमिका असल्यामुळे[१३] क्रमांक १, २, ४ व ५ या चार उदाहरणांमध्ये शब्दश्लेषाने कोणताही अलंकार प्रतीत होत नसल्याने,[१४] तो व्यंजनेने किंवा अनुमानाने ज्ञात होण्याचा प्रश्नच उत्पन्न होत

---

१३) पहा : विमर्श १, पृ. १७८; विमर्श २, पृ. ४२२, ४६२; विमर्श ३, पृ. ४७९ ४८४.

१४) आनन्दवर्धनाच्या मते क्रमांक १ व २ येथे उपमालंकारध्वनि, क्रमांक ३ मध्ये अर्थान्तरन्यासध्वनि, क्रमांक ४ मध्ये श्लेषालंकारध्वनि व क्रमांक ५ मध्ये रूपकध्वनि आहे.

नाही. क्रमांक ३ या उदाहरणामध्ये फल या द्व्यर्थी शब्दाच्या प्रयोगामुळे जो अर्थान्तरन्यास अलंकार प्रतीत होत आहे तो अनुमानाने प्रतीत होतो, व्यंजनेमुळे नाही हे महिमभट्टाने स्पष्ट केले आहे.[१५]

अर्थशक्तिमूलध्वनीच्या उदाहरणांपैकी 'वीराणां रमते' इ. (पृ. ४९३) उदाहरणातील तथाकथित व्यङ्ग्य उपमालंकाराचे ज्ञान वाचकांना व्यंजनेमुळे होत नसून अनुमानाने होते, हे महिमभट्टाने पुढीलप्रमाणे दाखविले आहे. आनन्दवर्धनाच्या मते, ज्यांना केशराची उटी लावलेली आहे असे प्रिय पत्नीचे स्तन व द्वार शेंदूराने रंगविलेली हत्तींची गंडस्थळे यांमधील आकारसादृश्य व वर्णसादृश्य प्रस्तुत पद्यामध्ये इव, तुल्य इत्यादी औपम्यवाचक शब्द न वापरता व्यंजनेने प्रतिपादिले आहे. परंतु महिमभट्टाच्या मते स्वाभाविक गोल आकार व केशरी वर्ण या दोन हेतूंमुळे स्तन व गंडस्थळे यांमधील सादृश्य येथे अनुमानाने ज्ञात होत आहे. कारण जेथे जेथे दोन वस्तूंमध्ये साधारण धर्माची प्रतीती होते, तेथे तेथे त्या दोन वस्तूंमध्ये सादृश्य असते. प्रस्तुत पद्यात स्तन व गंडस्थळे यांमध्ये गोल आकार व केशरी वर्ण या साधारण धर्माची प्रतीती होत असल्याने त्या दोहोंमधील सादृश्याचे ज्ञान अनुमानाने होते असेच म्हटले पाहिजे.[१६]

---

१५) व्य. वि. पृ. ४९५ : देव्वाअत्तम्मि फले (दैवायत्ते फले) इत्यत्र अर्थान्तरोपन्यास-सामर्थ्यादेव वस्तुनोः समर्थ्यसमर्थकभावावसायो न शब्दशक्तिमूल इति तदर्थस्य (= समर्थ्यसमर्थकभावार्थकस्य) हिशब्दादेरप्रयोगो गतार्थत्वात् । महिमभट्टाच्या मते अर्थान्तरन्यास हा अलंकार जरी अनुमानाने ज्ञात होत असला, तरी ज्याचे समर्थन करावयाचे तो विशेषरूप अर्थ व ज्या अर्थाच्या योगाने समर्थन करावयाचे तो सामान्यरूप अर्थ, हे दोन अर्थ फल या शब्दावरील श्लेषामुळे अभिधेने ज्ञात होतात व श्लेषाच्या अस्तित्वाचे ज्ञान अर्थान्तरन्यास या अलंकारामुळे होते. सामान्यरूप समर्थक अर्थ हा विशेषरूप समर्थ्य अर्थाप्रमाणेच शब्द वाच्य असल्यामुळे, तो व्यङ्ग्य नाही व अर्थान्तरन्यास हा अलंकारही व्यङ्ग्य नाही, तर समर्थक अर्थ व समर्थ्य अर्थ यांच्या श्लेषजन्य सान्निध्यामुळे अनुमेय आहे.

१६) अनुमानाचा आकृतिबंध असा : यत्र यत्र द्वयोः वस्तुनोः साधारणधर्मस्य प्रतीतिः भवति, तत्र तत्र औपम्यवाचक-इवादिशब्दाभावेऽपि तयोः सादृश्यं भवति । प्रस्तुते पद्ये स्तनगण्डस्थलानां परिमण्डलाकार-आरक्तवर्णरूपस्य साधारणधर्मस्य प्रतीतिः अस्ति । तस्मात् स्तनगण्डस्थलानां सादृश्यम् अस्ति ।

याच पद्धतीने ध्वन्यालोकातील आक्षेप, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, उत्प्रेक्षा व यथासंख्य या अलंकारांची अर्थशक्तिमूलध्वनीची उदाहरणे महिमभट्टाने अनुमानाच्या साच्यामध्ये बसवून दाखविली आहेत.

ध्वन्यालोक ३, २ येथे रसरूप व्यंग्य अर्थ हा वर्ण, पद, वाक्य, संघटना (शैली) व प्रबन्ध (संपूर्ण ग्रंथ) यांच्या द्वारा प्रगट होतो, म्हणजे वर्ण, पद, वाक्य, संघटना व प्रबन्ध हे रसाचे व्यंजक असतात असे म्हटले आहे. वर्ण व संघटना रसाचे व्यंजक असतात या म्हणण्याचा अर्थ असा की वर्ण व संघटना हे ज्या पदांचे उपाधि (धर्म) असतात त्या पदांचा वाच्यार्थ रसव्यंजक असतो. पद, वाक्य व प्रबन्ध रसव्यंजक असतात या म्हणण्याचा अर्थ असा की पद, वाक्य व प्रबन्ध यांचा वाच्यार्थ रसव्यंजक असतो. वर्ण व संघटना यांचे व्यंजकत्व पदद्वारक (म्हणजे व्यवधानाने किंवा दूरान्वयाने) असते, तर पद, वाक्य व प्रबन्ध यांचे व्यंजकत्व साक्षात् (म्हणजे अव्यवधानाने) असते. असे असले तरी हे सर्व व्यंजक प्रथम वाच्यार्थ प्रगट करून त्या वाच्यार्थाच्या द्वारा रत्यादिरूप व्यंग्य अर्थ प्रगट करतात. वर्ण, पद, वाक्य इत्यादिकांमुळे प्रगट होणारा वाच्यार्थ हा आनंदवर्धनाच्या मते व्यंजक (गमक) असतो, तर रत्यादि भावनात्मक आशय हा व्यंग्य (गम्य) असतो. परंतु महिमभट्टाच्या मते वाच्यार्थ व रत्यादि ' व्यंग्य ' अर्थ यांच्यामधील गम्यगमकसंबंध हा व्यंग्य--व्यंजकसंबंध नसून अनुमेय-अनुमापकसंबंध (म्हणजे साध्यसाधनसंबंध किंवा लिङ्गिलिङ्गसंबंध) आहे.१७

तृतीय विमर्शामध्ये पृ. ५०१ ते ५०९ येथे महिमभट्टाने ध्वन्यालोकातील वस्तुध्वनीची व रसध्वनीची सुमारे वीस उदाहरणे उद्धृत करून त्यातील वाच्यार्थ व तथाकथित व्यंग्यार्थ यांमधील गम्यगमकसंबंध हा व्यंग्यव्यंजकसंबंध

---

१७) व्य. वि. पृ. ५०० : तथाविध (म्हणजे वर्ण, पद, वाक्य व संघटना यांनी युक्त) शब्दसंदर्भाभिहितस्य अर्थस्य, रत्यादेश्च भावस्य तार्णपार्णयोरिव धूमाग्न्योः कार्य-कारणभावेन (= लिङ्गिलिङ्गभावेन अवस्थानात् ।
संघटनावर्णाहितविशेषवाचकसमर्पितादर्थात् ।
क्रोधादिविशेषगतिः धूमविशेषादिव कृशानोः ॥).

या स्वरूपाचा नसून अनुमेयअनुमापकसंबंध या स्वरूपाचा असल्याने ती सर्व उदाहरणे व्यंजनेची उदाहरणे नाहीत तर काव्यानुमितीची उदाहरणे आहेत हे स्पष्ट केले आहे.

विमर्श तीन, पृ. ५१० येथे संस्कृत भाषेमध्ये वापरले जाणारे निपात (म्हणजे उपसर्ग व इतर निपात संज्ञक अव्यये) हे आपापल्या अर्थाचे वाचक नसून द्योतक (म्हणजे व्यंजक) असतात या वैयाकरणांच्या व ध्वनिवाद्यांच्या मताचे खंडन महिमभट्टाने केले आहे. वैयाकरण व ध्वनिवादी यांच्या मते निपात हे विशिष्ट अर्थाचे व्यंजक असतात.[१८] हे मत यापूर्वी विमर्श १, पृ. १५०-१५१ येथे पूर्वपक्ष या रूपात प्रतिपादिले असून, पृ. १५१–१५६ येथे महिमभट्टाने त्याचे खंडन केले आहे, व संग्रहश्लोक १.७४–१.९५ मध्ये या चर्चेचा सारांश दिला आहे. महिमभट्टाच्या मते निपातांच्या ठिकाणी खऱ्या अर्थाने व्यंजकत्व असू शकत नाही. कारण घटप्रदीपदृष्टान्तानुसार व्यंग्य पदार्थ हा घटाप्रमाणे मूर्त स्वरूपाने अस्तित्वात असला पाहिजे. परंतु निपातांचे अर्थ विचार या अमूर्त स्वरूपानेच अस्तित्वात असतात, म्हणून त्यांचे व्यंजकत्व पारमार्थिक (खरोखरीचे) नसून औपचारिक आहे.[१९] वाक्यामध्ये निपातांचा ज्या शब्दांशी संबंध असतो त्या शब्दांच्या वाच्यार्थाचे वैशिष्टय दाखविणे हे त्यांचे कार्य असते. आता वाक्यातील शब्दांच्या वाच्यार्थाच्या ठिकाणी व्यंजकत्व नसून अनुमापकत्व असते हे प्रथम विमर्शामध्ये दाखविले असल्यामुळे त्या शब्दांच्या वाच्यार्थांचे उपाधि (धर्म) दाखविणाऱ्या निपातांच्या ठिकाणी सुद्धा व्यंजकत्व नसून अनुमापकत्व असते हे सिद्ध होते. निपातांच्या ठिकाणी त्यांच्याशी संबद्ध असलेल्या शब्दांच्या वाच्यार्थाच्या वैशिष्टयाचा बोध करून देण्याचे सामर्थ्य (गमकत्व) असले तरी त्या सामर्थ्याचे स्वरूप व्यंजकत्व हे नसून अनुमापकत्व हे आहे.[२०]

---

१८) पहा : प्रा. का. वा. अभ्यंकर, Dictionary of Sanskrit Grammar पृ. १८८, द्योतक या शब्दावरील नोंद. तसेच ध्वन्यालोक ३ · १६ : सुप्तिङ्वचनसंबन्धैस्तथा कारकशक्तिभिः । निपातैः सोपसर्गैश्च द्योत्योऽलक्ष्यक्रमः क्वचित् ॥

१९) व्य. वि. १, पृ. ८१, १५०, १५७ (संग्रहश्लोक १·७५).

२०) व्य. वि. ३, पृ. ५१०.

तृतीय विमर्श पृ. ४८० ते ४८८ येथे व्याकरणशास्त्रानुसार आणि साहित्यशास्त्रानुसार कोणत्या शब्दांना शुद्ध (साधु) शब्द म्हणावे व कोणत्या शब्दांना अशुद्ध (असाधु) शब्द म्हणावे यासंबंधी महिमभट्टाने चर्चा केली आहे. ज्या शब्दांची रूपे व्याकरणशास्त्राच्या नियमानुसार असतात, ते शब्द शुद्ध (किंवा साधु) शब्द होत व ज्या शब्दांची रूपे व्याकरणशास्त्राच्या नियमांच्या विरुद्ध असतात ते शब्द वैयाकरणांच्या मते अशुद्ध (असाधु किंवा दुष्ट) शब्द, किंवा अपशब्द होत. उदाहरणार्थ गो (गाय) या शुद्ध शब्दाबद्दल वापरले जाणारे गावी, गोणी, गोता व गोपोतलिका हे शब्द, किंवा अश्व (घोडा) या शुद्ध शब्दाबद्दल वापरण्यात येणारा अस्व हा शब्द, किंवा हरेः (हरीचा) या शुद्ध रूपाबद्दल वापरलेले हरिस्य हे रूप– ही सर्व अशुद्ध शब्दांची उदाहरणे होत. वैयाकरणांच्या मते साधु शब्द असाधु शब्द हे जरी सारखेच अर्थवाचक असले, तरी साधु शब्द जाणत्या श्रोत्याने ऐकल्याबरोबर त्याचा अर्थ अविलंबाने श्रोत्याच्या ध्यानात येतो. पण असाधु शब्द ऐकल्यानंतर काही वेळाने त्याचा अर्थ अनुमानाने श्रोत्याला समजतो. दुसरे असे की साधु शब्दाचा वापर हा पुण्यदायक व असाधु शब्दाचा वापर हा पापदायक असतो. म्हणून विलंबाने अर्थबोध होणे व पापास कारणीभूत असणे या दोन दोषांमुळे सूज्ञ मनुष्याने असाधु शब्द न वापरता साधु शब्दच वापरावेत असा वैयाकरणांचा आग्रह आहे. एखाद्या मनुष्याने साधु शब्दाबरोबर अनवधानाने जर काही असाधु शब्द वापरले, तर असाधु शब्द वापरल्यामुळे त्याला लागणारे पाप साधु शब्दांच्या वापराने उत्पन्न होणाऱ्या पुण्यामुळे नाहीसे होते, असा दिलासा वैयाकरणांनी कूपखानकन्यायाचा[२१] अवलंब करून दिला आहे. परंतु साहित्यशास्त्राच्या दृष्टीने जो शब्द व्याकरणशास्त्राच्या नियमांना अनुसरणारा असून कवीला अभिप्रेत असलेला अर्थ बिनचूकपणे प्रगट करू शकतो तो साधु शब्द होय व

२१) विहीर खणली जात असताना तिला पाणी लागले म्हणजे खणणाऱ्या मनुष्याचे पाय चिखलाने अस्वच्छ होतात. परंतु विहिरीला लागलेले पाणी वापरून तो आपले पाय स्वच्छ करतो, असा कूपखानकन्यायाचा आशय आहे. पहा : अष्टाध्यायी १·१·१ वरील क्रमांक ९ या वार्तिकाचे पतञ्जलीच्या महाभाष्यातील विवेचन.

जो शब्द व्याकरणनियमानुसार असून मुद्धा कवीला अभिप्रेत असलेला आशय अचूकपणे प्रगट करू शकत नाही तो असाधु शब्द (म्हणजे अपशब्द) होय.२२ साहित्यशास्त्रदृष्ट्या अपशब्दाचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने शिशुपालवध ६.९ हा श्लोक उद्धृत केला आहे. त्या श्लोकामध्ये पथिकाः या कर्तृपदाचे विशेषण म्हणून वापरलेले रजिताः हे रूप व्याकरणातील धातुरूपसाधनेच्या दृष्टीने शुद्ध असले तरी ते वृत्ताच्या सोयीसाठी रञ्जिताः या रूपाऐवजी वापरले आहे व ते कवीला अभिप्रेत असलेला अर्थ यथातथ्याने प्रगट करत नसल्याने ते रूप साहित्यशास्त्राच्या दृष्टीने अपशब्द ठरते.२३

ही सर्व विषयान्तरासारखी वाटणारी चर्चा करण्याचे खरे कारण असे : ध्वन्यालोक उद्योत २, पृ. २४४ येथे शब्दशक्तिमूल उपमालंकारध्वनीचे उदाहरण म्हणून जो 'दत्तानन्दाः प्रजानाम्' इत्यादी मयूरकविकृत सूर्यशतकातील श्लोक उद्धृत केला आहे, त्यामधील कर्तृवाचक गावः (=किरण) या शब्दाचा गाई हा जो दुसरा अर्थ कवीला अभिप्रेत आहे तो दुसरा अर्थ

---

२२) व्य. वि. १, पृ. ४८१ : अस्मान् प्रति पुनर् अविषये प्रयुज्यमानः शब्दः अपशब्दः एव ।

२३) अष्टाध्यायी ६.४.२१ (वा चित्तविरागे) या सूत्रावरील 'रञ्जेर्णौ मृगरमणे नलोपो वक्तव्यः' या वार्तिकानुसार रञ्ज् या धातूपासून प्रयोजक भूतकालवाचक कर्मणि धातुसाधित विशेषणाचे रजिताः असे रूप हरिणांच्या शिकारीच्या संदर्भात होते. परंतु प्रस्तुत श्लोकातील वर्ण्य विषय जे पथिक त्यांच्या संदर्भात रञ्जिताः हेच रूप योग्य होय. परंतु येथे द्रुतविलम्बित या अक्षरवृत्ताशी रञ्जिताः हे रूप जुळत नसल्याने कवीने रजिताः हे रूप वापरले आहे व म्हणून ते अपशब्द होय असे महिमभट्टाचे मत आहे. कवीच्या अभिप्रायानुसार रञ्जिताः हे रूप पथिकांचे विशेषण म्हणून वापरणे इष्ट असून सुद्धा रजिताः हे रूप वापरल्यामुळे येथे वाच्यावचन व अवाच्यवचन हे दोन दोष उत्पन्न झाले आहेत हे वाचकांच्या लक्षात येईलच. परंतु शिशुपालवध या महाकाव्यावरील मल्लिनाथ या टीकाकारने 'इह उपमानसादृश्याद् औपचारिकं मृगत्वम् उपमेयेषु पथिकेषु अस्ति इति अविरोधः' असे म्हणून रजिताः या रूपाचे समर्थन केले आहे. वार्तिकातील मृगरमण या शब्दाचा हरिणांची शिकार असा अर्थ आहे.

प्रगट करण्याचे सामर्थ्य गावः या शब्दाच्या ठिकाणी नाही. कारण या श्लोकातील गावः हा शब्द जरी दोन अर्थांचा प्रतिपादक म्हणून कवीला अभिप्रेत आहे, तरी त्या शब्दाच्या द्व्यर्थप्रतिपादकत्वाचे ज्ञापक असे कोणतेही गमक चिन्ह कवीने प्रस्तुत श्लोकात समाविष्ट केलेले नाही. त्यामुळे गावः या शब्दाचे द्व्यर्थप्रतिपादकत्व वाचकांच्या ध्यानात येऊ शकत नाही. द्व्यर्थप्रतिपादकत्वाच्या (म्हणजे श्लेषाच्या) अस्तित्वाच्या ज्ञापक चिन्हाचा श्लोकात समावेश करणे अवश्य असूनही त्याचा समावेश न केल्यामुळे येथे वाच्यावचन हा दोष उत्पन्न झाला आहे.[२४] त्यामुळे गावः या शब्दाचा गाई हा अर्थ वाचकांच्या ध्यानात येतच नाही, म्हणून तो अर्थ तथाकथित व्यंजनेमुळे वाचकांच्या ध्यानात येण्याचा व उपमालंकाराच्या व्यंजनेचा प्रश्नच उपस्थित होत नाही. अतएव प्रस्तुत पद्य महिमभट्टाच्या मते शब्दशक्तिमूल उपमालंकारध्वनीचे उदाहरण होऊ शकत नाही. आणखी असे की सैद्धान्तिक दृष्टया महिमभट्टाच्या मते शब्दशक्तिमूल वस्तुध्वनि किंवा शब्दशक्तिमूल अलंकारध्वनि असूच शकत नाही. कारण शब्दांच्या ठिकाणी केवळ वाचकत्व हे एकच सामर्थ्य असू शकते. त्यांच्या ठिकाणी व्यंजकत्व सामर्थ्य कदापि नसते. हा मुद्दा महिमभट्टाने विमर्श १, पृ. १६, २६, १११ व १७८, विमर्श २, पृ. ४६२ व विमर्श ३, पृ. ४७१, ४८४ येथे आग्रहाने प्रतिपादिला आहे.

---

२४) प्रस्तुत श्लोकाच्या चौथ्या ओळीमध्ये जर 'गावो वो धेनुतुल्याः सपदि शुचितमाः प्रीतिमुत्पादयन्तु' अशी शब्दयोजना सूर्यशतकाच्या मयूर या लेखकाने केली असती, तर धेनुतुल्याः या उपमाबोधक शब्दामुळे पहिल्या तीन ओळीतील प्रजानाम्, पयोभिः व संहारभाजः इत्यादी शब्दांच्या द्व्यर्थबोधकत्वाची ओळख वाचकांना पडली असती व प्रस्तुत श्लोकात श्लेष हा अलंकार सिद्ध झाला असता. श्लोकाच्या सध्याच्या स्वरूपात तो महिमभट्टाच्या मते श्लेष अलंकाराचे सदोष उदाहरण व त्यामध्ये वाच्यावचन हा दोष असून गावः हा शब्द कवीला अभिप्रेत असलेला गाई हा दुसरा अर्थ प्रगट करण्यास असमर्थ असल्याने तो 'अपशब्द' आहे.

५

# उपसंहार

व्यक्तिविवेकात ध्वनिसिद्धान्ताशी जवळून किंवा दूरान्वयाने संबद्ध असणाऱ्या ज्या अनेक विषयांचा महिमभट्टाने विचार केला आहे, त्यांपैकी महत्त्वाच्या व वाचकांना उद्बोधक वाटू शकतील अशा काही विचारांना स्पर्श करून ग्रंथातील प्रतिपादनाचा सारांश प्रस्तुत परिचयग्रंथामध्ये वाचकांच्या पुढे ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. व्यक्तिविवेक या ग्रंथात या व्यतिरिक्त अशा अनेक विषयांची चर्चा केली आहे की परिचयग्रंथाच्या पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे त्या विषयांचा परामर्श घेता आला नाही याची लेखकाला जाणीव आहे. परंतु महिमभट्टाच्या विचारसरणीचा स्थूलमानाने वाचकांना परिचय करून देण्याच्या दृष्टीने व मूळ ग्रंथ वाचून पाहण्याचे कुतूहल वाचकांच्या ठिकाणी जागृत करण्याच्या दृष्टीने प्रस्तुत परिचयग्रंथातील विवेचन उपयुक्त ठरेल अशी अपेक्षा आहे.

व्यक्तिविवेक या ग्रंथातील प्रतिपादनाचा मुख्य उद्देश ध्वनिमताचे सैद्धान्तिक व प्रायोगिक दृष्टीनी खंडन करणे हा आहे. वक्ता जेव्हा एखादे वाक्य उच्चारतो तेव्हा त्या वाक्यामुळे श्रोत्याला ज्या निरनिराळ्या अर्थांचा बोध होतो, त्या अर्थांपैकी प्रत्येक अर्थाचे ज्ञान श्रोत्याला होण्यासाठी शब्दांच्या ठिकाणी निरनिराळ्या शक्तींचे (व्यापारांचे किंवा सामर्थ्यांचे) अस्तित्व मानावयाचे, का एकाच व्यापक शब्दसामर्थ्यामुळे त्या सर्व अर्थांचे ज्ञान होते

असे मानावयाचे असा एक मूलभूत प्रश्न उत्पन्न होतो. ध्वनिवादी विद्वानांच्या मते शब्दांमुळे जे निरनिराळे अर्थ ध्यानात येतात त्यांचे ज्ञान होण्यासाठी अभिधा, तात्पर्य, लक्षणा व व्यञ्जना या चार शब्दशक्ती मानणे आवश्यक आहे. मीमांसकांच्या मते अभिधा (वाचकत्व) या एकाच शब्दशक्तीमुळे सर्व अर्थांचा बोध होतो. आपल्या मताच्या समर्थनासाठी मीमांसक 'यत्परः शब्दः स शब्दार्थः' व 'इषोरिव दीर्घदीर्घः व्यापारः शब्दस्य' या दोन न्यायांचा आधार घेतात. शब्दांच्या अभिधा या एकाच शक्तीने वाच्यार्थ, तात्पर्यार्थ, लक्ष्यार्थ व व्यङ्ग्यार्थ श्रोत्यांच्या ध्यानात येतात. चार निरनिराळे अर्थ ध्यानात येण्यासाठी चार निरनिराळ्या शब्दशक्ती मानण्यामध्ये कल्पनागौरव हा दोष आहे, तर एकाच अभिधाशक्तीने सर्व अर्थ ध्यानात येतात असे मानण्यामध्ये कल्पनालाघव हा गुण आहे. शास्त्रीय विचारप्रक्रियेमध्ये कल्पनागौरवयुक्त उपपत्तीपेक्षा कल्पनालाघवयुक्त उपपत्ती ग्राह्य मानली जाते हे प्रसिद्ध आहे. महिमभट्टाने अभिधा ही एकमेव शब्दशक्ती व अनुमापकत्व (किंवा अनुमान) ही एकमेव अर्थशक्ती मानली आहे. बौद्धिक प्रक्रियेच्या आधाराने जेथे भाषिक व्यवहारातील एखाद्या घटनेची उपपत्ती सांगता येते, तेथे शब्दशक्तीच्या आधारे त्या घटनेची उपपत्ती सांगू नये असा एक दंडक आहे.[१] तात्पर्य, लक्षणा व व्यञ्जना या ध्वनिवादी विद्वानांनी व आलंकारिकांनी मानलेल्या शब्दशक्ती आहेत, तर अनुमान ही एक बौद्धिक प्रक्रिया किंवा मानस व्यापार आहे. तथाकथित लक्ष्यार्थ, तात्पर्यार्थ व व्यङ्ग्यार्थ यांच्या बाबतीत शब्दशक्तींवर आधारलेल्या उपपत्तीपेक्षा बौद्धिक प्रक्रियेवर आधारलेली उपपत्ती लाघवगुणामुळे महिमभट्टाच्या मते ग्राह्य ठरते. महिमभट्टाने अभिधा ही एकमेव शब्दशक्ती स्वीकारली आहे व इतर विचारवंतांनी मानलेल्या लक्षणा, तात्पर्य आणि व्यञ्जना या तीन शब्दशक्तींचा अन्तर्भाव त्याने अनुमानामध्ये केला आहे. अनुमान या बौद्धिक प्रक्रियेचा साग्रह पुरस्कार करणाऱ्या महिमभट्टाने अभिधा ही शब्दशक्ती का मानावी व तिचा अन्तर्भाव अनुमानामध्ये का करू नये असा

१) पहा : मम्मट, काव्यप्रकाश, उल्लास २, पृ. ४४ (भांडारकर प्राच्य संशोधनमंदिर संस्करण) येथे बालबोधिनी टीकेमध्ये उद्धृत केलेला 'अनन्यलभ्यः शब्दार्थः' हा न्याय.

प्रश्न उत्पन्न होतो. त्याचे उत्तर असे की इतर सर्व विचारवंतांनी अभिधा ही स्वतंत्र शब्दशक्ती निरपवादपणे मानलेली असल्यामुळे, तिच्या स्वतंत्र अस्तित्वाला मान्यता देणे महिमभट्टाला अपरिहार्य वाटले असावे. परंतु व्यक्तिविवेकामध्ये एका ठिकाणी२ त्याने असे म्हटले आहे की गो वगैरे शब्द वक्त्याने उच्चारल्यानंतर गाय वगैरे वाच्यार्थ श्रोत्याच्या ध्यानात येण्याची प्रक्रिया अनुमानाच्या प्रक्रियेहून निराळी नाही. यावरून हे स्पष्ट होते की अभिधेचा सुद्धा अन्तर्भाव अनुमानामध्ये करण्याकडे महिमभट्टाचा कल दिसतो.

विमर्श १, पृ. ८०–८२ येथे महिमभट्टाने व्यञ्जनावृत्तीचे जे सैद्धान्तिक दृष्टीने खंडन केले आहे, त्यामध्ये पुढील दोष आढळतात :

(१) अभिव्यक्तीचे सामान्य लक्षण सांगताना अभिव्यक्तीमध्ये प्रकाश्य वस्तू व प्रकाशक वस्तू या दोहोंचे ज्ञान एकाच वेळी झाले पाहिजे असे पृ. ८० वर महिमभट्टाने म्हटले आहे. हा नियम प्रदीपामुळे होणाऱ्या घटाच्या अभिव्यक्तीच्या बाबतीत लागू पडतो असा महिमभट्टाचा अभिप्राय दिसतो. प्रकाश हा स्वतः अदृश्य असतो. पण तो कोणत्यातरी मूर्त पदार्थावर पडला की प्रकाशाच्या अस्तित्वाची जाणीव त्या मूर्त पदार्थाच्या जाणीवेबरोबरच होते. अशा प्रकारे प्रकाशक दीपप्रकाश व प्रकाश्य वस्तू या दोहोंची जाणीव एकाच वेळी होते असे म्हणणे बरोबर असू शकेल. पण या घटनेकडे पाहण्याची दुसरी एक दृष्टी आहे, ती अशी : अंधाऱ्या खोलीत दिवा प्रगट झाला की प्रथम दिव्यापासून निघणारे प्रकाशकिरण घटासारख्या मूर्त वस्तूवर पडतात व त्या वस्तूच्या पृष्ठभागावरून परावर्तित होऊन द्रष्ट्याच्या नेत्रपटलावर पडतात आणि मग प्रकाश व प्रकाश्य वस्तू यांची जाणीव एकाच वेळी होते हे जरी खरे असले, तरी दिव्यापासून प्रकाशकिरण निघून प्रकाश्य वस्तूवर जाऊन

---

२) विमर्श १, पृ. ८१ : 'गाम् आनय' (गाय आण) असे वाक्य अ ने ब ला उद्देशून म्हटले असताना ज्या अर्थी ब एक विशिष्ट पशु आणतो त्या अर्थी गो या शब्दाचा विशिष्ट पशु असा अर्थ असला पाहिजे ही गोष्ट क या तटस्थ मनुष्याच्या ध्यानात येते, ती अनुमानानेच होय अशी महिमभट्टाच्या विचारसरणीमागील भूमिका आहे.

पडण्यास व तेथून परावर्तन पावून द्रष्टयाच्या नेत्रपटलावर येऊन पडण्यास (अत्यंत अल्प असला तरी) थोडासा वेळ लागतो यात शंका नाही. या दृष्टीने पहाता प्रदीपज्ञान व प्रकाश्य वस्तूचे ज्ञान ही दोन ज्ञाने एकाच वेळी होत नसून सूक्ष्म कालभेदाने होतात हे स्पष्ट आहे. ही वस्तुस्थिती ध्वनिवादी विचारवंतांनी सुद्धा मान्य केली आहे. कारण त्यांच्या मते रसध्वनीच्या बाबतीत विभावादिरूप व्यञ्जक वाच्यार्थ व व्यङ्ग्य रस यांच्या ज्ञानांमध्ये पौर्वापर्य-क्रम असतो, पण तो अतिसूक्ष्म असल्याने ध्यानात येत नाही.[३]

(२) पृ. ८० वर सद्रूप वस्तूच्या अभिव्यक्तीच्या तीन प्रकारांपैकी दुसऱ्या प्रकाराचे विवरण करताना महिमभट्टाने घटप्रदीपदृष्टान्ताचा निर्देश केला आहे.[४] भाषिक व्यवहारामध्ये जी व्यञ्जनावृत्ती आढळते तिच्या बाबतीत

---

३) पहा : वर पृ. २६-२७, टीप १७.
भाषिक व्यवहारामध्ये शब्दांच्या ठिकाणी व्यंजकत्वसामर्थ्य नसते असे आपले मत जरी महिमभट्टाने व्यक्तिविवेकात सर्वत्र आग्रहपूर्वक प्रतिपादिले असले, तरी विमर्श ३, पृ. ५१० येथे त्याने असे विधान केले आहे की क्रोध, आश्चर्य, शोक वगैरे भावना प्रगट करणारे आः, अहो बत, धिक् कष्टम् यासारखे निपात (म्हणजे उद्गारवाचक अव्यये) वक्त्याच्या मनातील क्रोध, आश्चर्य, शोक इत्यादी भावना घटप्रदीपन्यायाने अभिव्यक्त करतात. "केचित् पुनर्निपाताः क्रोधाद्भुतशोकादीन् भावान् प्रदीपवद् वक्तृगतानेव अवद्योतयन्ति न वाच्यगतान्।" महिमभट्टाचे हे विधान त्याने केलेल्या व्यञ्जना व्यापाराच्या खंडनावर 'मूले कुठारः' या न्यायाने घाव घालणारे आहे. भाषेतील उद्गारवाचक अव्यये जर वक्त्याच्या मनातील क्रोधादि अमूर्त भाव घटप्रदीपन्यायाने अभिव्यक्त करू शकतात, तर भाषेतील इतर शब्द सुद्धा वाच्यार्थाहून निराळा वक्त्याच्या मनातील सूक्ष्म, गूढ अर्थ घटप्रदीपन्यायाने का अभिव्यक्त करू शकणार नाहीत, असा प्रश्न जर कोणी महिमभट्टाला विचारला तर त्याचे समाधानकारक उत्तर देणे त्याला कठीण होईल असे वाटते. उद्गारवाचक अव्ययांच्या बाबतीत अपवाद करून त्यांचे भावव्यंजकत्व मान्य करण्याची महिमभट्टाची ही भूमिका प्रथम विमर्शातील (पृ. १५२–१५९) 'निपात हे व्यञ्जक नसून वाचक असतात' या अभिनिवेशपूर्वक प्रतिपादिलेल्या मताशी विसंगत वाटते.

४) पहा : वर पृ. २६.

घटप्रदीपदृष्टान्त ध्वनिवादी विद्वानांच्या मते लागू पडतो. परंतु भाषिक व्यवहारातील तथाकथित व्यञ्जनावृत्तीच्या बाबतीत घटप्रदीपदृष्टान्त लागू पडू शकत नाही असे विधान महिमभट्टाने पृ. ८१ वर केले आहे. या संबंधात महिमभट्टाने जो युक्तिवाद केला आहे तो कसा फसवा आहे, हे वर पृ. ५२–५४ (टीप २) येथे दाखविले असल्याने येथे पुनरुक्ती करण्याचे टाळले आहे.

(३) पृ. ८० वर अभिव्यक्तीच्या तृतीय प्रकाराचे विवेचन करताना धूमामुळे अग्नीची अभिव्यक्ती होणे, चित्रामुळे किंवा मूर्तीमुळे मूळ वस्तूची किंवा व्यक्तीची अभिव्यक्ती होणे व गो इत्यादी शब्दांमुळे गाय वगैरे पदार्थांची अभिव्यक्ती होणे ही तृतीय अभिव्यक्तीची उदाहरणे निर्देशिली आहेत. पृ. ८१ वर असे म्हटले आहे की अभिव्यक्तीचा हा तिसरा प्रकार अनुमानाहून निराळा नाही. या विधानाचा अर्थ असा होतो की गो या शब्दामुळे गाय या पशूचे ज्ञान जेव्हा श्रोत्याला होते तेव्हा ते अनुमानाने होते व शब्दांच्या ठिकाणी अनुमापकत्व सामर्थ्य असते. परंतु व्यक्तिविवेकामध्ये अनेक ठिकाणी महिमभट्टाने असे आग्रहपूर्वक म्हटले आहे की शब्दांच्या ठिकाणी केवळ अभिधा (वाचकत्व) सामर्थ्य असते.[५] अक्षपाद गौतमाने सुद्धा न्यायसूत्र २·१·४९–५६ येथे वाच्यार्थ हे शब्दांपासून अनुमानाने ध्यानात येतात या पूर्वपक्षाचे खंडन करून ते अभिधा या संकेतमूलक शब्दव्यापारामुळे ध्यानात येतात असा सिद्धान्त प्रतिपादिला आहे व इतर सर्व दार्शनिकांनी शब्दांच्या अभिधासामर्थ्याचा पुरस्कार केला आहे.[६]

(४) पृ. ८० वर इन्द्रधनुष्य हे असद्रूप वस्तूच्या अभिव्यक्तीचे उदाहरण म्हणून महिमभट्टाने निर्देशिले आहे.[७] महिमभट्टाच्या मते इन्द्रधनुष्य हे सद्रूप (वास्तव) नसून असद्रूप (आभासमय) असते व ते सूर्यचन्द्रादिकांच्या प्रकाशामुळे अभिव्यक्त होते. परंतु महिमभट्टाचे हे मत पटण्यासारखे नाही. कारण

---

५) व्य. वि. १·२७ (पृ. ११९), पृ. १६, २४, ४६२ इत्यादी.

६) पहा : वर पृ. ३१-३२, टीप २५.

७) पहा : वर पृ. २८.

इन्द्रधनुष्य म्हणजे वातावरणातील सूक्ष्म जलकणांवर सूर्याचे किंवा चन्द्राचे किरण पडून ते जलकणांमधून पलीकडे जाऊ लागताना होणाऱ्या त्यांच्या वक्रीभवनामुळे शुभ्र प्रकाशाचे सात घटक रंगांच्या पट्ट्याच्या रूपाने झालेले विघटन होय. इन्द्रधनुष्य हे सूर्यचन्द्रप्रकाशाइतकेच वास्तव असते. ते आभासरूप मुळीच नसते. दुसरे असे की इन्द्रधनुष्य हे प्रकाशरूप असल्याने ते स्वयंप्रकाश असते. ते सूर्यचन्द्रादिकांच्या प्रकाशामुळे प्रकाशित होते असे मुळीच नाही. सूर्यचन्द्रादिकांचा प्रकाश हे इन्द्रधनुष्याचे उपादानकारण व इन्द्रधनुष्य हे सूर्यचन्द्रादिकांच्या प्रकाशाचे कार्य असे म्हणणे योग्य होईल. दूध या उपादान कारणामुळे दही या कार्याची अभिव्यक्ती होते असे आपण ज्या अर्थाने म्हणतो, त्याच अर्थाने सूर्यचन्द्रादिकांच्या प्रकाशामुळे इन्द्रधनुष्याची अभिव्यक्ती होते. याचा अर्थ असा होतो की इन्द्रधनुष्य हे दह्याप्रमाणे, घटाप्रमाणे किंवा सुवर्णालंकाराप्रमाणे सद्रूपच आहे, असद्रूप नाही.

काव्यातील भावनात्मक आशय (रस) हा महिमभट्टाच्या मते काव्यानुमितीमुळे सामाजिकांच्या ध्यानात येतो, म्हणजे सामाजिकांना त्याचे बौद्धिक आकलन होते व ते आनंददायक असते.८ वाच्य अर्थामुळे एखाद्या प्रच्छन्न, गूढ घटनेचे किंवा अलंकाराचे सामाजिकांस अनुमानाने आकलन झाले असता ज्या प्रकारचा बौद्धिक आनंद त्यांना होतो, त्याच प्रकारचा बौद्धिक आनंद वाच्यार्थामुळे एखाद्या गूढ भावनात्मक आशयाचे अनुमानाने सामाजिकांना आकलन झाले असता त्यांना होतो. दोनही ठिकाणी सामाजिकांना होणारा आनंद अनुमिती या बौद्धिक प्रक्रियेमुळे होत असल्याने त्याचे स्वरूप बौद्धिक म्हणजे लौकिक असते असाच महिमभट्टाचा अभिप्राय आहे असे वाटते. हा आनंद योगिजनांना समाधिअवस्थेमध्ये ब्रह्मसाक्षात्कारामुळे प्राप्त होणाऱ्या आनंदासारखा असतो असे महिमभट्टाने एका अनामिक अवतरणाच्या आधारे म्हटले

---

८) व्य. वि. १, पृ. ७५ :
नानुमितो हेत्वाद्यैः स्वदतेऽनुमितो यथा विभावाद्यैः । न च सुखयति वाच्योऽर्थः प्रतीयमानः (= अनुमीयमानः) स एव यथा ॥

आहे.९ पण ब्रह्मसाक्षात्कारामुळे होणारा आनंद हा बौद्धिक स्वरूपाचा नसून तो बौद्धिक आनंदाहून निराळा असतो. तो बुद्धीच्या पलीकडचा असतो. कारण ब्रह्म किंवा आत्मा हा मन व बुद्धी यांच्या कक्षेच्या पलीकडे असलेला आहे अशी सर्व भारतीय दार्शनिकांची धारणा आहे.१० परमात्मा हा बुद्धिगम्य नसून त्याच्या आनंदमय व ज्ञानमय रूपाशी जीवात्म्याने स्वतःचे तादात्म्य समाधिअवस्थेमध्ये अनुभवावयाचे असते. अर्थात् जे कट्टर बुद्धिवादी लोक मनाच्या पलीकडे कोणतेच तत्त्व मानत नाहीत, त्यांना रसाचा आस्वाद हा ब्रह्मसाक्षात्काराप्रमाणे आनंदरूप असतो हे ध्वनिवादी विद्वानांचे व महिमभट्टाचे मत पटणार नाही. ध्वनिवादी विचारवंतांच्या मते काव्यातील भावभावनांच्या लालित्यपूर्ण चित्रणामुळे जीवात्म्यावरील राग, द्वेष, अज्ञान, स्वार्थी विचार वगैरे आवरणांचा भंग होऊन त्याच्या आनंदमय व ज्ञानमय स्वरूपाच्या प्रकाशात सहृदय वाचकाच्या किंवा प्रेक्षकाच्या मनाला, काव्यातील व्यक्ती व प्रसंग यांच्या चित्रणाने जागृत झालेल्या त्याच्या स्वतःच्या साधारणीकृत रत्यादि स्थायीभावांची जाणीव होते व त्यामुळे त्याला त्या रत्यादि स्थायी-भावांचा शृंगारादि रसांच्या रूपाने आनंदमय अनुभव प्राप्त होतो. ध्वनिवादी विद्वानांच्या या रसास्वादाच्या उपपत्तीसारखी उपपत्ती महिमभट्टाने व्यक्ति-विवेकामध्ये कोठेही सांगितलेली नाही. रसास्वादामुळे आत्मसाक्षात्काराच्या आनंदासारखा आनंद होतो हे जरी महिमभट्टाला मान्य असले, तरी रसा-स्वादाच्या प्रक्रियेचा तपशील त्याने दिलेला नाही व रसास्वाद हा त्याच्या

---

९) व्य. वि. १, पृ. १०० :
पाठ्यादथ ध्रुवागानात् ततः संपूरिते रसे ।
तदास्वादभरैकाग्रो हृष्यत्यन्तर्मुखः क्षणम् ॥
ततो निर्विषयस्यास्य स्वरूपावस्थितौ निजः ।
व्यज्यते ह्लादनिष्यन्दो येन तृप्यन्ति योगिनः ॥

१०) पहा : भगवद्गीता ३·४२ : इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ कठोपनिषद्, ३·१०-११ : इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः । मनसस्तु परा बुद्धिः, बुद्धेरात्मा महान् परः । महतः परम-व्यक्तम् अव्यक्तात्पुरुषः परः । पुरुषान्न परं किंचित्, सा काष्ठा सा परा गतिः ॥

मते बुद्धिगम्य असला तरी तो आत्मसाक्षात्कारासारखा आनंदरूप का असतो हेही त्याने स्पष्ट केलेले नाही. ध्वनिवादी विचारवंतांनी वेदान्तशास्त्रातील आत्मसाक्षात्काराच्या प्रक्रियेचा आधार घेऊन रसास्वादाची उपपत्ती सांगितली आहे.

व्यक्तिविवेक हा ग्रंथ महिमभट्टाने जरी ध्वनिसिद्धान्ताचे खंडन व अनुमितिसिद्धान्ताची स्थापना करण्यासाठी लिहिलेला असला, तरी त्यामध्ये त्याने प्रसंगवशात् साहित्यशास्त्रातील अनेक विषयांवर मतप्रदर्शन केले आहे. उदाहरणार्थ (१) काव्यस्वरूप, (२) काव्यप्रयोजने, (३) काव्यहेतु, (४) काव्यप्रकार, (५) काव्यातील शब्द व अर्थ यांचे स्वरूप, (६) शब्दशक्ती व अर्थशक्ती, (७) रस व रसास्वाद यांचे स्वरूप, (८) काव्यालंकार, (९) काव्यदोष, व (१०) रीति. या निरनिराळ्या विषयांवरील महिमभट्टाचे विचार पाहणे उद्‌बोधक होईल असे वाटते.

(१) **काव्यस्वरूप** : काव्याच्या सारभूत स्वरूपाविषयी महिमभट्टाचे असे मत आहे की रस हा काव्याचा आत्मा आहे याबाबतीत मतभेद असण्याचे मुळीच कारण नाही.११ स्थायीभावांचे व व्यभिचारी भावांचे जे विभाव (कारणे) व अनुभव (कार्ये) असतात, त्यांचे यथोचित चित्रण कवीने केल्यामुळे अटळपणे रसाचे अनुमानाने ज्ञान करून देण्याचे सामर्थ्य ज्या कविकृतीमध्ये असते ती कविकृती काव्य होय.१२ महिमभट्टापूर्वी होऊन गेलेल्या अनेक ग्रंथकारांनी रसाविष्कार हाच काव्याचा प्राण आहे हा विचार प्रतिपादिलेला आहे. भरताने नाट्यशास्त्राच्या सहाव्या अध्यायात (पृ. १२२, रसभावविचार, प्रा. कंगले) 'न हि रसाद् ऋते कश्चिदर्थः प्रवर्तते' असे म्हणून

११) विमर्श १·२६ (पृ. १११) : काव्यस्यात्मनि संज्ञिनि रसादिरूपे न कस्यचिद् विमतिः । पृ. १०० : तदभावे (रसाभावे) च अस्य (काव्यस्य) काव्यत्वमेव न स्यात् । पृ. १०२ : अस्य (काव्यस्य) रसात्मकत्वम् अवश्यम् उपगन्तव्यम् । तस्य (काव्यस्य) रसात्मकत्वाभावे काव्यव्यपदेश एव न स्यात् ।

१२) कविव्यापारो हि विभावादिसंयोजनात्मा रसाभिव्यक्त्यव्यभिचारी काव्यमुच्यते । (विमर्श १, पृ. १०१).

काव्यातील रसाच्या सर्वातिशायी महत्त्वाला मान्यता दर्शविली आहे. उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रह या ग्रंथावरील प्रतिहारेन्दुराज या टीकाकाराने ६·७ (पृ. ८३, भांडारकर संशोधन मंदिर संस्करण, १९२५) या कारिकेवरील टीकेमध्ये पुढील अनामिक श्लोक उद्धृत केला आहे : 'रसाद्यधिष्ठितं काव्यं जीवद्रूपतया यतः । कथ्यते तद्रसादीनां काव्यात्मत्वं व्यवस्थितम् ॥' या श्लोकामध्ये रसामुळे काव्य जीवद्रूप म्हणजे सजीव (जिवंत) होते व रस हा काव्याचा आत्मा आहे असे म्हटले आहे. अग्निपुराण अध्याय ३३७·३३ येथे 'वाग्वैदग्ध्यप्रधानेऽपि रस एवात्र जीवितम् ।' असे म्हणून रस हाच काव्याचा आत्मा आहे या मताचा पुरस्कार केला आहे. ध्वन्यालोक १·६ येथे 'काव्यस्यात्मा स एवार्थः (म्हणजे रसरूपः एव अर्थः)' असे म्हणून रस हाच काव्याचा प्राण होय या मताला दुजोरा दिला आहे. ध्वन्यालोकात व त्यावरील लोचनटीकेत रस हाच काव्याचा आत्मा आहे, रसामुळेच काव्याला जिवंतपणा प्राप्त होतो व रसाभिव्यक्तीवरच कवीने आपले लक्ष केन्द्रित केले पाहिजे या आशयाची वचने अनेक ठिकाणी आढळतात. पूर्वसूरींच्या या मताचाच पुनरुच्चार महिमभट्टाने आपल्या ग्रंथात अनेक ठिकाणी केला आहे. विमर्श २, पृ. १०३ येथे 'गुणालंकारसंस्कृतशब्दार्थमात्रशरीरं तावत् काव्यम्' हे जे ध्वनिवादी आचार्यांचे मत महिमभट्टाने उद्धृत केले आहे, ते त्याला मान्य आहे यात शंका नाही. शब्द व वाच्यार्थ हे काव्याचे शरीर, रसभावादि आशय हा काव्याचा आत्मा आणि गुण व अलंकार हे काव्याला भूषविणारे काव्याचे धर्म असे येथे महिमभट्टाला म्हणावयाचे आहे व हे मत प्रायः सर्व आलंकारिकांनी स्वीकारले आहे.

(२) **काव्यप्रयोजने** : काव्य लिहिताना कवीच्या मनात कोणती उद्दिष्टे असतात व काव्याच्या परिशीलनाने सामाजिकांना कोणते लाभ होतात यासंबंधी (म्हणजे काव्याच्या प्रयोजनांसंबंधी) भरतापासून पुढील सर्व साहित्यशास्त्रलेखकांनी आपल्या ग्रंथात चर्चा केली आहे. काव्य रचण्यामुळे व त्याच्या परिशीलनामुळे कीर्ति, संपत्ति, लौकिकव्यवहारोपयोगी व नैतिक मार्गदर्शन आणि श्रेष्ठ प्रकारचा आनंद या गोष्टी यथासंभव कवीला व सामाजिकांना प्राप्त होतात असे साधारणपणे सर्व लेखकांचे मत आहे.

काव्यामुळे होणाऱ्या लाभांमध्ये आनंद व व्यावहारिक आणि नैतिक मार्गदर्शन हे लाभ अत्यंत महत्त्वाचे होत व त्या दोहोंमध्ये व्यावहारिक आणि नैतिक मार्गदर्शन हाच अधिक महत्त्वाचा लाभ होय, कारण काव्यामुळे सामाजिकांना होणारा आनंद हे साधन व मार्गदर्शन हे काव्यानंदाचे साध्य असते, हे मत ध्वन्यालोकात आनंदवर्धनाने, लोचनटीकेत अभिनवगुप्ताने आणि वक्रोक्ति-जीवितामध्ये कुन्तकाने आग्रहपूर्वक प्रतिपादिले आहे.१३ या मताला अनुसरून महिमभट्टाने प्रथम विमर्शामध्ये असे म्हटले आहे की राजे वगैरे श्रीमंतीमध्ये लोळणाऱ्या व सुखलोलुप लोकांना आणि इतर मंदबुद्धीच्या लोकांना स्त्रिया, नृत्य, गाणे बजावणे वगैरे विशयांबद्दल आकर्षण वाटत असल्यामुळे त्यांना आनंददायक वाटतील अशा व्यक्तींच्या व प्रसंगांच्या कलात्मक वर्णनांचे आमिष दाखवून सदाचरणाकडे प्रवृत्त करणे हेच काव्याचे प्रयोजन होय.१४ विमर्श १, पृ. १०३ येथे महिमभट्टाने म्हटले आहे की एका बाजूला वेद,

---

१३) ध्वन्यालोक ३, पृ. ३९८ : सदाचारोपदेशरूपा हि नाटकादिगोष्ठी विनेयजन-हितार्थमेव मुनिभिरवतारिता ।; लोचन ३, पृ. ३३६ : रसास्वादवैवश्यमेव स्वरसभाविन्यां व्युत्पत्तौ प्रयोजकम्, इति प्रीतिरेव व्युत्पत्तेः प्रयोजिका ।; वक्रोक्ति-जीवित, पृ. ४ (डॉ. के. कृष्णमूर्ति संपादित) : राजपुत्राः खलु समासादित-स्वविभवाः ..... श्लाघ्योपदेशशून्यतया स्वतन्त्राः सन्तः समुचितसकलव्यवहारो-च्छेदं प्रवर्तयितुं प्रभवन्तीति एतदर्थमेव तद्व्युत्पत्तये व्यतीतसच्चरितराजचरितं तन्निदर्शनाय निबध्नन्ति कवयः ।

१४) पृ. १०२ : ... ये सुकुमारमतयः शास्त्रश्रवणादिविमुखाः सुखिनां राजप्रभृतयः ... ये चात्यन्ततोऽपि जडमतयः तावता (=शास्त्रश्रवणादिना) व्युत्पादयितुम् अशक्याः स्त्रीनृत्यातोद्यादिप्रसक्ताः, उभयेऽपि ते अभिमतवस्तुपुरस्कारेण गुडजिह्विकया रसास्वादसुखं मुखे दत्त्वा तत्र (काव्ये) कटुकौषधपानादाविव प्रवर्तयितव्याः । अन्यथा प्रवृत्तिरेव एषां न स्यात्, किमुत व्युत्पत्तिः । काव्यारम्भस्य साफल्यमिच्छता तत्प्रवृत्तिनिबन्धनभावेन अस्य (काव्यस्य) रसात्मकत्वम् अवश्यम् अभ्युपगन्तव्यम् । तुलनार्थ पहा लोचन ३, पृ. ३३६ : इह प्रभुसंमितेभ्यः श्रुतिस्मृतिप्रभृतिभ्यः ... शास्त्रेभ्यो ये न व्युत्पन्नाः, न च... मित्र संमितेभ्यः इतिहासादिशास्त्रेभ्यो लब्धव्युत्पत्तयः, अथ च अवश्यं व्युत्पाद्याः .. राजपुत्रादयः, तेषां हृदयानुप्रवेश-मुखेन चतुर्वर्गोपायव्युत्पत्तिराधेया । हृदयानुप्रवेशश्च रसास्वादमय एव ।

इतिहास, पुराण इत्यादी शास्त्रे व दुसऱ्या बाजूला काव्य, या दोहोंचे उद्दिष्ट लोकांचे नैतिक मार्गदर्शन करणे हेच असते व ते विधि आणि निषेध (म्हणजे काय करणे इष्ट व काय करणे अनिष्ट यासंबंधी उपदेश) या स्वरूपाचे असते, परंतु वेदादि शास्त्रांनी केलेले मार्गदर्शन आज्ञा या स्वरूपाचे व रूक्ष असते, तर काव्याने केलेले मार्गदर्शन हे सामाजिकांना काव्यानंदाने मोहित करून कार्याकार्योपदेश रोचक पद्धतीने त्यांच्या गळी उतरविणे या प्रकारचे असते.[१५] तेव्हा रसास्वादजन्य आनंदाच्या द्वारा सामाजिकांचे लौकिक व्यवहाराच्या व सदाचरणाच्या दृष्टीने मार्गदर्शन करणे हे काव्याचे अत्यंत महत्त्वाचे प्रयोजन मानून केवळ त्याचाच विचार महिमभट्टाने व्यक्तिविवेकात केला आहे. इतर काव्यप्रयोजने त्याच्या दृष्टीने कमी महत्त्वाची असल्याने त्याने त्यांचा विचार केलेला नाही. मम्मटाने मात्र सामाजिकांना श्रेष्ठ प्रकारचा रसास्वादजन्य आनंद देणे हेच काव्याचे अत्यंत महत्त्वाचे प्रयोजन मानले आहे.[१६]

(३) **काव्यहेतु** : काव्यनिर्मितीला कोणत्या गोष्टी कारणीभूत होतात (म्हणजे आवश्यक असतात) यासंबंधी दण्डी, भामह, रुद्रट, वामन, आनन्दवर्धन, अभिनवगुप्त व राजशेखर या महिमभट्टपूर्व लेखकांनी आपल्या ग्रंथांमध्ये

---

१५) सामान्येन उभयमपि तत् (अभिनेयार्थम् अनभिनेयार्थं काव्यम्) शास्त्रवद् विधिनिषेधविषयव्युत्पत्तिफलम् । केवलं व्युत्पाद्यजनजाड्याजाड्यतारतम्यापेक्षया काव्यनाट्यशास्त्ररूपोऽयम् उपायमात्रभेदः, न फलभेदः । हाच विचार प्रथम भट्टनायकाने आणि नंतर त्याला अनुसरून अभिनवगुप्ताने प्रगट केला आहे. पहा : लोचन पृ. ८७ व ४० आणि ३९९. नैतिक आचरणाच्या दृष्टीने विधिरूप मार्गदर्शनाचे स्वरूप अभिनवगुप्ताने लोचन पृ. १९० येथे 'यथा रामः तथा अहम् (वर्तेय)' या शब्दांनी प्रगट केले आहे. काव्यप्रकाश, उल्लास १, पृ. १० येथे 'रामादिवद् वर्तितव्यं, न रावणादिवत्' या शब्दांनी विधिरूप व निषेधरूप मार्गदर्शनाचे स्वरूप मम्मटाने स्पष्ट केले आहे.

१६) काव्यप्रकाश, १·२, पृ. ७ : सकलप्रयोजनमौलिभूतं रसास्वादनसमुद्भूतं विगलितवेद्यान्तरम् आनन्दम् ।

चर्चा केली आहे. प्रतिभा (कल्पनाशक्ती), व्युत्पत्ती (बहुश्रुतपणा) व अभ्यास (काव्य लिहिण्याचा सराव) ही काव्यनिर्मितीची तीन कारणे प्रायः सर्व साहित्यशास्त्रलेखकांनी मान्य केली आहेत. महिमभट्टाने काव्याच्या या तीन कारणांपैकी व्युत्पत्ती या कारणाचा निर्देश केवळ एकदा शक्तीच्या (म्हणजे प्रतिभेच्या) बरोबर केला आहे.१७ परंतु व्युत्पत्तीच्या स्वरूपाची चर्चा त्याने कोठेही केलेली नाही. तसेच अभ्यास या कारणाचा निर्देश कोठेही केलेला नाही. पण प्रतिभा या कारणाच्या स्वरूपाची चर्चा त्याने द्वितीय विमर्शामध्ये पौनरुक्त्य या दोषाच्या संदर्भात संक्षेपाने केली आहे.१८ व प्रतिभेसंबंधी सविस्तर विचार तत्त्वोक्तिकोश नावाच्या स्वतःच्या ग्रंथात केला आहे असे २·११९ (पृ. ४५१) येथे म्हटले आहे. रसपरिपोषाला अनुकूल शब्दांचे व अर्थांचे चिन्तन करण्यात कवी मग्न झाला म्हणजे समाधी लागल्याप्रमाणे त्याची अवस्था होऊन क्षणभर

---

१७) विमर्श १·६६, पृ. १२४ : तस्माद् व्युत्पत्तिशक्तिभ्यां निबन्धो यः स्खलद्गतेः । शब्दस्य, सोऽपि विज्ञेयोऽनुमानविषयोऽन्यवत् ॥

१८) व्य. वि., २·११७-११८, पृ. ४५२-४५३ : रसानुगुणशब्दार्थचिन्तास्तिमितचेतसः । क्षणं स्वरूपस्पर्शोत्था प्रज्ञैव प्रतिभा कवेः। सा हि चक्षुर्भगवतः तृतीयमिति गीयते। येन साक्षात्करोत्येष भावान् त्रैकाल्यगोचरान् ॥ तुलना, रुद्रट काव्यालंकार, १·१४ : मनसि सदा सुसमाधिनि विस्फुरणमनेकधाभिधेयस्य । अक्लिष्टानि पदानि च भवन्ति यस्यामसौ शक्तिः ॥; राजशेखर, काव्यमीमांसा, अध्याय ४ : काव्यकर्मणि कवेः समाधिः परं व्याप्रियते' इति श्यामदेवः। मनस एकाग्रता समाधिः। समाहितं चित्तम् अर्थान् पश्यति । ... या शब्दग्रामम्, अर्थसार्थम्, अलंकारतन्त्रम्, उक्तिमार्गम्, अन्यदपि तथाविधम् अधिहृदयं प्रतिभासयति सा प्रतिभा। (पृ. ४२-४३, चौखंबा संस्करण, १९३४); रसगङ्गाधर, १, पृ. ९ (काव्यमाला संस्करण, १९३९) : सा (प्रतिभा) च काव्यघटनानुकूलशब्दार्थोपस्थितिः ॥; आंग्लकवि व नाटककार शेक्सपीअर, Mid Summer Night's Dream, V. 1.7 :

The poet's eye, in a fine frenzy rolling,
Doth glance from heaven to earth, from earth to heaven,
And as imagination bodies forth
The forms of things unknown, the poet's pen
Turns them to shape and gives to airy nothing
A local habitation and a name.

त्याला वर्ण्य विषयाच्या स्वरूपाचा साक्षात्कार होतो व त्यामुळे त्याला जी दिव्य प्रज्ञा (स्फूर्ती) प्राप्त होते तीच प्रतिभा होय. प्रतिभा म्हणजे भगवान् शंकराचे त्रिकालदर्शी तृतीय नेत्रच असून तिच्यामुळे वर्तमान, भूत व भविष्य-काळातील घटना कवीच्या दृष्टीसमोर उभ्या राहतात, असे महिमभट्टाने प्रतिभेच्या संबंधात म्हटले आहे. प्रतिभा, व्युत्पत्ती व अभ्यास या तीन काव्य-हेतुंच्या अन्योन्यसापेक्ष महत्त्वाविषयी रुद्रट, राजशेखर, मम्मट, जगन्नाथ इत्यादी लेखकांनी जसे मतप्रदर्शन केले आहे तसे महिमभट्टाने व्यक्तिविवेकात केलेले नाही. तेथे त्याने केवळ प्रतिभेच्या स्वरूपाचे व कार्याचे थोडक्यात वर्णन केले आहे. तत्त्वोक्तिकोश नावाच्या स्वरचित शास्त्रीय ग्रंथामध्ये प्रतिभेच्या स्वरू-पाची चर्चा महिमभट्टाने केलेली असल्यामुळे व्यक्तिविवेकात त्याने याविषयी विस्ताराने चर्चा केलेली नाही.१९ प्रतिभेचे स्वरूप व कार्य याव्यतिरिक्त व्युत्पत्ती व अभ्यास या काव्यहेतूविषयी चर्चा तत्त्वोक्तिकोशात महिमभट्टाने केलेली असावी. तो ग्रंथ उपलब्ध नसल्याने निश्चितपणे काही विधान करणे शक्य नाही.

(४) **काव्यप्रकार :** विमर्श १, पृ. १०१ येथे महिमभट्टाने अभिनेय-काव्य व अनभिनेय काव्य असे काव्याचे दोन प्रकार स्थूलमानाने निर्देशिले आहेत. अभिनेय काव्य म्हणजे कायिक, वाचिक, सात्त्विक व आहार्य या चतुर्विध अभिनयाच्या द्वारा ज्यामधील आशय प्रगट केला जातो असे नाटकादि दृश्य व श्रव्य काव्य. अनभिनेय काव्य म्हणजे कोणत्याही प्रकारच्या अभि-नयाच्या अभावी केवळ कविकृत शाब्दिक वर्णनामुळे ज्यामधील आशय प्रगट केला जातो असे श्रव्य काव्य.२० अभिनेय काव्याच्या नाटक, प्रकरण, नाटिका इत्यादी मुख्य प्रकारांचा व उपप्रकारांचा भरताने व अनभिनेय काव्याच्या

---

१९) व्य. वि. २·११९, पृ. ४५३ : इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिः प्रतिपादितम् । शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्य इति नेह प्रपञ्चितम् ॥ पहा : वर पृ. १२-१३.

२०) व्य. वि. १, पृ. १०१-१०२ : तच्च (काव्यम्) अभिनेयानभिनेयार्थत्वेन द्विविधम् । तत्राद्यं प्रख्यातरामरावणादिनायकप्रतिनायकसमाश्रयेण ……… चरितवर्णनमात्रात्मकम् । अपरं पुनः अनुकारक्रमेण साक्षात् तत्प्रदर्शनात्मकम् । यदाहुः । अनुभावविभावानां वर्णना काव्यमुच्यते । तेषामेव प्रयोगस्तु नाट्यं गीतादिरञ्जितम् ॥

सर्गबन्ध (महाकाव्य), खंडकाव्य, कथा, आख्यायिका, चम्पू इत्यादी प्रकारांचा भामह, दण्डी, आनन्दवर्धन इत्यादी लेखकांनी सविस्तर विचार केलेला असल्यामुळे महिमभट्टाने त्यासंबंधी चर्चा व्यक्तिविवेकात केलेली नाही.

(५) **काव्यातील शब्द व अर्थ यांचे स्वरूप :** काव्याचे शरीर म्हणजे शब्द व त्यांचे वाच्यार्थ आणि काव्याचा आत्मा म्हणजे रसादि भावनात्मक आशय, हे भरत, दण्डी व आनन्दवर्धन यांच्याप्रमाणे महिमभट्टाने सुद्धा मान्य केले आहे. काव्यातील भावनात्मक आशय हा त्याच्या विभावांच्या व अनुभावांच्या द्वारा प्रगट करावयाचा असतो आणि काव्यामध्ये जे विभावांचे व अनुभवाचे चित्रण करावयाचे ते शब्द व त्यांचे वाच्यार्थ यांच्या योगानेच करावयाचे असते. असे असल्यामुळे व्यक्तिविवेकात काव्याच्या स्वरूपाचे विवेचन करताना महिमभट्टाने शब्द व अर्थ त्यांचे स्वरूप, त्यांचे प्रकार व त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या शक्ती यासंबंधी विमर्श १, पृ. २०–५८ येथे चर्चा केली आहे.

काव्यामध्ये जे शब्द वापरावयाचे ते पद (म्हणजे प्रत्यययुक्त नामरूपे व धातुरूपे आणि प्रत्ययहीन अव्यये या स्वरूपात असलेले सुटे शब्द) व वाक्य (म्हणजे आकांक्षा योग्यता व संनिधि यांनी युक्त अशा पदांचा समुदाय) या द्विविध स्वरूपाचे असतात. वैयाकरणांनी नामे, क्रियापदे, उपसर्ग व निपात (अव्ययें) असे पदांचे चारच प्रकार मानले आहेत. परंतु महिमभट्टाने कर्मप्रवचनीय या निपातांच्या एका विशिष्ट उपप्रकाराला स्वतंत्र प्रकार मानून पदांचे नामे, क्रियापदे, उपसर्ग, निपात व कर्मप्रवचनीये असे पाच प्रकार सांगून त्यांच्या स्वरूपाचे विवेचन केले आहे. नामे ही सत्त्ववाचक म्हणजे सिद्धवस्तुवाचक असून जातिवाचक, गुणवाचक, क्रियावाचक व द्रव्यवाचक अशी चार प्रकारची असतात असे वैयाकरणांना अनुसरून महिमभट्टाने म्हटले आहे व त्यांच्या स्वरूपासंबंधी चर्चा केली आहे. द्रव्यवाचक नामे म्हणजे विशिष्टव्यक्तिवाचक (उदा० चैत्र, मैत्र, कृष्ण, विष्णु इत्यादी) किंवा विशिष्ट वस्तुवाचक (उदाहरणार्थ चन्द्र, सूर्य इत्यादी) विशेषनामे असे वैयाकरणांनी व साहित्यशास्त्रकारांनी मानले आहे. परंतु महिमभट्टाने दण्डी (काठी धारण करणारा विशिष्ट मनुष्य) व विषाणी (शिंगे असलेला विशिष्ट पशु) हे दोन शब्द द्रव्यवाचक शब्द म्हणून निर्देशिले आहेत. कारण महिमभट्टाच्या मते दण्ड, विषाण इत्यादी विशिष्ट वस्तूंच्या संबंधामुळे दण्डी, विषाणी इत्यादी शब्द त्या

वस्तूनी युक्त असणाऱ्या व्यक्तीचा किंवा पशूचा बोध करून देतात म्हणून ते द्रव्यवाचक शब्द होत. परंतु दण्डी, विषाणी वगैरे शब्द वैयाकरणांच्या मते द्रव्यवाचक नसून गुणवाचक आहेत असे रुय्यकाने आपल्या टीकेमध्ये पृ. २९ वर म्हटले आहे. नामांच्या अर्थाच्या संदर्भात सर्व नामे केवळ क्रियावाचक असतात या मताची पृ. ३०–४३ येथे महिमभट्टाने सविस्तर चर्चा केली आहे. भाषेतील सर्व नामे धातुज असतात या यास्काने निरुक्तामध्ये चर्चिलेल्या नैरुक्तांच्या व शाकटायनाच्या मतासारखेच हे मत आहे. क्रियापदे ही भावप्रधान म्हणजे क्रियाप्रधान (क्रियावाचक) असतात. उपसर्ग म्हणजे धातुरूपांच्या पूर्वी जोडलेली, सिद्धवस्तुवाचक नसलेली व धातुरूपवाच्य क्रियेच्या ठिकाणी कोणते-तरी वैशिष्टय उत्पन्न करणारी अव्यये होत. निपात म्हणजे सिद्धवस्तुवाचक नसलेली धातुरूपांच्या पूर्वी न जोडली जाणारी सामान्य अव्यये होत.

पदांचे पाच प्रकार असतात तसे वाक्याचे नसतात. कारण वाक्यामध्ये क्रियेचे प्राधान्य असते व क्रिया ही एकच प्रकारची असते, म्हणून वाक्यही एकच प्रकारचे असते. वाक्याच्या स्वरूपाचे विवेचन करताना महिमभट्टाने भर्तृहरीच्या वाक्यपदीयातील २.४ हा श्लोक उद्धृत केला आहे. त्याचा आशय असा : वाक्यातील पदरूप घटकांना एकमेकांविषयी आकांक्षा असते. वाक्यात क्रियेला प्राधान्य असून वाक्यातील इतर शब्द क्रियेला गुणीभूत म्हणजे उपकारक असतात. वाक्यातील घटक पदांचा समुदाय अर्थाच्या दृष्टीने स्वयंपूर्ण असतो व संपूर्ण वाक्याच्या द्वारा एकच मुख्य अर्थ प्रगट केला जातो. वाक्यातील पदांमध्ये एकमेकांची आकांक्षा पूर्ण करण्याचे सामर्थ्य एकमेकां-विषयी योग्यता (म्हणजे विरोधाचा अभाव) व एकमेकांचे सांनिध्य असते असे जे अन्नंभट्टाने तर्कसंग्रहात, मम्मटाने काव्यप्रकाशात व विश्वनाथाने साहित्यदर्पणात म्हटले आहे त्याच्याशी महिमभट्टाने वाक्याच्या स्वरूपाविषयी जे म्हटले आहे ते सुसंगतच आहे.

ध्वनिवादी विद्वान अर्थाचे वाच्य, लक्ष्य, तात्पर्य व व्यङ्ग्य असे चार प्रकार मानतात. परंतु महिमभट्टाने वाच्य (म्हणजे शब्दाच्या संकेतमूलक अभिधासामर्थ्यामुळे ध्यानात येणारा) व अनुमेय (म्हणजे वाच्यार्थामुळे अनु-मानाने ध्यानात येणारा) असे अर्थाचे दोनच प्रकार मानले आहेत. कारण

महिमभट्टाच्या मते शब्दाच्या ठिकाणी लक्ष्यार्थबोधकत्व (लक्षणावृत्ति), वाक्यावस्थेत तात्पर्यार्थबोधकत्व (तात्पर्यवृत्ति) व व्यङ्ग्यार्थबोधकत्व (व्यञ्जनावृत्ति) ही सामर्थ्ये नसतातच, तर केवळ वाच्यार्थबोधकत्व (अभिधावृत्ति) हे एकमेव सामर्थ्य असते. ध्वनिवादी विद्वानांच्या मते शब्दाप्रमाणे वाच्यार्थाच्या ठिकाणी सुद्धा व्यङ्ग्यार्थबोधकत्व असते. परंतु महिमभट्टाने व्यञ्जनावृत्तीचे खंडन केले असल्याने ध्वनिवादी ज्याला वाच्यार्थाचे व्यङ्ग्यार्थबोधकत्व (व्यञ्जकत्व) म्हणतात त्याचा अनुमापकत्वामध्ये अन्तर्भाव होतो असे त्याचे मत आहे. तसेच लक्ष्यार्थबोधकत्व व तात्पर्यार्थ बोधकत्व यांचाही अन्तर्भाव महिमभट्टाच्या मते वाच्यार्थांच्या अनुमापकत्वामध्येच होतो.

उच्चारलेला शब्द ऐकल्याबरोबर किंवा लिहिलेला शब्द वाचल्याबरोबर जो अर्थ श्रोत्याच्या किंवा वाचकाच्या ध्यानात येतो तो त्या शब्दाचा वाच्यार्थ किंवा मुख्यार्थ होय. यालाच मम्मटादि ग्रंथकार संकेतित (म्हणजे संकेतामुळे ध्यानात येणारा) अर्थ म्हणतात. वाच्यार्थ ध्यानात आल्यानंतर काही वेळाने जो दुसरा अर्थ (अर्थान्तर) ध्यानात येतो तो अनुमेय (म्हणजे अनुमानाने ध्यानात येणारा) अर्थ होय. वाच्यार्थामुळे हा दुसरा अर्थ जेव्हा अनुमानाने ध्यानात येतो, तेव्हा वाच्यार्थ हाच अनुमानप्रक्रियेतील लिङ्ग (साधन, हेतु) असतो व दुसरा अर्थ हा अनुमानप्रक्रियेतील साध्य असतो.

महिमभट्टाने अनुमेय अर्थाचे वस्तु, अलंकार व रसभावादि भावनात्मक आशय असे तीन प्रकार मानले आहेत. या तीन प्रकारच्या अनुमेय अर्थांपैकी वस्तुरूप व अलंकाररूप अनुमेय अर्थ हे केव्हा केव्हा वाच्यसुद्धा असतात. परंतु रसभावादि अर्थ कधीही वाच्य नसतो, तर निरपवादपणे अनुमेयच असतो.[२१]

---

२१) ध्वन्यालोक १, पृ. ५० येथे आनन्दवर्धनाने व लोचन १, पृ. ५०-५१ येथे अभिनवगुप्ताने व्यङ्ग्य अर्थाच्या वस्तु, अलंकार व रसादि या तीन प्रकारांविषयी जे काही म्हटले आहे, त्याचाच अनुवाद येथे महिमभट्टाने केला आहे हे स्पष्ट आहे. निराळेपणा एवढाच की व्यङ्ग्य अर्थ या शब्दयोजनेऐवजी महिमभट्टाने अनुमेय अर्थ असा शब्दप्रयोग केला आहे.

सुटया पदाचा अर्थ हा नेहमी वाच्यच असतो, तो केव्हाही अनुमेय असत नाही. कारण सुटया पदाचा अर्थ निरंश, अवयवशून्य, एकजिनसी असल्यामुळे (म्हणजे त्यामध्ये साधन-अंश व साध्य-अंश असे भाग नसल्यामुळे) त्याच्या बाबतीत अनुमेयत्वाचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. परंतु वाक्याच्या अर्थामध्ये घटकपदार्थरूपी अनेक अंश असतात व त्या घटकपदार्थांपैकी काही सिद्धरूप व काही असिद्धरूप (म्हणजे साध्यरूप) असतात. जे घटकपदार्थ सिद्ध-रूप असतात ते वाक्यातील उद्देश्य या स्वरूपाचे व जे घटकपदार्थ असिद्धरूप असतात ते विधेय या स्वरूपाचे असतात. वाक्यातील सिद्धरूप व असिद्धरूप घटकपदार्थांमध्ये साध्यसाधनसंबंध असतो. भाषिक व्यवहारातील प्रायः सर्व वाक्यांमध्ये वाच्यार्थाच्या पातळीवर हा साध्यसाधनसंबंध आढळून येतो. हा साध्यसाधनसंबंध म्हणजे अनुमेय-अनुमापकसंबंध किंवा लिङ्गलिङ्गिसंबंधच होय. वाच्यार्थाच्या बाबतीत ज्याप्रमाणे हा साध्यसाधनसंबंध प्रायः आढळतो त्याचप्रमाणे संपूर्ण वाक्याचा एकमुखी वाच्यार्थ व त्यानंतर काही वेळाने ध्यानात येणारा दुसरा प्रच्छन्न, गूढ अर्थ (अर्थान्तर) यांच्यामध्येही हा साध्य-साधनसंबंध असतो.

वाक्याच्या द्वारा ताबडतोब प्रतीत होणारा एकमुखी वाच्यार्थ व काही वेळाने अनुमानाने प्रतीत होणारा दुसरा प्रच्छन्न, गूढ अर्थ या दोहोंपैकी प्रच्छन्न, गूढ अर्थच अधिक सुंदर व चमत्कारकारक म्हणजे वाचकांना साश्चर्य आनंद देणारा असतो.[२२] वाच्यार्थ हा अनुमेय, प्रच्छन्न, गूढ अर्थाइतका सुंदर व चमत्कारकारक नसतो.[२३]

(६) **शब्दशक्ती व अर्थशक्ती** : शब्द व अर्थ यासंबंधी महिमभट्टाच्या मतांचे समालोचन करताना शब्दशक्ती व अर्थशक्ती याविशयी महिमभट्टाच्या

---

२२) पहा : व्य. वि. १, पृ. ७५ : पहा : वर पृ. ९८, टीप ८.
२३) तुलना ध्वन्यालोक ४, पृ. ५३३ : सारभूतो हि अर्थः स्वशब्दानभिधेयत्वेन प्रकाशितः सुतरामेव शोभामावहति । प्रसिद्धमेतदस्त्येव विदग्धविद्वत्परिषत्सु यद-भिमततरं वस्तु व्यङ्ग्यत्वेन प्रकाश्यते न साक्षाच्छब्दवाच्यत्वेन । या अवतरणामध्ये

मतांचा निर्देश अनिवार्यपणे करावा लागलाच आहे. शब्दांच्या ठिकाणी अभिधा (किंवा वाच्यार्थवाचकत्व) ही एकमेव शक्ती असते, त्यांच्या ठिकाणी लक्ष्यार्थबोधकत्व (लक्षणा), तात्पर्यार्थबोधकत्व व व्यङ्ग्यार्थबोधकत्व यांपैकी कोणतीही शक्ती नसते. वाच्यार्थाच्या ठिकाणी अनुमापकत्व ही एकमेव शक्ती असते; त्याच्या ठिकाणी लक्ष्यार्थबोधकत्व, तात्पर्यार्थबोधकत्व व व्यङ्ग्यार्थबोधकत्व यांपैकी कोणतीही शक्ती नसते, तर तथाकथित लक्ष्यार्थ, तात्पर्यार्थ व व्यङ्ग्यार्थ हे सर्व परिस्थित्यनुसार वाच्यार्थाच्या ठिकाणी असणाऱ्या अनुमापकत्व या एकमेव शक्तीमुळे प्रतीत होतात.२४

शब्दांच्या ठिकाणी केवळ अभिधाशक्ती असू शकते; लक्षणा, तात्पर्य व व्यञ्जना या शक्ती असू शकत नाहीत, हा मुद्दा महिमभट्टाने विमर्श १, पृ. ११३–११४ येथे पुढीलप्रमाणे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे : एकाच आश्रयाच्या ठिकाणी अनेक शक्ती जर असल्या, तर त्या (१) एकमेकींवर अवलंबून नसतात, तर स्वतंत्र असतात; (२) त्यांच्यामध्ये पौर्वापर्यक्रम

---

व्यङ्ग्यत्वेन याऐवजी अनुमेयत्वेन हा शब्द वापरल्यास अवतरणातील आशय महिमभट्टाला १०० टक्के मान्य होण्यासारखाच आहे.

२४) व्य. वि. १·२७, पृ. १११ : शब्दस्यैकाभिधाशक्तिरर्थस्यैकैव लिङ्गता। न व्यञ्जकत्वमनयोः समस्तीत्युपपादितम्॥; पृ. १४०-१४१ : स (शब्दः) हि संकेतसापेक्षः स्वव्यापारम् आरभते, न स्वभावत एव, इति यत्रैवास्य संकेतः, तत्रैव व्याप्रियते। ततश्च अभिधेयार्थविषय एवास्य व्यापारो युक्तः, नार्थान्तरविषयः, तत्र संकेताभावात्। तदभावेऽपि तत्र तत्परिकल्पने सर्वः कुतश्चिद् अभिधेयार्थवद् अर्थान्तरमपि प्रतीयात्। तस्माद्यत्र संकेतापेक्षा तत्रैवास्य व्यापर इत्यवगन्तुं युक्तं, न अर्थान्तरे। तत्र अर्थस्यैव तदुपपत्ति (= अर्थान्तरप्रतीत्युपपत्ति) समर्थनात्।; पृ. ११८ : तस्माद्योऽयं बाहीकादौ गवादिसाधर्म्याविगमः स तत्त्वारोपान्यथानुपपत्तिपरिकल्पितः अनुमानस्यैव विषयः, न शब्दव्यापारस्य इति स्थितम्।; पृ. ११९ : शब्दः पुनः स्वार्थाभिधानव्यापारमात्रपर्यवसितसामर्थ्यः नार्थान्तरस्य तटादेः वार्तामपि वेदितुम् उत्सहते, किं पुनः संस्पर्शम्।; १·६७, ६८, पृ. १३३ : विषभक्षणादपि परामेतद्गृहभोजनस्य दारुणताम्। वाच्यादतोऽनुमिमते प्रकरणवक्तृस्वरूपज्ञाः॥ विषभक्षणमनुमनुते न हि कश्चिदकाण्ड एव सुहृदि सुधीः। तेनात्रार्थान्तरगतिरार्थी, तात्पर्यशक्तिजा न पुनः॥

नसतो, म्हणजे एक शक्ती प्रथम कार्यप्रवृत्त होऊन तिने आपले कार्य केल्या-नंतर दुसरी शक्ती कार्यप्रवृत्त होते असा नियम त्यांच्या बाबतीत नसतो; (३) त्या सर्व एकाच वेळी कार्यप्रवृत्त होतात. उदाहरणार्थ एकाच अग्नीच्या ठिकाणी दाहकत्व, पाचकत्व व प्रकाशकत्व या ज्या तीन शक्ती असतात, त्या एकमेकींवर अवलंबून नसतात, त्यांच्यामध्ये पौर्वापर्यक्रम नसतो, म्हणजे त्या एकीनंतर दुसरी या क्रमाने कार्यप्रवृत्त होत नाहीत, तर त्या एकाच वेळी चटका देऊन भाजणे, अन्न शिजविणे व प्रकाशणे आणि प्रकाशित करणे ही कार्ये करतात. परंतु अभिधा, लक्षणा, तात्पर्य व व्यञ्जना या चार शक्तींपैकी नंतरची प्रत्येक शक्ती पूर्वीच्या शक्तीवर अवलंबून असते हे ध्वनिवादी विद्वानांनी मान्य केले आहे. अभिधाशक्तीने वाच्यार्थबोधकत्वाचे कार्य केल्या-नंतरच लक्षणाशक्ती प्रवृत्त होते. तसेच अभिधाशक्तीमुळे सुटया पदांच्या वाच्यार्थांचा बोध झाल्यानंतरच तात्पर्यशक्ती प्रवृत्त होते व लक्षणेमुळे लक्ष्यार्थाचा व तात्पर्यशक्तीमुळे तात्पर्यार्थाचा बोध झाल्यानंतरच व्यञ्जना-शक्ती आपले कार्य करू लागते. या चार शक्ती एकाच वेळी कार्यप्रवृत्त न होता एकीच्या नंतर दुसरी याप्रमाणे आपले कार्य करतात. असे असल्यामुळे लक्षणा, तात्पर्य व व्यञ्जना या तीन शक्ती अभिधेचा आश्रय असणाऱ्या शब्दाहून निराळ्या आश्रयामध्ये रहात असल्या पाहिजेत. हा निराळा आश्रय म्हणजे वाच्यार्थ होय व त्याच्या ठिकाणी असणाऱ्या अनुमापकत्व या एकच सामर्थ्यामुळे तथाकथित लक्ष्यार्थ, तात्पर्यार्थ आणि व्यङ्ग्यार्थ यांचा बोध होतो. म्हणून तथाकथित लक्षणा, तात्पर्य व व्यञ्जना यांचा अन्तर्भाव वाच्यार्थाच्या अनुमापकत्वशक्तीमध्येच होतो असा महिमभट्टाचा दावा आहे.

व्यक्तिविवेकामध्ये महिमभट्टाने जरी संकेतावर आधारलेल्या अभिधा-शक्तीच्या स्वतंत्र अस्तित्वाचे वारंवार समर्थन करून तिचा स्पष्टपणे पुरस्कार केलेला असला तरी प्रथम विमर्श पृ. ८१ येथे व्यञ्जनावृत्तीचे खंडन करताना त्याने गो इत्यादी शब्दांमुळे जे विशिष्ट पशु इत्यादी अर्थांचे ज्ञान होते ते सुद्धा अनुमानाने होते असे म्हटले आहे. हे विधान व्यक्तिविवेकामध्ये इतरत्र सगळीकडे अभिधाशक्तीच्या बाबतीत त्याने स्वीकारलेल्या भूमिकेशी विसंगत वाटते. (पहा : वर पृ. ९७).

(७) **रस व रसास्वाद यांचे स्वरूप** : व्यक्तिविवेक विमर्श १, पृ. ७०–७६ येथे महिमभट्टाने या विषयासंबंधी विचार केला आहे. रसादि भावनात्मक आशय काव्याचा आत्मा असतो हे महिमभट्टाने आपल्या ग्रंथात ध्वनिवादी विद्वानांप्रमाणे अनेक वेळा प्रतिपादिले आहे. (पहा : वर पृ. १००-१०१), परंतु रसादिकांची प्रतीती ध्वनिवादी मानतात त्याप्रमाणे वाच्यार्थाच्या व्यञ्जना-सामर्थ्याने होत नसून वाच्यार्थाच्या अनुमापकत्वसामर्थ्यामुळे होते असा महिम-भट्टाचा सिद्धान्त आहे. विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव या संज्ञा केवळ काव्यनाटकांच्या संदर्भात वापरल्या जातात. लौकिक व्यवहारात कारण, कार्य व सहकारिकारण या संज्ञा भावभावनांच्या संदर्भात वापरल्या जातात. लौकिक व्यवहारातील स्थायीभाव उदित होण्याची कारणे, उदित झालेल्या रत्यादि-भावांची कार्ये (म्हणजे दृश्य परिणाम,) व स्थायीभावांच्या पार्श्वभूमीवर उदय पावून अल्पकाळाने लुप्त होणारे छोटे, किरकोळ भाव (सहकारी कारणे) हे सर्व अकृत्रिम, नैसर्गिक व सत्य असतात. परंतु काव्यामध्ये चित्रित केलेले रत्यादी स्थायीभावांचे विभाव, अनुभाव व व्यभिचारीभाव हे वास्तवजीवना-तील रत्यादि स्थायीभावांच्या कारणांचे, कार्यांचे व सहकारी कारणांचे केवळ कृत्रिम अनुकरण या स्वरूपाचे असल्याने ते असत्य असतात. तसेच वास्तव जीवनातील रत्यादि स्थायीभाव अकृत्रिम, नैसर्गिक व सत्य असतात, तर काव्य-नाटकांमध्ये अनुमानाने प्रतीत होणारे रत्यादि स्थायीभाव हे कृत्रिम व असत्य असतात. वास्तवजीवनातील स्थायीभाव व त्यांची कारणे, कार्ये आणि सहकारी कारणे ही सर्व अस्सल असल्यामुळे एखाद्या भौतिक पदार्थाप्रमाणे सत्य असतात. परंतु काव्यनाटकातील स्थायीभाव, विभाव, अनुभाव व व्यभि-चारीभाव हे सर्व नकली असल्यामुळे भौतिक वस्तूच्या, आरशामध्ये दिसणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणे असत्य किंवा आभासरूप असतात. अशा प्रकारे काव्यनाटका-तील स्थायीभाव व त्यांची विभावादि सामग्री असत्य, आभासरूप असली तरी त्यांच्या मननामुळे सहृदयाला जो रसास्वादरूपी आनंद प्राप्त होतो तो मात्र खरा असतो. ज्याप्रमाणे अंधुक प्रकाशात जमिनीवर पडलेली दोरी ही साप आहे या भ्रमात्मक ज्ञानामुळे, तिच्याकडे पाहणाऱ्या मनुष्याला खरोखरीचे भय वाटते, त्याचप्रमाणे काव्यनाटकातील कृत्रिम व असत्य स्थायीभावांमुळे व त्यांच्या कृत्रिम आणि असत्य विभावादि सामग्रीमुळे रसिकांना खरोखरीचा

आनंद प्राप्त होतो. वेदान्तदर्शनातील हा रज्जुसर्पदृष्टान्त महिमभट्टाने रसास्वादाच्या संदर्भात दिला नसून धर्मकीर्तीच्या प्रमाणवार्तिकातील मणिप्रदीपप्रभादृष्टान्त दिला आहे. पण त्याचा आशय रज्जुसर्पदृष्टान्तासारखाच आहे. (पहा : व्यक्तिविवेक विमर्श १, पृ. ७६).

वास्तवजीवनातील रत्यादि स्थायीभावांची प्रतीती त्यांची वास्तव कारणे, कार्ये व सहकारी कारणे यांच्यामुळे अनुमानाने होते. ती कधी आनंददायक, कधी दुःखदायक, कधी जुगुप्साकारक (म्हणजे किळस उत्पन्न करणारी), कधी भीतिदायक इत्यादी नानाप्रकारची असते. परंतु काव्यनाटकांतील विभावादि कृत्रिम सामग्रीमुळे जी आभासरूप स्थायीभावांची प्रतीती होते ती निरपवादपणे रस या स्वरूपाची म्हणजे आनंददायक असते.

वास्तवजीवनातील रत्यादि स्थायीभावांची कारणादि सामग्री अस्सल व सत्य असते, तर काव्यनाटकातील रत्यादि स्थायीभावांची विभावादि सामग्री नकली, आभासरूप व असत्य असते हा विचार भरतादि प्राचीन लेखकांना सुद्धा मान्य होता असे वाटते. कारण नाटकातील चतुर्विध अभिनय व काव्यातील भावभावनांची, स्थळांची, व्यक्तींची व घटनांची अलंकारयुक्त वर्णने ही सर्व मूळ कथेतील पात्रांचे व प्रसंगांचे अनुकरण या स्वरूपाची असतात असे म्हटले आहे.[२५] मूळ कथेतील पात्रे ही अनुकार्य असतात, तर काव्यनाटकातील त्यांचे चित्रण अनुकरणरूप असते हे मत भरतादि प्राचीन लेखकांना मान्य होते. पण महिमभट्टाने हा मुद्दा जितक्या स्पष्टपणे प्रतिपादिला आहे तितक्या स्पष्टपणे कोणीही तो प्रतिपादिलेला नाही.

---

२५) पहा : नाट्यशास्त्र १·११३ : लोकवृत्तानुकरणं नाट्यमेतन्मया कृतम् ।; १·१२० : सप्तद्वीपानुकरणं नाट्यमेतद् भविष्यति ।; काव्यादर्श १·५ येथे दण्डीने वाङ्मयाला आदर्श (आरसा) म्हणजे लौकिक जीवनाचे प्रतिबिंब दाखविणारी कलाकृती असे म्हटले आहे. प्रतिबिंब हे सत्य नसून आभासरूप असते, तसेच वाङ्मयामध्ये चित्रित केलेले प्रसंग, घटना व व्यक्तीसुद्धा असत्य व आभासरूप असतात.

(८) **काव्यालंकार :** महिमभट्टाने काव्यालंकारांचा तपशीलवार विचार व्यक्तिविवेकात कोठेही सलगपणे केलेला नाही, कारण काव्यालंकारांचे स्वतंत्रपणे विवेचन करणे हा व्यक्तिविवेक या ग्रंथाचा विषय नव्हे. परंतु काही ठिकाणी काव्यालंकारांच्या सामान्य स्वरूपाविषयी व त्यांच्या कार्याविषयी काही विचार महिमभट्टाने प्रगट केले आहेत.

(१) काव्यालंकार म्हणजे कवीच्या सुसंस्कृत वाणीचे निरनिराळे विलास (म्हणजे लालित्यपूर्ण आविष्कार होत असे विमर्श ३, पृ. ३९७ येथे आनंदवर्धनाला अनुसरून महिमभट्टाने म्हटले आहे.[२६]

(२) विमर्श १, पृ. १०३ 'येथे गुणालंकारसंस्कृतशब्दार्थशरीरं तावत् काव्यम्' हे ध्वनिवादी विद्वानांचे स्वतःला मान्य असलेले मत महिमभट्टाने उद्धृत केले आहे. काव्यगुण व काव्यालंकार हे शब्दार्थरूपी काव्यशरीराला भूषविणारे काव्याचे धर्म होत असे महिमभट्टाला म्हणावयाचे आहे व हे मत प्रायः सर्व आलंकारिकांनी स्वीकारले आहे. ध्वनिवादी आचार्यांनी या बाबतीत असे म्हटले आहे की काव्यगुणांचा काव्याच्या रसादिरूप आत्म्याशी साक्षात संबंध असतो, तर काव्यालंकारांचा काव्याच्या आत्म्याशी परंपरेने (म्हणजे शब्दार्थरूपी शरीराच्या द्वारा) संबंध असतो.[२७]

(३) विमर्श २·१४ (पृ. २६४) येथे महिमभट्टाने असे म्हटले आहे की वर्ण्य विषयाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष (म्हणजे स्तुती किंवा निन्दा) करण्यासाठीच काव्यामध्ये अलंकारांची योजना केली जाते.[२८] वास्तवजीवना-

---

२६) भङ्गिभणितिभेदानामेव अलंकारत्वोपगमात् ।; पहा : ध्वन्यालोक ३, पृ. ४७३ : अनन्ता हि वाग्विकल्पाः, तत्प्रकारा एव चालङ्काराः ।

२७) पहा : ध्वन्यालोक २·५ : तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः । अङ्गाश्रितास्त्वलंकारा मन्तव्याः कटकादिवत् ॥

२८) विनोत्कर्षापकर्षाभ्यां स्वदन्तेऽर्था न जातुचित् ।
तदर्थमेव कवयोऽलङ्कारान् पर्युपासते ॥
न चालंकारनिष्पत्त्यै रसबन्धोद्यतः कविः । यतते, ते हि तत्सिद्धिनान्तरीयकसिद्धयः ॥; तुलना ध्वन्यालोक २·१६, पृ. २१९ : रसाक्षिप्ततया यस्य बन्धः शक्यक्रियो भवेत् । अपृथग्यत्ननिर्वर्त्यः सोऽलंकारो ध्वनौ मतः ॥

मधील वस्तू किंवा व्यक्ती जशा असतात तशाच त्या काव्यामध्ये वर्णावयाच्या नसतात, तर अतिशयोक्तीचा किंवा न्यूनोक्तीचा अवलंब करून काव्यामध्ये वस्तूंची किंवा व्यक्तींची वर्णने करावयाची असतात. अतिशयोक्ती (हिच्यामध्ये न्यूनोक्तीचा अन्तर्भाव होतो) ही सर्व अलंकारांचे प्राणतत्त्व आहे हा विचार महिमभट्टाच्या पूर्वी दण्डी, भामह व आनंदवर्धन या लेखकांनी आपल्या ग्रंथात प्रगट केला आहे व त्याचाच अनुवाद महिमभट्टाने केला आहे.

(४) विमर्श २·७५ (पृ. ३९७) येथे महिमभट्टाने असे म्हटले आहे की काव्यातील अलंकार सहजस्फूर्त असले पाहिजेत, म्हणजे अलंकार साधण्यासाठी कवीने जाणून बुजून प्रयत्न न करता काव्यातील अलंकार आपोआप फुलले पाहिजेत. काव्यामध्ये रसाचा परिपोष करणे हेच कवीचे मुख्य उद्दिष्ट असते व म्हणून रसपरिपोषाला उपकारक होतील अशाच अलंकारांची योजना कवीने अकृत्रिमपणे व संयमाने करणे योग्य ठरते.[२९] काव्यातील अलंकारांचे स्वरूप व त्यांचे कार्य यासंबंधी येथे आपले विचार प्रगट करताना महिमभट्टावर ध्वन्यालोकातील विचारसरणीचा मोठाच प्रभाव पडला आहे यात शंका नाही.[३०]

(५) द्वितीय विमर्शामधील काव्यदोषांसंबंधी चर्चा करताना उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, श्लेष, स्वभावोक्ति इत्यादी अलंकारांचा वापर करताना त्यांच्या रचनेच्या बाबतीत कोणती पथ्ये कवीने पाळावीत याविषयी महिमभट्टाने आपले विचार प्रगट केले आहेत.

(६) **काव्यदोष :** वर पृ. ४०–७८ येथे व्यक्तिविवेकाच्या द्वितीय विमर्शाचा सारांश सांगताना काव्यदोषांसंबंधी महिमभट्टाच्या विचारांचा परिचय करून दिला असल्याने येथे पुनरुक्ती करण्याची आवश्यकता नाही. काव्यातील दोष औचित्याच्या भंगामुळे उत्पन्न होतात व ते काव्याचा आत्मा असलेल्या रसभावादि आशयाला विघातक असतात हे महिमभट्टाचे मत

२९) टीप— २८ पहा.
३०) पहा : ध्वन्यालोक २·१६–१९ व त्यावरील वृत्ति.

ध्वन्यालोकात आनन्दवर्धनाने प्रगट केलेल्या विचारसरणीवर आधारलेले असून ते प्राय: सर्व आलंकारिकांनी मान्य केले आहे. महिमभट्टाने व्यक्ति-विवेकात जे काव्यदोषांचे विवेचन केले आहे. त्याचे महत्त्वाचे वैशिष्टय असे आहे की त्यामध्ये सर्व काव्यदोषांचा पाच (किंवा सहा) व्यापक गटांमध्ये अन्तर्भाव करण्यात आला आहे. या काव्यदोषांपैकी वाच्यावचन व अवाच्य-वचन हे दोन काव्यदोष इतके सर्वसंग्राहक आहेत की त्यांमध्ये महिमभट्टाने विवेचिलेल्या विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद व पौनरुक्त्य या चारही दोषांचा अन्तर्भाव होऊ शकतो. याचा अर्थ असा होतो की महिमभट्टाने पाच (किंवा सहा) काव्यदोषांचे विवेचन न करता केवळ वाच्यावचन व अवाच्य-वचन या दोनच दोषांचे विवेचन करून इतर सर्व काव्यदोषांचा त्या दोनां-मध्ये कसा अन्तर्भाव करता येतो, व वाच्यावचन आणि अवाच्यवचन या दोन दोषांचा अन्तर्भाव अनौचित्य (किंवा औचित्यभंग) या एकाच अत्यंत व्यापक दोषामध्ये कसा करता येतो हे दाखविले असते तरी चालले असते. कोणत्याही शास्त्रीय विषयाचा विचार करण्याच्या समास (संक्षेप) पद्धति व व्यास (विस्तार) पद्धति अशा एकमेकींना पूरक असणाऱ्या दोन पद्धती आहेत, व त्या दोनही पद्धतींचा अवलंब करून शास्त्रीय विषयाचा विचार केल्यास त्या विषयाचे चांगल्या प्रकारे आकलन होते.[३१] इतर साहित्यशास्त्र लेखकांनी काव्यदोषांचा विचार व्यासपद्धतीने केला आहे तर महिमभट्टाने त्यांचा विचार समासपद्धतीने केला आहे. काव्यदोषांचा अभ्यास दोनही पद्धतींनी करणे हे त्यांच्या स्वरूपाचे आकलन होण्यास उपकारक ठरणारे आहे.

दण्डी, भामह, रुद्रट, वामन इत्यादी आलंकारिकांनी आपल्या ग्रंथांमध्ये काही अलंकारदोषांचा विचार केला आहे. महिमभट्टाने सुद्धा द्वितीय विमर्शा-मध्ये उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, श्लेष इत्यादी अलंकारांमध्ये टाळावयाच्या दोषांची चर्चा काव्यदोषांच्या संदर्भात प्रसंगवशात् केली आहे.

---

३१) इदं हि विदुषां शास्त्रे समासव्यासधारणम् ।

महिमभट्टान काव्यदोषांची सविस्तर चर्चा केली असली तरी त्याने काव्यगुणांची चर्चा कोठेही केलेली नाही. विमर्श १, पृ. १०३ येथे गुणालंकार-संस्कृतशब्दार्थशरीरं तावत् काव्यम् हे ध्वनिवादी विद्वानांचे स्वतःला मान्य असणारे मत उद्धृत करून काव्यगुण हे काव्यालंकारांप्रमाणे शब्दार्थरूपी काव्यशरीर भूषवितात असे म्हटले आहे. वामनाने गुण हे काव्याचे सौंदर्य उत्पन्न करणारे नित्य धर्म व अलंकार हे गुणांमुळे उत्पन्न झालेले काव्याचे सौंदर्य वृद्धिगत करणारे अनित्य धर्म असतात असे म्हणून त्या दोहोंमधील भेद स्पष्ट केला आहे. ध्वन्यालोकात गुण हे काव्याच्या रसरूपी आत्म्याचे धर्म व अलंकार हे काव्याच्या शब्दार्थरूपी शरीराचे धर्म असतात असा विवेक केला आहे. परंतु महिमभट्टाने या प्रकारचा सूक्ष्म विवेक न करता दोघानाही शब्दार्थ-रूपी काव्यशरीराला भूषविणारे धर्म असे म्हटले आहे. काव्यगुणांसंबंधी या सामान्य विचाराव्यतिरिक्त व्यक्तिविवेकात काव्यगुणांच्या संबंधी तपशीलवार चर्चा कोठेही केलेली आढळत नाही. यामुळे महिमभट्ट हा प्राचीन लेखकांप्रमाणे श्लेषादि दहा काव्यगुण मानणारा होता, का ध्वनिवादी विद्वानांप्रमाणे माधुर्य, ओज व प्रसाद हे तीनच गुण मानणारा होता हे समजणे शक्य नाही.३२

(१०) रीति : काव्यविषयक ग्रंथांमध्ये रीतींचा म्हणजे निरनिराळ्या भाषाशैलींचा विचार केलेला आढळतो. दण्डी, रुद्रट, वामन, आनन्दवर्धन,

---

३२) डॉ. व्रजमोहन चतुर्वेदी यांनी आपल्या महिमभट्टावरील ग्रंथामध्ये (पृ. २९५) असे म्हटले आहे की नाट्यशास्त्रकार भरत ज्याप्रमाणे गुणांचे स्वरूप दोषांच्या स्वरूपाच्या विरुद्ध असते (म्हणजे गुण हे दोषाभावरूप असतात) असे मानतो (पहा : नाट्यशास्त्र १७·९५ : एते दोषास्तु विज्ञेयाः सूरिभिर्नाटकाश्रयाः। एत एव विपर्यस्ता गुणाः काव्येषु कीर्तिताः ॥), त्याचप्रमाणे महिमभट्टही मानत असावा व म्हणून त्याने व्यक्तिविवेकामध्ये गुणांची चर्चा केली नसावी. परंतु गुण हे दोषाभावरूप आहेत असे जरी भरताचे मत असले, तरी त्याने नाट्यशास्त्राच्या सतराव्या अध्यायात श्लेष, प्रसाद, समता इत्यादी दहा काव्यगुणांची चर्चा केली आहे. महिमभट्टाने काव्यगुणांची चर्चा न करण्याचे कारण असे असावे की गुणांच्या बाबतीत त्याचे मत पूर्वसूरींच्या मतासारखेच होते व त्याबाबतीत त्याला स्वतःचे नवीन असे काही सांगावयाचे नव्हते.

भोज, मम्मट, विश्वनाथ वगैरे ग्रंथकारांनी आपल्या ग्रंथांमध्ये काव्यरीतींचा विचार केला आहे. महिमभट्टाने व्यक्तिविवेक २·१६ (पृ. २६५) येथे वैदर्भी रीतीचा व व्यक्तिविवेक ३ (पृ. ५००) येथे अल्पसमास व मृदु मधुर वर्ण यांनी युक्त आणि दीर्घसमास व कर्कश वर्ण यांनी युक्त अशा दोन प्रकारच्या संघटनांचा, म्हणजे अनुक्रमे वैदर्भी व गौडी या दोन रीतींचा निर्देश केला आहे. वैदर्भी रीतीला सामासिक शब्दांचा स्पर्शसुद्धा झालेला नसतो, म्हणून काव्यामध्ये तिचा वापर प्रशंसेला पात्र ठरतो असे महिमभट्टाने म्हटले आहे.[३३] यावरून समासप्रचुर गौडी रीती काव्यामध्ये प्रशंसनीय नाही असे महिमभट्टाचे मत असावे असे वाटते. वस्तुतः वैदर्भी रीतीला समासांचा स्पर्शसुद्धा झालेला नसतो हे महिमभट्टाचे म्हणणे बरोबर नाही. कारण वैदर्भी रीती ही अल्प-समासा असते. म्हणजे तिच्यामध्ये समासांचा वापर अल्पप्रमाणात केलेला असतो व जे समास वापरलेले असतात ते दीर्घ नसून आकाराने छोटे असतात, असे इतर लेखकांचे म्हणणे आहे.

## व्यक्तिविवेकात महिमभट्टाने स्वीकारलेली ध्वन्यालोकातील मते

ध्वनिसिद्धान्तामध्ये व्यञ्जना शक्ती पायाभूत असल्यामुळे तिचे खंडन करण्याच्या दृष्टीने तिचे विवेचन महिमभट्टाने व्यक्तिविवेकामध्ये केले आहे. "व्यंजना व्यापारा-व्यतिरिक्त जी इतर मते ध्वन्यालोकात प्रगट केली आहेत त्यांच्या बाबतीत माझा प्रायः मतभेद नाही, म्हणजे त्यांपैकी बहुसंख्य मते मला मान्य आहेत, म्हणून मी व्यक्तिविवेकामध्ये त्यांचा विचार केलेला नाही" असे महिमभट्टाने व्यक्तिविवेक ३,३३ (पृ. ५११) येथे म्हटले आहे.[३४] तसेच विमर्श १,२६ (पृ. ५११) येथे रसादिरूप भावनात्मक आशय हा

---

३३) अत एव च वैदर्भीरीतिरेकैव शस्यते ।
यतः समाससंस्पर्शस्तत्र नैवोपपद्यते ॥

३४) प्राणभूता ध्वनेर्व्यक्तिरिति सैव विवेचिता ।
यत्त्वन्यत्तत्र विमतिः प्रायो नास्तीत्युपेक्षितम् ॥

काव्याचा आत्मा असतो या ध्वनिवादी विद्वानांच्या मताच्या बाबतीत कोणाचाच (म्हणजे अर्थात् माझाही) मतभेद नाही. काव्यातील रसादिरूप आशय ज्या शक्तीमुळे ध्यानात येतो त्या शक्तीला शब्दांची व अर्थांची व्यंजनाशक्ती असे ध्वनिवादी म्हणतात तर अनुमितिवादी त्या शक्तीला वाच्यार्थाची अनुमापकत्व-शक्ती म्हणतात. येवढाच संज्ञेच्या बाबतीत ध्वनिवादी व अनुमितिवादी यांच्यामध्ये मतभेदाचा मुद्दा आहे, असे महिमभट्टाचे म्हणणे आहे.[३५] यावरून हे स्पष्ट होते की ध्वनिवादी व अनुमितिवादी हे एकमेकांचे विरोधक असले व त्यांनी अनुक्रमे व्यंजनाशक्तीचे व अनुमापकत्वशक्तीचे समर्थन मोठ्या अभि-निवेशाने व युक्तिवादपूर्वक केले असले, तरी काव्यातील रसादिरूप आशय ज्या शक्तीमुळे प्रतीत होतो त्या शक्तीला कोणते नाव द्यावयाचे या बाबतीतच दोघांच्या भूमिका भिन्न आहेत. व्यक्तिविवेकाच्या तिसऱ्या प्रास्ताविक पद्यामध्ये महिमभट्टाने ध्वनिकाराचा (म्हणजे आनन्दवर्धनाचा) उल्लेख मोठ्या आदराने केला आहे, व ध्वनिकारासारख्या महान् विचारवंताच्या ग्रंथाचे परिशीलन, त्यातील ध्वनिसिद्धान्ताचे खंडन करण्याकरता का होईना, मी करू शकलो हा मला मोठाच लाभ झाला असे स्पष्टपणे म्हटले आहे. व्यक्तिविवेकामध्ये अशी किती तरी स्थळे दाखविता येतील की जेथे महिमभट्टाने आनन्दवर्धनाच्या मताना मान्यता प्रगट केली आहे. उदाहरणार्थ– (१) विमर्श १, पृ. ४७ येथे व्यंग्य अर्थ हा वस्तु, अलंकार व रसादि या तीन प्रकारचा असतो हे आनन्द-वर्धनाचे मत (ध्वन्यालोक १, पृ. ५०), महिमभट्टाने व्यंग्य या शब्दाऐवजी अनुमेय हा शब्द वापरून स्वीकारले आहे. (२) विमर्श १, पृ. ७५ येथे एखादा विचार वाचक शब्दांनी प्रगट करण्यापेक्षा अनुमानप्रक्रियेने प्रगट केल्यास अधिक आनंददायक ठरतो या स्वमताच्या पुष्ट्यर्थ ध्वन्यालोक ४, पृ. ५३३ येथील "सारभूतो हि अर्थः स्वशब्दानभिधेयत्वेन प्रकाशितः सुतरामेव शोभाम् आवहति" हे वाक्य महिमभट्टाने उद्धृत केले आहे. (३) विमर्श १, पृ. १५६–१५७ येथे काव्यातील दोष हे औचित्याचा भंग झाल्याने उत्पन्न होतात, व औचित्याचा भंग झाल्याने रसभंग होतो हे मत प्रतिपादताना महिमभट्टाने

३५) काव्यस्यात्मनि संज्ञिनि रसादिरूपे न कस्यचिद् विमतिः । संज्ञायां सा केवलम् ।

ध्वन्यालोक ३, पृ. ३३० वरील "अनौचित्यादृते नान्यद् रसभङ्गस्य कारणम्। प्रसिद्धौचित्यबन्धस्तु रसस्योपनिषत् परा॥" हा श्लोक आपल्या मताच्या समर्थनासाठी उद्धृत केला आहे. (४) विमर्श ३, पृ ५०८ येथे प्रबन्धरसाच्या परिपोषाच्या बाबतीत कवीने जी पथ्ये पाळावयाची असतात त्यासंबंधी विचार करताना महिमभट्टाने ध्वन्यालोक उद्योत ३ मधील १०–१४ या कारिका उद्धृत करून ध्वन्यालोकातील विचारसरणीशी आपण सहमत असल्याचे दाखविले आहे.

संस्कृत साहित्यशास्त्रातील ध्वन्यालोक या युगप्रवर्तक ग्रंथाचा प्रभाव उत्तरकालीन सर्व साहित्यशास्त्रलेखकांवर पडलेला दिसून येतो, व महिमभट्ट हा ध्वन्यालोकातील ध्वनिसिद्धान्ताचा विरोधक असला तरी तो त्या प्रभावापासून अलिप्त राहू शकलेला नाही हे उघड आहे.

## महिमभट्टाचे समर्थक

महिमभट्टाने ध्वनिसिद्धान्तासारख्या सर्वमान्य सिद्धान्ताला विरोध करण्याची भूमिका स्वीकारल्यामुळे उत्तरकालीन साहित्यशास्त्रलेखकांनी त्याची उपेक्षा केली असे दिसते. व्यक्तिविवेकावरील टीकाकार रुय्यक याने जरी काही ठिकाणी महिमभट्टाच्या विवेचक दृष्टीची प्रशंसा केली असली तरी त्याने अनेक ठिकाणी महिमभट्टाच्या मतांचे खंडन करून त्याची निंदा केली आहे. एकावली या साहित्यशास्त्रीय ग्रंथाचा लेखक विद्याधर याने उन्मेष १, पृ. ३२ येथे महिमभट्टाच्या अनुमितिवादाचा निर्देश करून व तो फुसका (पलालायमान) आहे असे म्हणून त्याचे युक्तिवादपूर्वक खंडन केले आहे. महिमभट्टाची व त्याच्या ग्रंथाची प्रशंसा करणारे फारच थोडे लेखक असतील. त्यांपैकी नैषधीयचरित या महाकाव्याचा लेखक श्रीहर्ष व मम्मटाच्या काव्यप्रकाशावरील टीकाकार भट्ट गोपाल या दोघांनी महिमभट्टाची, त्याच्या ग्रंथाची व त्यात प्रतिपादिलेल्या अनुमितिवादाची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. खण्डनखण्डखाद्य या शास्त्रीय ग्रंथामध्ये श्रीहर्षाने असे म्हटले आहे की काव्यशास्त्राचा विचार करणाऱ्या विद्वानांमध्ये महिमभट्टाला मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. कारण व्यक्तिविवेक हा ग्रंथ कवींना काव्य लिहिण्याच्या बाबतीत व विद्वान काव्यचिकित्सकांना

काव्याच्या गुणवत्तेचे मूल्यमापन करण्याच्या बाबतीत नवी दृष्टी देणारा आहे.[३६] भट्ट गोपालाने म्हटले आहे की ध्वनिकाराने (म्हणजे आनन्दवर्धनाने) रसाची प्रतीती व्यञ्जनेमुळे होते या आपल्या सिद्धान्ताची जरी स्थापना केली असली तरी काव्यशास्त्राची चर्चा करणाऱ्या विद्वानांना महिमभट्टाने प्रतिपादिलेल्या अनुमितिवादाचे आकर्षण अजूनही वाटते.[३७] श्रीहर्षाच्या व भट्ट गोपालाच्या उद्गारांवरून असे वाटते की ते ज्या कालखंडामध्ये होऊन गेले त्या कालखंडात महिमभट्टाच्या अनुमितिसिद्धान्ताने तत्कालीन विद्वानांवर मोठा प्रभाव पाडला होता. परंतु यावर असा प्रश्न उत्पन्न होतो की महिमभट्ट जर काव्यमीमांसकांच्या वर्तुळात इतका लोकप्रिय होता तर त्याच्या अनुमिति सिद्धान्ताचा पाठपुरावा करण्यासाठी एकही ग्रंथकार का बरे पुढे आला नाही? हा प्रश्न सध्या तरी अनुत्तरितच राहणार असे दिसते.

## व्यक्तिविवेकातील शास्त्रीय चर्चांचे विषय

ध्वनिसिद्धान्ताचे खंडन व अनुमितिसिद्धान्ताची स्थापना करताना महिमभट्टाने व्यक्तिविवेकामध्ये विवेचनाच्या ओघात अनेक शास्त्रीय विषयांवर चर्चा केली आहे. यांपैकी काही विषयांवरील चर्चेचा परामर्श व्यक्तिविवेकाचा सारांश सांगताना यापूर्वीच घेतला आहे. शास्त्रीय चर्चांच्या विषयांची यादी खाली दिली आहे.

### विमर्श १

(१) सर्व प्रकारचा शाब्द व्यवहार साध्यसाधनसंबंधावर आधारलेला असतो (पृ. २६).

---

३६) खण्डनखण्डखाद्य, चौखंबा प्रकाशन, पृ. १३२७ : दोषं व्यक्तिविवेकेऽमुं कविलोकविलोचने। काव्यमीमांसिषु प्राप्तमहिमा महिमादृत ॥ अमुं दोषम् या शब्दांनी श्रीहर्षाने अनौचित्य या काव्यदोषाचा निर्देश केला आहे. सर्व काव्यदोष अनौचित्यमूलकच असतात असे आनन्दवर्धनाला अनुसरून महिमभट्टाने म्हटले असल्यामुळे, अनौचित्य हाच अत्यंत महत्त्वाचा काव्यदोष ठरतो हे उघड आहे.

३७) रसामृतनदीमग्ने ध्वनिकारे महागुरौ।
अनुमाया हि महिमा काव्यगोष्ठीं न मुञ्चति ॥

(२) सर्व शब्द क्रियावाचक असतात (पृ. ३०).

(३) पूर्वकालवाचक धातुसाधितांच्या वापराचे नियम (पृ. ३५).

(४) भाषेतील पदे दोन, तीन, चार किंवा पाच प्रकारची असतात (पृ. ४६).

(५) शाब्द व्यवहारातील साध्यसाधनसंबंधातील लोक, वेद व अध्यात्म ही तीन प्रमाणे (पृ. ५२).

(६) साध्यसाधनसंबंध जसा वाच्यार्थाच्या पातळीवर असतो तसाच वाच्यार्थ व प्रतीयमानार्थ (म्हणणे वाच्यार्थ ध्यानात आल्यानंतर काही वेळाने ध्यानात येणारा दुसरा प्रच्छन्न अर्थ) यांच्या मध्येही असतो (पृ. ५९).

(७) भरताने नाटचशास्त्रात सांगितलेले ४९ भाव हे सर्व तत्त्वतः व्यभिचारी भावच असून निरनिराळ्या परिस्थितींमध्ये त्यांचा आविष्कार झाला असता त्यांना स्थायी, व्यभिचारी व सात्त्विक या संज्ञा प्राप्त होतात (पृ. ७३).

(८) व्यङ्ग्यव्यञ्जकसंबंधाचे वास्तव स्वरूप आणि प्रकार (पृ. ८०).

(९) व्यङ्ग्यव्यञ्जकसंबंध भाषिक व्यवहारामध्ये अशक्य (पृ. ८१).

(१०) लक्षणावृत्तीचे खंडन (पृ. ११४).

(११) मीमांसकांच्या अभिधावादाचे आणि तात्पर्यवादाचे खंडन (पृ. १३०).

(१२) वक्रोक्तिवादाचे खंडन (पृ. १४२).

(१३) भाषेतील निपात व्यञ्जक नसून वाचक असतात (पृ. १५०) (विमर्श ३, पृ. ५१०).

## विमर्श २

(१) विधेयाविमर्श या काव्यदोषाच्या संदर्भात पर्युदास व प्रसज्य-प्रतिषेध यांचे स्वरूप (पृ. १८५–१९३).

(२) तद् या सर्वनामाचे तीन अर्थ : प्रसिद्धत्व, अनुभूतत्व व प्रक्रान्तत्व (पृ. १९९).

(३) यद्, तद्, एतद्, इदम् व अदस् या सर्वनामांच्या वापरासंबंधी चर्चा (पृ. २०२–२१०).

(४) सर्वच समास विशेषणविशेष्यसंबंधावर आधारलेले असतात. विशेषणविशेष्यसंबंध हा समानाधिकरण व व्यधिकरण या दोन प्रकारचा असतो. विशेषणविशेष्यसंबंधामुळेच समासाच्या घटक शब्दांमध्ये समर्थता म्हणजे संबद्धार्थता उत्पन्न होते. उद्देश्यविधेयसंबंध हा विशेष्यविशेषणसंबंध याच स्वरूपाचा असतो. विशेषण व विशेष्य यांच्या समासाची इष्टानिष्टता (पृ. २२८–२७६).

(५) समासांच्या बाबतीतल्या षष्ठ्या आक्रोशे (६·३·२१) व 'समर्थः पदविधिः' (२·१·१) या पाणिनिसूत्रांचा खरा अर्थ (पृ. २५५ व २७४).

(६) प्रक्रमभेद हा काव्यदोष उद्देश्यविधेयसंबंधाचा भंगच होय (पृ. २८८, ३१०).

(७) काव्यामध्ये एकाच विषयाचे वर्णन करताना वापरलेले निरनिराळे अलंकार ही प्रक्रमभेदाचीच उदाहरणे होत (पृ. ३१५–३१६).

(८) वाच्यावचन दोषाच्या संदर्भात श्लेष अलंकाराच्या वापरासंबंधी नियम (पृ. ३९९–४२५) (पृ. ४७८–४७९).

(९) शब्दानुकार आणि अर्थानुकार (पृ. ४४१) (पृ. १६).

(१०) स्वभावोक्ति अलंकाराचे व कविप्रतिभेचे स्वरूप (पृ. ४५२–४५५).

## विमर्श ३

(१) श्लेष किंवा द्व्यर्थवाचकत्व (पृ. ४७८–४७९) (पृ. ३९०–४२५).

(२) रसप्रतीती सुद्धा अनुमेय असते (पृ. ४७७, ४९९–५००).

(३) वैयाकरणांच्या व साहित्यशास्त्रकारांच्या मते शब्दापशब्दविवेक (पृ. ४८०–४८८).

(४) निपात व उपसर्ग यांचे गमकत्व म्हणजे तत्संबद्ध पदांच्या व वाक्यांच्या वाच्यार्थाच्या ठिकाणी असणारे अर्थान्तरगमकत्व असून ते अनुमापकत्व या स्वरूपाचे असते, व्यञ्जकत्व या स्वरूपाचे नसते (पृ. ५१०) (पृ. १५०–१६०).

❧ ❧

